खेरीज पैसा देत नाहीत. कर्ज कोठे मिलत नाही. तीन महिने दिवस आहेत. पुढे कार्य काये करावें. नवलराये आगऱ्यास आहे. सेह राखला पाहिजे. सेवेसी श्रृत होय हे विज्ञाप्ति.

¶*The letter describes a Rajput affair—between Ishwarsing and Bakhatsing. Ishwarsing, finding that he had to fight against odds, approached the writer for succour which was given to him. In the meanwhile a compromise was effected between them.*

---

*No. 26*] [*2-4-1750*

**श्री**

**श्रीमंत राजश्री पंतप्रधान**
**श्वामीचे शेवेसी**

विनंती सेवक विठल सिवदेव कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती विज्ञापना. येथील कुशल ताा छ ५ जमादिलोवल मुाा पलाचा नजीक नरवर जाणून, श्वामीचे कृपेकरून येथास्तित असे विशेष. ये प्रांतीचे वर्तमान सर्व पूर्वी पत्रे सेवेसी पाठविली त्यावरून विदित जाले असेल. नवल विशेष वर्तमान. वजीर कनोज प्रांते गंगातीरी आहेत. राा नवलराये आंतरवेदीत हिंदुसिंग चंदेल याजवर चिचेंडीवर चालोन आली. यास हिंदुसिंग पळोन कालपीस आला. नवलरायाची फौज चिचेंडीस येऊन, आपला बंदोबस्त केला. भोगनीपुरावर राजश्री बापू बाजीराव गेले होते त्या मुकामावर फौज आली. कालपीस सेह दिल्हा. तों चंदेल दैवगतीने मृत्य पावला. नवलरायानी राा बापूस मामलतीविसी येक दोन पत्रे पाठविली. त्यानी स्वामीच्या श्नेहावर द्रिष्टी देऊन, कूच करून इटावियांवर जाऊन, हुताशेनी केली. नवलराये कालपीच्या रोखे आलियास तमाम मुलकात आवाई पडिली. परंतु विशेष करू न पावले. आम्ही कालपी प्रांते जावें, तों सालबाईस मोर्चे होते. सालबाई जागा मातब्र. सुरुंग लागत नाही. किला आहे, निमे झांसी आहे. परंतु स्वामीच्या पुण्यकरून फालगूण वद्य ५ पंचमीस स्थल हस्तगत जाले. नरवरकराचे जागें तमाम घेतले. सालबाई लोहगंड होता; त्यात सालबाईस मोर्चे लाविल्यावर त्यानी आपला भगीरथ प्रेत्न केला. उदगाववाले पोवार वगैरे फौज ठेऊन, पलाच्यास येऊन लागलें. लस्करावर रात्री आवाई करावी; प्रेत्नास न चुकले. त्याचे मोकासी त्यानी त्याचे साहित्ये केले. परंतु पराभवास पावऊन जागा घेतला. लोहगडास मोर्चे राा गोविंदराव सिवदेव व पायेदल व तोफ यैसी ठेऊन पलाच्यासी येऊन पोवाराचे

पारपत्य करावे, ह्या उदेशें आलों. तो सैद झुल्पकारजंग मीरबकसी पूर्वी आगरे प्रांते आले होते. जे समई पातशाहा फरोखाबादेच्या रोखे आले, ते समई हे आपल्या जिल्ह्यात आले. तेव्हा जाटाची त्याची लढाई जाली. जाटानी थंडे बरेच केले होते : राणा गोहदकरहि जाटाकडे गेला होता; दोन तीन हती जाठाकडे आले. येक हती राणाकडे आला. त्यावर जाटांनी नव लक्ष मामल (चु?)कऊन, पांच हजार स्वार आपला लेक सुरजमलाने बराबर दिल्हा. त्याजबा राण्याकडील फतेसिंग दोशा स्वारानसी गेला असे. सेवेसी श्रुत होये हे विज्ञाप्ति.

¶*Vithal Shivdeo to the Peshwa, giving details of Maratha activities in Bundelkhand and the Doab.*

---

*No. 27*] [*16-4-1750*

**श्री**

**श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामीचे सेवेसी**

विनंती. आज्ञाधारक गोविंद तमाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती. येथील कुशल तागाईत छ १९ माहे जावल मुकाम मौजे रियां नजीक मेरता प्रांत मारवाड लस्कर रामसिंगजी व सवाईजी स्वामीचे कृपाकटाक्षें येथास्थित असे विशेष. येथील विस्तार प्रत्येक पुर्वणीवरून सर्व श्रुत होईल. सारांश, कालीची लढाई तर अवग्र दीड प्रहरपरियेंत मीरबकसी व बखतसिंग व रामसिंगजी व ईश्वरसिंग या उभयेतांचे हरावलांसी केवल तोपखानियासींच जाहाली. चारी घटका दिवस बाकी राहताना ते आपले मुकामावर पर्तून गेले. तदनंतर हेहि आपले मुकामावर पर्तून (आले) सेंपनास माणूस उभयेपक्षींचें कामा आले. आजी त्यांही तिकडून चाली घ्यावी यांही इकडून चढून जाऊन सर्फजंग[1] घेऊन नीट घोडी चालऊन तरवारतरवारी झुंज घ्यावे हा मनसुबा ऐकिला जात होता. त्यासी, तूर्त तर त्यांही स्वारी न करितां चौकी मात्र कायेम ठेविली. उद्याची वदंती आहे. त्याजवरून, सवाईजीनी रामसिंगजीकडील मातबर रजपूत व आपले मातबर रजपूत मुतसदी बोलाऊन, त्रितिये प्रहरीं युध्य अथवा सलूख याचा निरधार परिपक्क करायाचे ते करावें म्हणून मनसुबा चितीं धरिला दिसतो. त्यासी पाहावें, सेवटीं निरधार काये ठहरतो; त्याप्रमाणे विनंती सो केली जाईल.

---

१ निकराचा हल्ला, literally, forming line of battle.

मुख्यता सवाईजीचा मनोरथ कीं, तिकडें मीरबकशी, त्याचाहि पला भारी. दुसरें, इकडें रामसिंगजीचें नवें राज्य. बरंवाईट जाहलियां उभयेपक्षी अपेशाचे कारण यास्तव कोणेहि रीतीनें सौरष्यता घडोन येशास पात्र जाहलियांच उतम. त्यासी पाहावें. जे काहीं निश्चयात्मक ठहरेल त्याप्रमाणे सो विनंती करीन. तूर्त तर यांजकडे फौज पंचतीस हजार व चारीसें रेहकला वगैरे तोफखाना. यासिवाये उतम सरंजाम जेंगी येकवट जाहला आहे. व बख्तसिंगजीकडें स्वथा मीरबकशी व विकानेरचा राजा व रूपनगरवाल्याचा धाकटा बंधु वरकड रजपूत मिळून वीसपंचेवीस हजार फौज व तोपखानाहि उतम जमा जाहला आहे. जसें सवाईजी इछितात तैसेंच तिकडे मीरबकशीहि केवल कलह इछित नाही. याजवरून दिसते कीं, कमबेश[१] मामिलत ठहरून उभयेपक्षीं सौरष्यताच घडोन सर्व आपलेले स्थळाची वाट धरितील. इतकियावर जे होऊन येईल ते लिहिले जाईल, हे विज्ञति.

¶*Govind Tamaji reports the contest for the Jodhpur throne between the cousins Ramsing and Bakhatsing.*

---

*No. 28]* *[3-7-1750*

**श्री**

**राजश्री दौलतराऊ सिरके गोसावी**
**यासी**

अखंडितलक्षेमीआलंकृत राजमान्ये श्नो रामाजी भोसले रामराम विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये लेखन कीजे विशेष. आपण पत्र बहुता दिवसा कृपा करून पा। तें पावोन सायंत वृत निवेदन जाले. आम्हाकडील वर्तमान तर आम्ही मजल दरमजल भामेहून सतरुसीस यावयास स्वार जालो ते कुरकुंबास आलो. तो श्रीमंत राजश्री पंतप्रधान चांभारगोंदियास होलकर व सिंदे याचे समजाविसीस आले. मग कुरकुंबी मुकाम करून भेटीस गेलो. येक मजल राजश्री पंतप्रधान यासमागमे गेलो. कितेक भाषण परस्पर निवेदन जाले. आम्हासीहि अभिमानपुरस्कर बोलले आहेत. मग आम्हास आज्ञा केली कीं सतरुशीस राजदर्शनास जाणे. रा। रघोजीबावाहि तेथे आहेत. भेटी घेणे, काये विचार सांगतात तें मनास आणनें. याप्रा। आज्ञा जाली त्याप्रमाणे येऊन राजदर्शनास आले. तीर्थस्वरूप राजश्री रघोजीबावाचीहि भेटी जाली. त्यास

---

१ कम्बेश—कमी अधिक.

हे पुढें येऊन वराड दरोबस्त आपणाकडे करून हातरोखा घेतला. आम्ही घरोबियाने त्यांसी मायावादे कितेक बोललो परंतु त्यांणी आमचा आव्हेर केला. त्यास तुम्ही तेथे माहाराज मातुश्री आईसाहेबाजवळ आहां, तर आमचे साकल्य वृत निवेदन करावे कीं कैलासवासी माहाराज याणी आमचा विभाग करून दिल्हा आहे त्याप्रा श्रीमंत राजश्री पंतप्रधान यासी आईसाहेबापासून श्रृत करून आमचे सुदामतप्रा सरंजाम होऊन येई तों अर्थ करावा. प्रस्तुत येथील प्रसंग विज्वरच जाला आहे तों तुम्हास विदित आहे. आमचा विचार सर्व आपणास ठावका आहे. त्याप्रा श्रीमंत आईसाहेबास निवेदन करून रा पंतप्रधान यांचे पत्र व आईसाहेबाचे येक पत्र यैसी आम्हास पा. आपण स्वार होऊन येतो. रा रघोजीबावा तेथें येणार आहेत. प्रसंगानरूप जें बोलणे बोलोंन लिाप्रमाणें निवेदन करून उतरें पा. बहुत काये लिहिणें? रा छ ९ माहे साबान हे विनंती.

¶*The writer refers to the breach between the Peshwa and his Sardars—Sindia and Holkar—and their subsequent reconciliation.*

---

*No. 29*] *[30-7-1750?*

**श्री**

श्रीमंत राजश्री भाऊ
स्वामीचे सेवेसी

विनंती सेवक गोविंद बलाल कृतानेक सां नमस्कार विनंती. ताा भाद्रपद वद्य त्रितीयापावेतो स्वामीचे कृपावलोकनेकरून सेवकाचे वर्तमान येथास्थित आसे विशेष. जगमनपूरवाला राजा सुमेरसा आम्हाकडे होता. येकनिष्टपणे राहोन जुजभांडणे सरकारी कामकाज उतम प्रकारे केलें. कोताई तिलमात्र केली नसतां वैशाखमासी त्याचे बुधीचा भ्रंश जाला. मनमाने ते बोलावें, मनास येईल तें करावें, यैसी जिकीर प्राप्त जाली. उगीच माणसें मारूं लागला. आपली अंगोली हाताची कापून सदासिवास वाइली आणि श्रीभागीरथी स्नानास म्हणून सिवराजपुरास गेला. तेथेहि त्या राज्यासी कजिया केला. तेथून येताना नवलराये बक्षी याजला भेटोन त्यांचेहि अस्वासन घेतले जे जमिदार कोचकनार जागियांतील पेशजी पलोन येमुनापार गेले होते ते आणून मसलत मनसबा कजिया करावा यैसा तह करून जगमनपूर येथें आला. कनारचे गांव मारिले. जेथें गढी नव्हती उगीच ठाणी होतीं तीं दोन तीन ठाणी घेतली. मुलकाची खराबी करूं लागला. येमुनेपलीकडे कनारचा गांव मौजे भरतालेची गढी आहे तिजला जाऊन मोर्चे लाविले. गढींत सामान मजबूद होतें; कांहीं इलाज चालेना. पांच साता रोजानी कूच करून उठोन येमुनेआलीकडे आला. सर्व

जमीदार सामील जालें. मोठासा दंगा केला. तेव्हां आम्हाकडील ठाणेदार होते त्याणी सविस्तर वर्तमान राजश्री बापूस लिहितांच ते फौजेनसी कालपीहून आले. फौजेसी सुमरसांसी गांठ पडली. जुंज जाले. थोडी माणसे इकडील पडली. त्याजकडील माणसें बहुत मारलीं गेलीं. तेव्हां पलोन नदीच्या बेहडांत गेला. फौजेने चहूंकडून घेरला. रात्र जाली. रात्रीचा निघोन चालिला तेव्हां मागती जुंज जाले. बापूस तरवार लागली. अंधारी रात्र, बेहडाची जागा, सेवटीं पलोन गेला. कनारेस राहून सर्व जमीदार येक जाले. तीन च्यार हजार बंदूख पांच सातसें स्वार जमा होऊन यांजपासून तीन कोशाचे अंतरे येऊन राहिला. तेथून श्रावण शुध आष्टमी सोमवारी कूच करून मौजे गोहन म्हणून कनारचा गांव होता त्याजवर गेला. हें वर्तमान बापूस कळतांच तेहि तयारी करून त्याजवर गेले. त्याची याची गाठ पडली. जुज उतम जाले. त्यांजकडील माणसें बहुत मारली गेली. इकडीलहि माणसें थोडीं पडलीं. बापूनी मेहनत उत (म) केली. लोकानी शर्त करून खासा सुमेरसासीच गांठ घातली. सुमेरसा जिवे मारला. प्रस्तुत बापू तेथेंच आहेत. तिकडील कामकाज असेल तें करून, राजश्री नारोपंत यांजकडील जागियांतहि कजिया जाला आहे दाहा बारा गढी जमिदारानी घेतली दगा केला आहे त्यांचें उपराली-यासी जातील सुमेरसा भला आसोन त्यास विपरीत बुध निर्माण जाली त्याचें फल पावला. रांगडे लोक हरामजादे. दुरंदेसी विचारीत नाहीत. मनमाने त्या लटिक्या खबरी पुणे सातारियाच्या उठऊन तेव्हाच फिसाद करितात. यास्तव हमेशा फौज या प्रांती बारमाही असावी तेव्हाच हे दबतात. रयतेची निशा करून लावणी करावयाचे दिवस. आणि गव्हा [अपूर्ण]

¶*Govind Balal reports disturbances in the Doab territory under Maratha rule.*

---

[18-8-1750

No. 30]

छ १७ जिलकाद

**श्री**

**श्रीमंत राजश्री नाना**

**साहेबाचे सेवेसी**

आज्ञाधारक वेंकाजी रंगनाथ साष्टांग नमस्कार विनंती. येथील कुशल तागायत श्रावण वद्य त्रियोदसी मुकाम परगणे साहवल स्वामीचे कृपेकरून येथास्थित असे विशेष. वैशाख मासीं आज्ञापत्र आलें कीं येथें मामलेदार उभे

राहिले आहेत, तुमचें वर्तमान काये तें लेहून पाठवणें. त्यासप्रा मजकूरचें वर्तमान तरी विना फौजेसिवाये बंदोवस्तांत येत नाहीं. यानंतर जेष्ट मासीं पत्र सेवेसी लिहिलें होतें तें सेवेसीं निवेदन जाहालेंच असेल. या उपरांतिक परगणे कोटीची खंडणी करून चेरखंडीचें प्रगाणियांत जाऊन धामधूम केली. येक ठाणे बाम्हणी म्हणून घाटावर ठाणें होतें तें मारून ठाणें बसविलें. लढाई जाहाली. आपल्याकडील पांच सात भले माणूस व प्यादे कामास आले. तीन घोडीं ठार जालीं. ठाणें मात्र बसविलें. बाबू मदतीस येणार होता तो न आला. मग थोडके फौजनें पारपत्य न होये यैसें दिसोन आलें. त्यामधें प्रजिन काल समीप आला. नाइलाज जाणून चेरखडीचें काम राहिलें. मग रेवियास गेलों. तों बाबूपासीं फौज नव्हती. साहित्य न जाहालें. मग सिबंदी दूर केली. पोटापुरते मात्र मेलविले. परगणें मजकूरच्या खंडाणिया न जाहाल्या. प्रसंग पाहून वसूल घेतला. परगणें पथरटची खंडणी कुल जाहाली नाहीं. जमीदार रोज येक वर्तमान नाना प्रकारचें उठवितात आणि मामलियात फिसाद करितात, ते पत्रीं लिहितां पुरवत नाहीं. नाइकी मात्र रखून आहों. बाबूकडील पैसा दोन वरसे आला नाहीं. दोन वरसाची खंडणी येक लक्ष जाहली त्यामधें वसूल पंधरा हजार दिल्हे. बाकी राहिले ते देऊ दिलाऊ करितो. जर कदाचित धरणे बसवावें तरी दरवाजे मना करितो. मिष्ट भाषण मात्र बहुत करितो, आण रुपया देत नाहीं. आम्ही दोन्ही तोडीत नाहीं. विना पुरतें पारपत्य केल्या खेरीज पैसा प्राप्त होत नाहीं. त्याहीमधें मनसुरआळीचा अमल येमुने-आलिकडेस होता. त्यास नवलराम बक्षी व रोहिले पठाण व बंगस यासी लडाई जाहाली. खासा नवलराम व कितेक फौज मारली गेली त्यामुलें इकडील रान मोकलें पडलें आहे. यैसियामध्यें फौजेचें साहित्य जाहालियानें मुलुक हस्तगत होईल. यांत स्वामी खावंद आहेत. फौजा सनिद आहेत. परंतु कोण्ही फुकाचें साहित्य करीत नाहींत. यानंतर परगणें सोहावल्यांत राजे जगतराज व राजे सभासिंग याणी सावकारास इनाम गांव करून दिल्हे आहेत. आज दोन वरसें कजिया करितो परंतु मानीत नाहींत, तेव्हां त्याचे अमलदार उठऊन दिल्हे. मग त्याचे अमलदार सिंगपूरच्या ठाणियांत बसून लबाडी करितात. रोज उठून कजिया करितात, आणि स्वामीची पत्रें पूर्वीं व हलीं आलीं परंतु मानीत नाहींत. सोहवलचे तपे तीन बुंदेलियाकडे आहेत. जसोव तपे सिवराजपूर व तपे रौंड येथील कुल आमल आमचा चालत नाहीं. तपे रउड आम्हां जवल आहेत, तेथील येक गांव मारून आणिला तरी त्याची मदत आमानसिंग करितो. तेणेकडून पारपत्य होत नाहीं. सोहवलच्या गढ्या दोन बुंदेलियाकडे

आहेत तेहि देत नाहींत. ते पष्ट म्हणतात कीं गडीस मोरचे लावाल तेव्हां देऊं यैसें म्हणतात. परंतु आम्ही स्वामींचे प्रतापें मोरचे लाऊन चऊ दिवसा घेऊं, परंतु मागील पुस्टपत्र पाहिजे येदनिमित्य घडून येत नाहीं. राजेश्री गोविंद बलाल याचे हातीं आहेत. यानी साहित्य केलिया बुंदेलेचेनें कांहींच होणें नाहीं. ये रीतीचें सेवकाचें वर्तमान आहे. सविस्तर वर्तमान जासूद सेवेसीं निवेदन करितां सेवेसीं निवेदन होईल. सेवेसीं श्रुत होये हे विज्ञापना.

¶*Venkaji Rangnath reports his activities in the Doab and Bundelkhand.*

---

*No. 31]* *[20-9-1750*

**श्री**

**श्रीमंत राजश्री नानासाहेब**
**स्वामीचे सेवेसी**

आज्ञाधारिक सेवक राघो नीलकंठ साष्टांग नमस्कार विज्ञापना यैसीजे. पूर्वी दोन च्यार विनंतीपत्रें सेवेसीं पाठविलीं ते प्रविष्ट होऊन सविस्तर वर्तमान विदित जाहलें असेल. यानंतर वर्तमान यैसे. मनसूर आलीखान वजीर याची फौज सरदार नवलरायेसहित बुडविली म्हणोन वजीर मजकूर हजार वीस फौजेनसी पठाणावर गेला आहे परंतु अली महमदखान रोहिला वगैरे पठाणांहि बलफल धरला. जमाव बहुत करून युध्यास सिध्य जाला आहे. त्यासी वजीर मजकूरहि त्याजवर जावयासी पुढें फार संदेह आणितो. मग ईश्वरीइच्छा प्रमाण. सलाबतखान यासी वरचेवर बोळावयासी ताकीदपत्रें पृथ्वीपदाचीं आलींत कीं पत्रदर्शणी तुम्ही वजीर मजकुराजवळ जाऊन सामील होणें. त्यासी खानमजकूर अजमेरींत आहेत. च्यार लक्ष रुपये बाकी राजारामसिंगाकडे राहिले आहेत या आसेस्तव फसले आहेत. कांहींक फौज माघारे दिलीस पाठविली. थोडी फौज जवळ राहली आहे म्हणोन मार्गाचाहि खेत्रा[१] मानीत असतील. यानंतर राजा इसरीसिंग रुपनगरासी कजिया करनार. तेथील राजा बहादुरसिंग व राजा सावतसिंग हे भाऊ परस्परें भांडतात राज्याकरितां. यासी पाहावें कसें कजिया चुकतो. विनंती यैसीजे. प्रजन्य फार जाला. नदी नाले पूर विशेष म्हणोन च्यार दिवस घरी राहिलों. आतां विजयादशमीचे मुहूर्तानें तिकडे स्वार होऊन स्थलास पावलियाणें सविस्तर वर्तमान सेवेसीं विनंती लिहिली जाईल. बहुत काय लिहिणे हे विज्ञापणा. आश्विन सुद्ध प्रतिपदा गुरुवार.

¶*News from the North that the Vazir has planned a campaign against the Rohillas and called in to his aid Salabatkhan Mir Bakshi from Ajmere is reported to the Peshwa.*

---

१ संशय, भीति, अडचण.

No. 32] [26-9-1750

श्री

श्रीमंत महाराज राजश्री सुभेदार साहेबाचे सेवेसी

खिजमतीस मिर्जा अदलबेग कुरनिशात महवल मकसुद[१] आंकीं येथील खैर छ ९ माहे जिलकाद जाणोन साहेबीं आपली खैर ल्याहावयास हुकूम फर्माविला पाहिजे. दिगर नवलराये बक्षी मनसुर अलीखांचा गारत जाला. सैदसलाबतखां बक्षी सार्वभोमाचा अजमेरच्या मैदानांत आहे हे हकीकत तपशिलवार पूर्वी साहेबांस लेखन केलें आहे त्यावरून ध्यानास आलें असेल. सांप्रत्य सात्रकारी चिठ्ठी छ ४ जिलकादीं लिहिलें आलें तेथें हकीकत ऐसी कीं मनसुर अलीखां लढाईस पठाणावर गेले होते ते छ १६ सवालीं मारले गेले, आणि फौज गारत जाली. दोन तीन शहरें कनोजच्या पठाणांनीं लुटलीं. पठाणांची फत्ते जाली. दिगर सैद सलाबतखां बक्षी सार्वभौम राजे ईश्वरसिंग याजवर आले होते ते अजमेरच्या मैदानांत आहेत. राज्याचा याचा कधीं सल्लख होतो कधीं बदलतात ऐशी हकीकत आहे. साहेबांस कळलें पाहिजे. बंदगीस रोषन होय हें अर्जदास्त दिगर वडगांवचा हकीकतीचा लाखोटा प्रविष्ट केला आहे, त्यावरून कळेल हें अर्जदास्त.

¶*News from the North : the defeat of Mansur Ali and the death of his officer Navalrai is reported to Malharrao Holkar.*

---

No. 33] [September 1750

श्री

श्रीमंत राजश्री नानासाहेब
पंतप्रधान स्वामीचे सेवेसीं

आज्ञाधारक राघो नीलकंठ साष्टांग नमस्कार विज्ञति यैसीजे. पूर्वी कितीक विनंतीपत्रें सेवेसीं पाठविलींत; प्रविष्ट होऊन सविस्तर वर्तमान विदित जाहालें असेल. परंतु येकही उत्तर सरकारेंतून आलें नाहीं म्हणोन कासीदजोडी पाठविली आहे ते सेवेसीं पोहचतील. दाहा दिवसाचा वायेदा केला आहे. इकडील वर्तमान यैसेजे. सलाबतखान अजमेर व राजा इसरीसिंग दसऱ्या करावयासी जेनगरास येणार आहेत व राजा रामसिंग मेडतास व राजा बख्तसिंग नागोदास

---

१ हेतु.

आहे. कासीदजोडी हजुराहून आलियावर तिकडे रवाना होऊं तेथें गेलियावर सविस्तर वर्तमान सेवेसीं लिहिलें जाईल. यानंतर रूपनगर येथील वगैरे राजकारणे आहेत. तिकडे गेलियावर कळों येईल. भावाभावाचा परस्परें कजिया आहे. येका भावानें सेवकास लिहिलें आहें कीं, तुम्ही सत्वर येणें, भेटीनंतर वर्तमान सांगितलें जाईल. त्यास तेथें गेलियावर जें असेल ते स्वामीचे सेवेसीं विज्ञापना लिहिली जाईल व नवाब मनसूर अलिखान वजीर अलीमहमदखान रोहिलाकडे गेला आहे. तिकडील वर्तमान अलियावर सेवेसी विनंती केली जाईल. बहुत काय लिहिणे हे विज्ञापणा.

¶*Ragho Nilkanth gives the Peshwa news of the movements of Ishwarsing, Madhosing and the Vazir Mansur Ali.*

---

*No. 34*] [*December 1750*

**श्री**

**पुर्वणी श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामीचे सो**

विनंती. राजश्री सवाईजीकडील वर्तमान तर राठोंडाकडील मोहीम सर करून मीरबकशीस सांभरेहूनच दिलीस मार्गस्त करून जयेपुरास दाखल जाहले. दसरा व दिपावली संपादिली. बकशीजीस घरीं आणून जियाफत[१] येथासांग करून निरोप द्यायानिमित्य बहुत विचारिले. परंतु त्यास हजूरची ताकीद निपट येऊन पावली याजकरितां मेजमानी न घेतां परभारेंच कूच करून गेले. त्यामागें सौरष्य संपादनार्थ दिवान हरि गोविंद व पुरणचंद या उभयेतांसी जयेनगरीहून कांहीक लक्ष दोनी लक्ष नगद निशा होऊन जायानिमित्य पाठविलें. तदनुरूप लक्षा येकाची निशासहित मशारनुले मीरबकशीसमीप जाऊन पावले. जगनाथ पुरोहित व दौलतराम भंडारी हे उभयेताहि गेले होते ते तों रुकसत होऊन आले. जगनाथ पुरोहितासी रामसिंगजी समीप पाठऊन भंडाऱ्यासी आपणासमीप ठेऊन घेतले. तो अद्यापिवर येथे आहे परंतु याचे ऐवजी रामसिंगजीनी दुसरा भंडारी उभा केला. याजमागे रजपूतलोक समागमेच त्यासच चौकीनिमित्य मुकरर करून ताकीद लिहिली आली आसे. तोहि सांप्रत येथून बिदा होऊन जाणार आहे. मीरबकशीस तर दिलीकडील ताकीद विशेष, तिकडील जाणे जरुर. वजीराकडीलही वर्तमान विश्कलित जाहलें. येसमई केवल निग्रहहि करणे उतम

---

१ मेजवानी.

नव्हे म्हणून जे कांहीं मिळाले तेच लाभ जाणून निशा कची पकी जे यानी दिधली ते घेऊन येथापूर्वक नारनोलचा जिला याजला सोपून पुढें गेले. त्यासी हरि गोविंद दिवान दोनी हजार फौजेनिसीं ते प्रांती बंदोबस्तानिमित्य राहिला आहे व मेवात प्रांती मेवाती यांही व जाटांही धूम उठविली याजमुळे बदअमली जाहली आहे. त्याजकरितां दिवान हरि गोविंदजीसी ताकीद तिकडील बंदाबस्ती लिहिली गेली आसे व येथून वकील पुरणचंदजीहि दिल्लीनिमित्य बिदा जाहले आहेत. हेहि त्याच प्रांती होऊन जाणार. सुरजमल जाट बकशीचे शामील असतां त्यासी उमेदवार पुत्राचे पव्याचा करून निरालें केलें व राजा रामसिंगजी-कडून लाख दोनी लाख देऊं केलेत. त्यांत मुबलग बाकी राहिली व जागाही कपर्दिकेच न मिळाली. इतके दिवस मोहीम सर होते याजकरिता जाग्याची तजवीज न जाहली. ऐस्या कितेक प्रसंगामुळे तोहि दुखवलासा दिसतो. जनवार्ता कीं मेवातियासीं त्याचाच इशारा आहे. त्यासी पाहावे काये घडोन येतें. तूर्त तर सर्व धाकटे मोठे रजपुतांसी घरासी बिदा केलें आहे. किशनसिंग नेणवेकर येथें येऊन पावला. त्यासी रावराजा दिलेलसिंगाप्रमाणे सामोरे जाऊन भेटून बहुमान केला. राजश्री माहाराव दुर्जनसाल कोटेकर यानी राजश्री मल्हार-राऊ होलकर यांची आमदनी नरमदेवर जाणून वेणीराम भट यांसी पाठविलें आहे. राजश्री केशोदासजीस देवलोक जाहल्यानंतर त्यांचे जाप(वा?)यासी भूशण वस्त्रें देऊन रिसालाबदल ठेविलासा करून कृपा केली व दीक्षित सदाशिव नामे रा॥ गंगाराम पुंडरीक यांचा पुतण्या रावजी असतांहि त्यांजकडील जवाब-सवाल यांचेच नि॥ने होता. वाकीफकार म्हणून रावजीचे प्रत्यामना ठहराऊन कुली जवाबसवाल सोपून रिसालाहि त्यांचेच गला घातिला. याचा विस्तार पूर्वी राजश्री सवाईजीचे पत्रासहित त्याही आसीरवादपत्र लिहून सेवकाचे विनंती-पत्रानरूप सो॥ सरकारचे जोडीसमागमे पाठविलें असे त्याजवरून सर्व सो॥ श्रुत जाहलें असेल. सारांश अतां सरदारांचे आगमन जाहल्याने त्याजसमीप काही निशापातीसहित पाठऊन केशोदासजीचे निमित्यानरूप कलह संदीत न करितां घडोन दिवसोंदिवस उभयेपक्षी पहिल्याहूनहि अधिकोतरें ऐक्यता संपादून श्नेहाभि-वृधिते पावावी या हेत तजवीज ठहराविलीसी दिसते व निजमनोरथहि बहुत करून आहे. येतदनिमित्ये राजश्री सटवाजी राजोले याजकडील ग्रहस्त यादोपंत नामे त्यासीहि आग्रेहकडून ठेऊन घेतलेसे आहे की इतके दिवस ठेविल्यासी रिक्तहस्त काये म्हणून पाठवावे? त्यासी वार्ता कीं राजश्री मल्हारराऊ होलकर इंदुरी पावले. वरकड सरदार मागून येणार. त्यांचे आगमनाआगोदर पाठ-वावयाची तजवीज ऐकिली जाते. पाहावे कोणे रीतीने निशापाती देऊन कोणा-

सहवर्तमान पाठवितात. त्याप्रमाणें विनंती करणेत येईल. राजश्री सवाईजीस व रावजीस थैल्या सादर जाहल्या होत्या त्याची उत्तरें सो। पावतात. बहुत काये लिहिणे हे विज्ञाप्ति.

¶*The letter deals with complications in Rajputana and reports the movements and doings of Sawaiji Ishwarising of Jaipur.*

---

*No. 35*] [*17-4- 750*

**श्री**

**पुर्वणी श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामीचे सो।**

विनंती. काली छ १९ रोजी संध्याकाळीं राजश्री सवाईजीनी मीरबकशी व बख्तासिंगजीकडील लडाईचा मजकूर ऐकून जे कोणी रजपूत लोक लहान मोठे आपले व राजा रामसिंगजीचे होते त्या सर्वासी बोलाऊन दरबार करून येकमते विचार ठहराविला कीं तोफखानियाचें भांडण तर सिव्यागालीतुल्य आहे, आतां नीट कमरबंदी करून घोडीच उचलावी, जयदाता भगवान आहे म्हणून बोलिले. तेव्हां सर्वाहीं हेच म्हटलें कीं आम्ही तर चाकर लोक हुकमी आहो. माहाराजानी मात्र पाठीमागें उभे राहावे व तमाशा पाहावा. हे गोष्ट प्रगट दरबारात होऊन मग एकांत जाहला. रामसिंगजीकडील पाचसात रजपूत व जगु पुरोहित व दौलतराम भंडारी वगैरे व यांजकडील राव केशोदासजी व दिवान विद्याधर व हरि गोविंद व हरनाथसिंग व जसवंतासिंग व राव सरदारसिंग हे सर्व येकांती होते. यानी कितेक दुरंदेशीचा मजकूर केला. त्यासी सवाईजीनी राव केशोदासजीस विचारिलें कीं तुमचा काये मसलहत? यांहीं पाहिले कीं आपण हरि हकीम यासह ज्यांचे मध्यस्थीने जवाब सवाल लाऊन बाहियार्थ दोशानिवारणेनिमित्य विचारीत असतां सिवाये मर्जी दुसरी किमर्थ गोष्ट सांगावी? हेच उतर दिधलें कीं मामिलतची गोष्टीस तर मी वाकीफ नाहीं कीं पहिले कसी जाहली व आता काये रदबदल दरपेश आहे. त्यासी जोवर मामिलत येथास्वरूप देऊन रस राहे तोवर तर केवल झुंझावर गोष्ट टाकणे सलाहदौलत नाहीं. इतकियावर जे पंचाचा सलाह असेल तो करावी. मज माहाराजानी हरावली सोपिली मी हजर आहे. महाराजीं मात्र सिरावर उभे राहावे. तेच सुवर्डा कीं हे शेरीर माहाराजाचेपुढे कामा येतो. इतकियांत अंतस्ती वर्तमान कललें की हकीमाचे मारफतीने भला माणूस मीरबकशीकडे येऊन पावला तेव्हां सेवटी हे ठहराऊन सर्व उठोन उभे राहिले कीं जर मीरबकशी स्वार होऊन उभे राहतील तर तमाशा पाहतां कसे बनते? आपणही फौजेनसी स्वार होऊन चाली घ्यावी. नाहीतर येकदोनी

दिवस मागती रदबदल पाहावी. त्यासी हकीमजीस त्याच्या भल्या माणसा-समागमे मीरबक्शीसमीप पाठविले. ते रात्रौ तर न आले. आजी छ २० रोजी सर्व निरधार कळूं येईल; येवंच बोली लागली. यांचे मन सलुखावर व तुरुकही सलूखच इच्छितो. येक बखतसिंगाची ओढ तोड काये होऊं सकतें. कमबेश तुरकासी मामिलत करून काये ते घेतील ऐसा योग दिसतो. अजी ते लडाईसच चढणार होते, ते गोष्ट राहिलीसी तूर्त आहे. विदित होये हे विज्ञाप्ति.

¶*Ishwarising getting reports of a battle between Meer Baksi and Bakhatsing holds a durbar in which he consults his Sardars and ministers about what he should do in the matter.*

---

*No. 36*] [*1750*

**श्री**

**श्रीमत राजश्री नानासाहेब**
**पंतप्रधान स्वामीचे सेवेसी**

विज्ञापणा यैसीजे. पत्र लिहिलियावर वर्तमान मुरारजी साहुकाराचे दुकाणी कासिद जोडी दिलीहून ११ रोजात उजेनीस आली. त्यास लिहिले होते की, वजीरासमागमे जाटाची फौज होती ते आली. महमदखान रोहिलासी मिलाली. येका केला की तुम्ही आम्ही जमीदार लोक आहो आज तुम्हावर आहे पुढे यैसेच आम्हावरहि होईल. त्यासी तुम्ही रात्री शबिनास निघून या. वजिराचे डेरावर त्यासी त्या रोहिलाने रात्रीस चालून आलेत. मनसुरअलीखान याचे डेरावरच येऊन पडेलेत वजिर मजकूर कामास आला. फौज लुटून घेतली; किती पलाली. यैसे वर्तमान आले होते; त्याप्रमाणे सेवेसी विनंती लिहिली आहे. सत्यमिथ्या वर्तमान दिलीहून वकिलाणे सेवेसी लिहिले असेल. बहुत काय लिहिणे हे विज्ञाप्ति.

¶*News-letter to the Peshwa from Ujjain reporting the battle between the Rohillas and the Vazir Mansur Alikhan.*

---

*No. 37*] [*1750?*

**श्री**

शेवेसी विज्ञापना. पातशाहाजीस आर्जी वजिरास कागद तुम्हाकडील ऐसी पाठवून द्यावी म्हणून आज्ञा त्यास आम्हाकडील आर्जी व पत्र सिद्ध जालें आहे.

मीरबक्षीकडील पत्राकरितां महबूबसिंगास बोलाऊन ताकीद केली आहे. त्यांजकडील पत्रें सिद्ध होऊन आली म्हणिजे शेवेसीं पाठवितों. शेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.

¶*The writer informs the addressee that he will forward the letters for the Emperor as soon as Mahbubsing submits the proper drafts.*

---

*No. 38*] [*25-1-1751*

**श्री**

**श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामीचे सेवेसी**

विनंती. सेवक गोविंद बल्लाल कृतानेक सां नमस्कार विनंती. ताा माघ शुद्ध दशमीपावेतो स्वामीच्या कृपावलोकनेकरून सेवकाचे वर्तमान येथास्थित आसे विशेष. आज्ञापत्र सादर जाले. नेहमी फौज हमेशा ठेवावी लागली त्याजमुळे सरकारी कर्ज जाले, त्याची मदत तुम्हास करावी लागेल म्हणून आज्ञा. त्यास आम्ही तो सर्वस्वे स्वामीचे बारगीरदाखल आहों, आम्हास कोण्हे गोष्टीचा उजूर[१] आहे येसे नाही. स्वामिसेवा जाणतो. स्वामीचे पुन्यप्रताप थोर आहे. ईश्वर सर्व उतमच होईल, आनि यास शत्रु पादाक्रांत होतात. कर्जहि स्वामी मनावर धरितील तर फेडितीलच. सविस्तर चिरंजीव बाबूराव याजला लिहिले आहे ते सेवेसी विनंती करतील. इकडील वर्तमान तर रा मल्हारजी होलकर व रा जयाजी सिंदे याणी जयेनगरचे कामकाज करून बंदोबस्त करून रा राजी माधोसिंग याजला बसऊन वजिराचे मदतीस पुढे कूच केले. याजउपरी जे वर्तमान होईल ते साद्यंत लिहीत जाऊन. सेवेसी शृत होये हे विज्ञापना.

¶*Govind Balal communicates to the Peshwa the news of the march of Sindia and Holkar to the succour of Nawab Safdarjang after seating Madhosing on the Jaipur throne.*

---

*No. 39*] [*17-2-1751*

**श्री**

**श्रीमंत राजश्री पंतप्रधान**
**स्वामीचे सेवेसीं**

विनंती. सेवक रामचंद्र बलाल भुसकुटे कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील क्षेम तागायत छ १ रबिलाखर मुकाम (२ अक्षरें फाटली) लुद परगणे

---

१ तक्रार.

आसेर येथें स्वामीचे कृपावलोकनेकरून सेवकाचें वर्तमान येथास्थित असे विशेष. स्वामीची आज्ञा घेऊन लस्करांतून स्वार जालों ते माघ वद्य सप्तमीस खरगोणास सुखरूप पावलों. सरकार बिज्यागडचें वर्तमान मनास आणितां वसुलाचा ताल नाहीं. अर्जानी बहुत. कोणी उदमी बेपारी मन घालून * दि करित नाहीं या प्रकारचे आहे. यानंतर मकडाईकडील मजकूर तरी मीरखान टोंके तों आम्ही आलिया अगोदर पंधरा दिवस उठोन बुंदेलखंडांत गेले. चिरंजीव राजश्री नारोपंत तो जाऊन तेथे गुंतले. त्याचें भारी सामान. आराव बहुत. मीरखान गेलियावरी येक दोन वेला बाहिर निघोन जुजें जालीं. दाहा वीस इकडील दाहा वीस तिकडील पडिले. पाच सात घोडीं पडिलीं. परंतु वरचेवरी झटपट करून जात. आमचें सामान मीरखान गेलियावरी राहिले तें कलतच्च आहे. ही अटकल पाहोन छ २१ रबिलोवल माघ वद्य ८ गुरुवार प्रात:कालापासून सर्व साहित्य करून फौज च्यार पांचसें पाईदल दोन अडीच हजार आराव सुधां सामान घेऊन प्रहर दिवसा बाहेर निघोन चालोन घेतले. ते आपल्या लस्करावर उठावणी करीतच्च आले. मेटाकोटाची मोर्चेबंदी तों होती परंतु सामान बहुत यास्तव रेटेनात. पांच सात वेला उठवण्या केल्या. वीस पंचवीस माणूस जखमी जालें. सात आठ * माणूस जायां जालें. व घोडींहि वीस पंचवीस जखमीं, दाहा पंधरा ठार पडिलीं. ऐसें करितां येक प्रहर जूज जालें. परंतु त्याणी जुर्मस[1] खादला नाहीं. त्याचा तो निश्चय हाच कीं सफेजंगी करून छिपाबरडपावेतों पिटून घालावे; ऐसा अनर्थ येऊन पडिला. मारावें किंवा मरोन खस्त व्हावें. दुसरा अर्थ नाहीं. बाजार-बुणगे यानें तों पल काढिला. यैसे वर्तमान जालें. तेव्हां चिरंजीव राजश्री नारोपंती खावंदाचे नांव निदान समई घेऊन हिमत बांधोन, सर्व सरदारांस ताकीद केली, आणि लुटी माफ करून उठावणी केली. त्या समई राजश्री संताजी व रखमाजी आटोले व पागेचे लोक राजश्री गोविंदराव मोहिते व गंगा विठल बक्षी व तावजी यादव व आपाजी चव्हाण वगैरे आसामी वीस याणी व रामजी पाटील परदेसी खरगोणकर याणी उठावणी करून मर्दुमी बहुतच केली. मध्येच ढिगांत पडोन कमरगा तोडून अरपार गेले. तों निशाणानी कल खादला. मग येकदाच चोहींकडून उठावणी होतांच मोहरा फिरविला. मग त्याणी पल काढूं लागले. खावंदाचा प्रताप थोर त्या योगेंकरून, मारीत मारीत दरवाजापावेतों गेले. नगारे व नौबती व निशाणे तों पांच सात घेतलीं. पंचवीस च्यालीस स्वार पडिले. पांच सासें माणूस कापून काढिलें. सात आठ घोडीं व सा उंटें व सें सवासें

---

१ कच, दबाव, भीति.

जेजाळा व तीनसें बंदुखा व तीन च्यारसें तरवारा नामी सरदार सात आठ मारले गेले. दोन तीन धरून आणिले. वरकड गरीब गुरब मेले गेले त्याची संख्या कोणी केली ! तशा प्रसंगामध्यें हजार पांचसें सामान चांगलें अनखी असतें, तरी तेच दिवसीं किला हस्तगत जालाच असता. परंतु सामान थोडकें यास्तव राहिले. आपण फालगुनी पूर्णिमापर्यंत जाऊन पोहोंचतों. ऐसियासी स्वामीनी कृपा करून हजार पांचसें राऊत चांगले नावाचे माणूस पाठविलियानें कार्यसिधी होऊन लौकरच पंधरा दिवसानी मागती राऊत स्वामीजवल पोहचतील. तेथील प्रसंग पाहून फौज पाठविली तरी उत्तम आहे. नाहीं तरी आम्ही आपले खटकर्म करीतच आहों. येकबाल हाच खावंदाचा प्रताप थोर आहे. जेथें नांव घेऊन तेथें कार्यसिधी होईल. सरकारची मदत आहे ती स्वामीस विदितच आहे. आणि सरंजामी राऊत पांचसें करार केले त्यापैकीं कांहीं आले कांहीं यावयाचे आहेत. ते सामान ज्याप्रमाणें दात्रुत्व त्याप्रमाणें आले आहेत. त्याचे सामान आहे. राहिले येतील तेही तैसेच येतील. परंतु येथें चिरंजिवानी च्यारसे राऊत राजश्री बाबूराव खडागले व फतेसिंग भोसले वगैरे चाकर ठेविले. येकून फौज सरंजामीसुधां नवसें व दीडसे पागा व सरकारचे तैनाती दोनसे येकूण बारासें होणार. व पाईदल साडेतीन हजारपावेतों आहे. पैकीं ठाणे काली भितस च्यारसें व किरकोल नाकेबंदी पांचसें बाकी भांडते माणूस अडिच हजार प्यादे आहेत. खर्च भारी होता म्हणून खेद करावा, त्यासी रानांत इजत राहिली पाहिजे यास्तव बालगणे लागलें. खांवंदाचा नक्ष व आपली इजत राहिली म्हणजे सर्व गोष्टी अनुकूल होतील. बदनक्ष घेऊन आलो तरी खावंद शब्द लावितील. आणि नक्षा राखोन कार्य करून आलों तरी जिवापेक्षां खर्च होईल तो खावंदापासून भांडोन झगडोन घेऊं, हा निश्चये करून मेहनत करितों. स्वामीचे पुण्येकरून येश यावें तें येईल. जाल्या जुजांत घोडीं पडिलीं त्याची याद अलाहिदा पाठविली असे. त्यावरून सविस्तर कलेल. वरकड परगणे असेरचा बंदोबस्ती करावी म्हणून आजी तपे राजगड परगणे मजकूर येथें आलों. शहरावरी दबाब डोंगराचे बलें दिल्हा असें. डोंगरी गावाचा अमल च्यारी सिरे घेतला तरी बेजार होणार नाहीं. ता। बहादरपुरा व शहरचा चौत्रा येथें मैदानी अमल बसवावयासी सामान भारी पाहिजे, तें तों नाहीं. याकरितां डोंगरांत बसोन दबऊन जोंवरी जें करणें तें करूं. मग मकडाईस जाऊन. आधींच सामान आम्हांजवल भारी त्यांत बहादरपूर तर्फेत फौजदारी आपली म्हणून राजश्री महिपतराऊ कवडे याणी सनदा आपले कमाविसदारास दिल्ही. आणि आम्हांस रागीजोन लिहिले कीं तुम्हांस सनद चुकोन दिल्ही. तैसेच राजश्री मानाजी निंकम

माजरोदाविसीं हिसके खातात. इतकेहि कर्ज वारून आपण काम करावयाचें तें करितों. परंतु स्वामींनी त्यास ताकीदपत्रें पाठविलीं पाहिजेत, आणि ते आर्ज लिहितील त्यास सनद न द्यावी. म्हणजे दाहापांच हजार खंड दंड करणें तो करून जाऊ. पत्राचें उत्तर ल्याहावयासी आज्ञा करिणार स्वामी समर्थ आहेत. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Ramchandra Ballal Bhuskute to the Peshwa describing very vividly a battle which Naropant (Bhuskute ?) fought at Makdai. He enumerates the casualties and asks the Peshwa to send reinforcements.*

---

*No. 40*] [*12-2-1751*

छ १४ जमादिलौवल

## श्रीमोरया

### श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामीचे शेवेसी

विनंती. शेवक गंगाधर येशवंत व रामाजी यादव क्रृतानेक सां नमस्कार विनंती. उपरी: येथील कुशल माघ वद्य त्रयोदसीपावेतो स्वामीच्या प्रतापेकरून येथास्थित असो. विशेष. क्रृपा करून आज्ञापत्र पाठविले ते पावोन बहुत संतोश जाला. "राजश्री माधोसिंगाची राज्यस्थापना जाली असेल. परस्परें अयिकण्यात आला, परंतु सविस्तरें न लिहिले. आत:पर सविस्तरे लिहिणें. तेंथील गुंता उरकलाच आसेल. प्रस्तुत सा सुबे दक्षण सोडवावयाचा मनसबा आहे. मोठा प्रसंग आहे. राजश्री मल्हारबास बोध करणें तसा करून घेऊन येणें," म्हणून पत्री आज्ञा केलीं. त्यासी, इकडील वर्तमान, जैपुरास मुकाम आलियावर ईश्वरसिंग लयातें पावले. माधोसिंग याची राज्यस्थापना झाली. खंडणीचा व गुदस्ताची बाकी सुधा करार जाला ते वृत शेवेसी लिहून पाठविले आहे. श्रुत जाले आसेल. याउपरी, त्याच्या लोकासी व लस्करच्या लोकासी शहरात कजिया जाला. त्यामुळे आठच्यार रोज बिघाडात गोस्टी होती. प्रस्तुत राजे माधोसिंग यानीं पैगाम करून पूर्ववतप्रमाणे सलूख राखिला. जैपुरचे कामकाज होऊन कूच जाले. वजिराकडीलहि मातबर भले माणूस आले आहेत. बोलीचा प्रसंग होत आहे. करार जालियामागून विनंतीपत्र शेवेसी लिहून पाठऊन. येथून आगरियासि दोचौ रोजानी दाखल होऊन. वजीरहि तेथे येणार. पठाणास तंबी केलिया सर्वास दहशत होती; मनसबियाच्या तोंडास आले; आल्यासारखे फड प्रसंग नक्ष राखिला पाहिजे, हा सरदारांचा मनोदये आहे. उगेच माघारें फिरलियासि शोहरत[१] होऊन दंगा होऊ पाहतो. तिकडीलहि कार्ये मोठेच आहे.

१ शोहरत=प्रसिद्धी, आवई.

हा समये वारंवार येणार नाही. जर खामखा तिकडेच यावें येसें असिले तरी पत्री आज्ञा लिहून पाठवावे. उभयेतां सरदारास घेऊन येतों. प्रस्तुतहि बोध केला, परंतु आल्यास नक्ष राखून जावे हा विचार. उतर येईल त्याप्रमाणे वर्तनूक होईल. स्वामी पुण्येंवान, प्रतापी आहेत. स्वामीच्या पुण्येंप्रतापें सर्व येश प्राप्त होतें. सारांस, दक्षेणेंचा मनसबा मातबर स्वामींनी योजिला आहे. त्यासी जैसा निकट आसिला तैसेच आज्ञापत्र ताबडतोब पाठवावे. सर्वहि कामे येकीकडे ठेऊन धण्याच पायांपासी सिध आहेत. कोणेविशीं खावंदाच्या आज्ञे-खेरीज नाहींत. सर्व वृतांत राजश्रीनी उभयेतानी शेवेसी लिहिला आहे त्यावरून श्रृत होईल. श्रृत होये हे विज्ञापना.

¶*The Peshwa had asked Sindia and Holkar to return to the south with their forces as he had planned a campaign to wipe out the Nizam and clear the country of Muhammadan rule. Gangadhar Yeshwant and Ramchandra Yadao, Holkar's ministers, inform the Peshwa that the two generals have been called to his help by the Vazir to put down the rebellious Rohillas and would prefer to defer their move southward till they have settled this business.*

---

*No. 41]* *[24-3-1751*

**श्री**

**श्रीमंत राजश्री पंतप्रधान यांप्रति**

वासुदेव दीक्षित अनेक आसीर्वाद उपरी. येथील क्षेम चैत्र शुध नवमी रवि-वार जाणऊन स्वकीये कुशल लेखन केले पाहिजे विशेष. आपण भागानगर प्रांतांत गेलियावर पत्र येऊन बहुत दिवस वर्तमान कलले नाहीं तरी सविस्तर येणारा समागमें लिहून पाठवावें. तेणेंकरून संतोष होईल. या प्रांतींचे कितीक वर्तमान राजश्री बनाजीपंत वकील यानी वरचेवर लिहिलेंच आहे. सांप्रत * गायेकवाड मोडल्याचें वर्तमान (त्या) ही आपणांस लिहिलें असेल त्यावरून विदित होईल. यानंतर इंद्रप्रस्थीचें वर्तमान राजश्री केशवराव हरकारे यानी छ ९ रबिलाखरचे पत्र येथें छ ६ जमादिलवलीं आले तेथें लिहिलें कीं, वजीर छ २६ रबिलवलीं रुकसत होऊन माहाबतखानाचे रेतींत डेरे दाखल जाले. तेथून छ ३ रबिलाखरीं कूच करून किसनदासाचे तल्यावर डेरे दाखल जाहाले. राजश्रीं मल्हारजी होळकरही जवळ आले आहेत. आज उदईक भेटी होतील. पुढें उभयेतानी येमुनापार उतरोन पठाणासी युद्धप्रसंग करून त्यांस अंतरवेदींतून काढावें हा निश्चयें केला आहे. पुढें होईल तें पाहावे. यानंतर फेरोजजंग यानी दक्षणेस यावयाची तयारी केली. जागाजागा पत्रें लिहून फौज दाहा हजार जमा

केली. कांहीं हजुरींहू(न) उमराये तैनात होणार असें करून दक्षणेस यावें. राजश्री बापूजी माहादेव यानी अश्वासन बहुत दिल्हें आहे. या प्रकारचें वर्तमान आलें तें आपणास कळावें म्हणून लिहिलें असे. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

¶*Vasudeo Dikshit to the Peshwa, who is at this time in the Karnatak, informing the latter that the Vazir has taken the field against the Rohillas to oust them out of the Doab. Vigorous action will commence when Malhar Rao joins him. Dikshit also refers to the defeat of the Gaikwad near Satara.*

---

*No. 42]* *[20-2-1757*

## श्रीशंकर

श्रीमंत माहाराज राजश्री
दादासाहेब महाराजाचे सेवेसी

विनंती. आज्ञांकित बापूजी अनंत मुकाम शहर अवरंगाबाद सिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना. तागायत छ ३० माहे जमादिलावल दोन प्रहरपर्यंत स्वस्थि-क्षेम असूं. याजउपरी येथील वर्तमान तर राजश्री जीवनराव कसबे फुलबरी जवळ पडोन * * ठाणियास दहशत टाकली आहे. प्रा। दाभाडीचे ठाणें मोंगलाकडील आहे. त्यास येथून हिमतखानानें कुमक दोनसें गारदी पाठविले ते प्रांत मजकुरीं पावले नाहींत. परतून माघारा शेहरास आले. लोकाच्या तलबा हिमतखानावर बहुत चढल्या, पैसा द्यावयास मिळत नाहीं, याजकरितां लोक पुढें कामाकाजास चालत नाहीं. हिमतखान शहराबाहीर निघत नाहीं. येथें तमाम सावकारापासून नख्त यैवज घेतला होता त्यापैकीं मुरादखानास दीड लक्ष त्याची हुंडी लस्करास पाठविली. सिपाई लोक चाकरी टाकून आपले घरास जातात. याप्रमाणें येथील वर्तमान आहे. हिंदुस्थानचें वर्तमान तर शहरांत की, आबदाली परतून दिलीस आला आहे. सुजायतदवला याजला दक्षणचा सुभा देत होता. त्यास सुजायत-दवल्यानें सुभ्याच्या सनदा न घेतल्या कीं, तमाम तिकडील मन्हाटे आपले इष्टत्वी आहेत. मी तिकडील सुभा करनार नाहीं. याजकरितां नजिबखान रोहिला याणें दक्षणच्या सनदा घेतल्या आहेत. नजिबखानची व राजश्री मल्हारजी होळकर याची लढाई जाहली. होलकराणें शि[ला]ईगिरीची शर्त केली. याजकरितां नजिबखान या देशात सत्वर चालून येत नाहीं. याप्रमाणें तिकडील वर्तमान आहे. येथें धारण तर दर रुपये :

| | |
|---|---|
| ८।२ कणीक | ८। ८ बाजरी पीठ |
| ८८ ८ तांदूल | ८॥॰ बाजरी |
| ८।९ दाल तुरीची | ८८२ तूप |

| | |
|---|---|
| ८॥२ दाल मुगाची | ८८७ तेल |
| ८॥३ दाल मसूर | ८८८ गूळ |
| ८८२ साखर | ८॥९ हरभरे |

येणेंप्रमाणें शहरांत धारण आहे. शेहराबाहेरून रस्त[1] येत नाहीं. येथें आवाई कीं मातुश्री ताराबाई याणी रामराजे तख्तीं बसविले. आतां इकडील बल मोंगलाचें खुटलें. याजकरितां नवाब पुढें कूच करून जात नाहींत. सारांश ताराबाई याची शूत्रधारी होती ते गेली. आतां याचा विलाज सुटला. यैसे वर्तमान आहे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञप्ति.

¶*Bapuji Anant, from Aurangabad, reports to Dadasaheb rumours about affairs in the North. Ahmadshah Abdali, having returned to Delhi, has appointed Najibkhan to the Subha of the Deccan. He further refers to a battle between Malharrao Holkar and Najibkhan in which the former overpowered his opponent.*

---

*No. 43*] [*1751*

श्री

विज्ञापना. साहुकारी वर्तमान आगऱ्याहून आले आहे कीं पठाणास पूर्वी राजश्री मल्हारजी होलकरनीं तटा केले त्यास पठाण घाबरे होऊन परागंदा जाले. त्यानीं व रोहिले यानीं एक होऊन मागती फौजबंदी करून वजिरासी सख्य करावे म्हणून सांगून पाठविले. परंतु वजीरानें न ऐकिता तिरस्कार केला याजवरून एक लढाई जाली. तीन प्रहरपर्यंत जाली. परंतु उभयताहीं कायम राखिले इतके वर्तमान आले. पुढें आणखी एक लढाई मातबर होणार म्हणून. काये होईल ते पहावे. स्वामीचे पुण्यप्रतापे येश मल्हारबास प्राप्त होईल. सलाबतजंग अद्याप हैद्राबादेस आहेत. निघून येण्याचे फिकीरीत आहेत. परंतु हैद्राबादेचा मामला आफ्तर आहे याजकरितां तेथील बंदोबस्त करून निघणार. मार्गीं पाणी नाहीं. एक दोन पाणी जालियावर निघतील यैसीहि बोलणे आहे. गाजुदीखान येथापूर्व आहेत. सांप्रत वर्तमान याप्रा आहे. शेवेशी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*News-letter from the North referring to Holkar's encounter with the Rohillas.*

---

१ धान्याधुन्याच्या खेपा.

श्री

श्रीमंत राजश्री पंतप्रधान
स्वामीचे शेवेशी

विनंती. सेवक अंताजी माणकेश्वर कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. ताा मार्गेश्वर शुध ७ सतमी मुकाम इंद्रप्रस्थ स्वामीचे कृपेकरून शेवकाचे वर्तमान येथास्थित असे विशेष. पूर्वी अजुरदार कासिदांच्या जोड्या तीन पत्रें देऊन विसा रोजांचे मुदतीनें पाठविल्या होत्या त्या सेवेसी पोहचल्या असतील. वृत त्यावरून साविस्तर सेवेसी विदित जाले असेल. येथील वर्तमान तरी आर्जा छ ९ सफर मंगलवार प्रात:काली प्रहरादिवसास नवाब गाजदीखान यांचे पुत्र इमादनमुल्क यांस मीरबक्षीसीची वस्त्रे पातशाहानी दिल्ही. हती व घोडा तुरा कलगी समशेर सिरपेंच व जवाहीर दिल्हे. थोरले नवाब निजामनमुलुक यांस ज्याप्रमाणें दिल्हें होते त्याप्रमाणें यांस देऊन निजामनमुलुक किताब दिल्हा व दक्षणेच्या सुभेदारीचे विडेहि दिल्हे. पातशाहानी पुत्राप्रमाणे पोटासी धरून बहुत गौर केला. नवाब गाजदीखान यांचे घर जस न करावें व मीरबक्षी व दक्षणेची सुभेदारी यांचे पुत्रास व्हावी हा विचार कोणाच्याही चितांत नव्हता. स्वामी कां म्हणतील तरी वजिरासारिखा मुदई[१] रात्रदिवस पातशाहास अर्ज करून मीरबक्षी आपले पुत्रास [पुढील बंद गहाळ] जंगास दाक्षिणेची सुभेदारी द्यावी, सुरजमहल जाट व माधोसिंग यांस आगरे याचा सुभा द्यावा येणेप्राो रदबदली सख्त केली. याउपरी आम्ही कूच करून डेरे बाहीर देऊन राहिलो आणि पातशाहास अर्जी पाठविली जे आम्हास निरोपाचे विडे पाठवावे, आम्ही जाऊं. त्यावरून पातशाहानी आम्हाकडे खोज्या पाठऊन खातरदास्त आमची बहुत केली जे गाजदीखानाचे पुत्रास मीरबक्षी देतो व दक्षणेची सुभेदारी देतो. आगरे अजमेर राजश्री पंतप्रधान याकडे आहे तेसेंच करार आहे. याप्राो खातरजमा करून आमचे डेरे शहरांत आणविले. व वजीर पोटचा लबाड आहे. आम्हासी गोड गोष्टी बोलतो व सरदारांसहि * * * *णियांची लिहितो. परंतु सलाबतजंगास लिहितो जे तुम्ही बल धरून मऱ्हाठियांस झुंज करणे, म्हणजे आम्ही व जाट व राजे घेऊन मालवियांत येतो येसें पत्रावर पत्र रवाना करितो. व सलाबतजंग याची पत्रें वजिरास होती तीं आम्ही वाटेस चौक्या ठेऊन घेतलीं त्यांत लिहिलें जे आम्ही मऱ्हाठियांची पऱ्हवा राखीत नाही. तथापि मऱ्हाठियाची

---

१ बंडखोर दावेदार.

फौज भारी असिली तरी येसमई आम्ही सला करून पुढे यांची फौज चहुकडे गेलियावरी मागती आम्ही समजोन घेऊन, तुम्ही चिंता न करणें. येसीं पत्रें व जिनस आम्हाजवल आहेत. येंदा आम्हास कर्ज मुबलक जालें. परंतु आम्ही छाती थोर करून कर्जदार होऊन चाकरी स्वामीची करून दाखविली. पुढें ऊर्जित करणार स्वामी समर्थ आहेत. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*Antaji Manakeshwar to the Peshwa concerning the intrigues in the capital carried on by the Vazir Nawab Safdarjang with the Jats and Madhosing to drive the Marathas out of Malwa.*

---

*No. 45]* *[13-12-1752?*

**श्री**

**श्रीमंत राजश्री बाबा स्वामीचे सेवेसी**

पोष्य अंताजी माणकेश्वर कृतानेक सा। नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल ता। मार्गेश्वर शुध ७ सतमी मुकाम इंद्रप्रस्थ स्वामीचे कृपेकरून शेवकाचें वर्तमान यथास्थित आंसे विशेष. स्वामीकडील बहुत (दिवस झाले) पत्र येऊन वर्तमान कलत नाही (त्यामुले) चितास समाधान वाटत नाही. (तरी स्वकीय कुशल ले)हून सेवकाचा सांभाल (सदैव करणार स्वामी समर्थ आहे.) छ ९ सफरी गाजदीखान याचे (पुत्रास) * * * * * * पातशाहानी मीरबक्षी(ची वस्त्रे दिल्ही.) हाती घोडा समसेर कलंगी[१] दिल्ही. निजामनमुलुक मरातीब दिल्हा, पातशाहानी कृपा बहुत केली, येविसींचा मजकूर सविस्तर श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामीच्या व राजश्री भाऊसाहेबांच्या पत्री लिहिला आहे त्यावरून सेवेसी विदित होईल. आम्ही स्वामीच्या कुटुंबातील असोन पत्र पाठऊन परामृष घेतला नाही ही गोष्ट स्वामीपासून दूर आहे. हरयेकविसी सांभाल करीत गेले पाहिजे. आमचा घराऊ मजकूर खर्चावेचाविसी उभयेता श्रीमंत स्वामीस लिहिला आहे. तरी लिहिल्याप्रमाणें नेमणूक करून चालविणार स्वामी समर्थ आहेत. प्रस्तुत आबदाली पठाण अटक उतरत आहे. त्याची चिंता स्वामींनी न करावी. वरकड स्वामीकडील व मोगलाचे व आपले फौजेचें वर्तमान सविस्तर लिहून पाठवावयास स्वामी समर्थ आहेत. आम्हावरी कृपादृष्टी करून माया निष्ठुर न करावे. आम्हापासी फौज सरकारचे नेमणुकेची आडीच हजार आहे व पातशाहाच्या वकिलाचे आज्ञेप्रा। फौज आणखी अडीच हजार ठेविली आहे. येकूण पाच हजार आहे. पाच

---

१ पागोट्यावरचा अलंकार.

हजार फौजेने नक्ष स्वामीचा दिलीत ज्याप्रा पनास हजार फौजेचा त्याप्रा सेवकाचा (आहे. आ)मचे विस्मरण पडो न देणे. नेमणुकेची विनती केली आहे त्याप्रमाणे लिहून पाठवावी. वरकड आम्ही आपल्या जीवापेक्षा शंभर वाटे छाती थोर * * * * कर्जे करून स्वामीचे नाव [राखिले] आहे. सेवेसी * * * श्रुत * * होये हे विज्ञापना.

¶*Antaji Manakeshwar posted with the Emperor at Delhi writes news from the court and explains how anxious he is about maintaining Maratha prestige.*

---

*No. 46*] [*13-12-1752*

श्री

**राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री सखारामपंत**
**स्वामीचे सेवेसी**

पोष्य अंताजी माणकेस्वर कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल ताा मार्गेश्वर सुध ७ मुकाम इंद्रप्रस्थ सुखरूप आसो विशेष. आपल्याकडून बहुत दिवस पत्र येऊन वर्तमान कलत नाही याजकरिता चितास समाधान वाटत नाही. तरी येसे सर्वदा न करावे. सदैव पत्र पाठऊन संतोषवीत गेले पाहिजे. आम्हाकडील वर्तमान पातशाहाचे व गाजदीखानचे पुत्राचे व वजिराचे व आबदाली पठाण वगैर कितेव तपसीलवार श्रीमंत राजश्री पंतप्रधान व श्रीमंत राजश्री भाऊसाहेब यासी पत्रे लिहिली आहेत ती आपण आक्षरशाहा वाचून पाहावी. त्याजवरून सर्व विदित होईल. पत्रामध्ये आम्ही आपल्या कितेक मनसव्याच्या गोष्टी लिहिल्या आहेत. त्यास आपण श्रीमंतास विनंती करून ज्या मतलबाच्या गोष्टी लिहिल्या आहेत ते काम करून देविले पाहिजे. आमचे घरचे वर्तमान लेहून पाठविणे. आपल्याकडील दरबारचे वर्तमान व राजकी वर्तमान सविस्तर वरचेवर लेहून पाठवीत जावे. सदैव येणारा वार्तिकासमागमे पत्र पाठऊन संतोषवीत गेले पाहिजे. माया निष्ठुर न करावी. श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामीचे नेमणूक आडीच(हजार फौ)जेची आहे व पातशाहाचे (नेमणुके)ची फौज आडीच हजार येकूण पाच हजार आहे. श्रीमंत पत्रे वकीलास रायाविराजित लिहीता आम्हास अखंडित लिहीता हे विनंती आपण करावी. येविसी स्वामीस रागास आले तरी चिंता नाही. रागास येणार नाही. हे विनंती.

¶*Antaji Manakeshwar writes to Sakharam Bapu from Delhi. He feels offended at not being addressed by the Peshwa in the same manner as the Hingnes.*

2228

No. 47] [1752-53

श्री

हिसेब अजमास माहालप्रांत अंतरवेदी निसबत गोविंद बलाल सुहूर सन सलास खमसेन मया व अल्फ. जमा कारकीर्दीअमल नवलराय निसबत वजीर रुपये : ८९०९४४८≡

यासी आकार सन इसने रुपये

९२६६६॥ परगणे देवलाली.

९७७०७। परगणे बि * * *

७०६२३ परगणे डेरापूर

३०४१६ परगणे * * * पूर

१५०६९८ परगणे बिरवन

७२८२१ परगणे बलबेर

४०५१४ परगणे देवहा

२८५० परगणे नाना महू

---

५५८२९५।॥॰

७६६४४ ॥॰ बाकी सालगुदस्त सन इहिदैपैकीं ८३२१०।.
वजा सिबंदी ६५६५॥।
बाकी रुपये

---

६३४९४०।॰

पैकीं वजा सिबंदी रुपये.

५००० बालाजी गोविंद समेत पालखी

८११५० प्यादे आसामी २४८५

८१०० कारकून आसामी ३०

२२००० गढ्या पाडावयासी

३९०० पडिली घोडीं

---

१२०१५०

बाकी वसुली जमा ११४७९०।॰ रुपये

२६७३७३।।।= वसूल

२४७४१६ ।= बाकी माहालीं

११४७९०।.

पैकीं बाकी २४७४१६।=  रुपये

जमा सालमजकूर बद्दल ७९६६९४८≡

नवलराय जमा रुपये

८९०९४४८≡

पैकीं वजा माहाल मजकूर:

| | |
|---|---|
| २००० | बालाजी गोविंद |
| ८११९० | प्यादे २४८९ |
| ८१०० | कारकून ३० |
| ९४२९० | |

बाकी जमा रुपये १००४ [फाटले] १०।।–

¶*This is a list of the Districts in the North under the management of Govind Ballal and Navalrai, together with the assessment of each.*

---

No. 48]

[11-1-1753

श्री

**अखंडितलक्ष्मी आलंकृत राजमान्य राजश्री**
**दिनकर माहादेव गोसांवी यांसी**

सेवक विश्वासराऊ बलाल नमस्कार. सूरसन सलास खमसैन मया व अलफ. तीर्थरूपांकडून लष्करांतून तुम्हांस पत्र आलें तें पाठविलें आहे त्यावरून सविस्तर कळेल. राजश्री जयाजी शिंदे यांजकडे राजश्री रामाजी अनंत दाभोळकर गेले होते ते मशारनिलेस घेऊन आज तृतीय प्रहरीं येथें आले. याउपरी राजश्री मल्हारजी होळकर याचा रुसण्याचा भाव आहे तोहि दूर होऊन उभयतांचीं समाधानें होतील, कांहीं चिंता आहे ऐसें नाहीं. होईल वृत्त तें मागाहून पाठविलें जाईल. तुम्ही तेथील वृत्त व भावगर्भ सर्व हरद्र मनास आणून वरचेवर लेहून पाठवीत जाणें. आळस येकंदर करीत न जाणें. जाणिजे. छ ९ रबिलौवल.

¶*Vishvas Rao Balal writes to Dinkar Mahadeo that Sindia and Holkar have been reconciled.*

2230

*No. 49]* *[14-1-1753*

**श्रीम्हाळसाईश**

**श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामीचे सेवेसी**

विनंती सेवक हरि नारायेण कृतानेक सां नमस्कार विनंती. येथील कुशल तागाइत पौष शुध १० भानुवासरे मुकाम पुणे जाणून स्वकीय लेखन करावयास आज्ञा केली पाहिजे विशाष. पूर्वी साकल्य वर्तमान दोन तीन पत्री लेहून पा होता तो सेवेसी निवेदन जालाच असल. हलीचे वर्तमान तरी राजश्री त्रिंबकराऊ मामा यानी आम्हास वाफगावीहून येथे बोलाविले आणि साकल्य वर्तमान पुसिले. जे येथास्थित होते ते निवेदन केले तो राजश्री जयाजी सिंदे हेहि येथे आले. त्यानी यानी मजकूर करून रा संताजी वाबले व सेटियाजी राऊत येसे रातोरात वाफ-गावास रवाना केले. तेथून राजश्री मलारजी होलकर पोश शुध ९ मंदवारी येथे आले. पुढे सामोरे श्रीमंत राजश्री राऊसाहेब व राजश्री मामा व रा जयाजी सिंदे येसे जाऊन त्यासी घेऊन येऊन तेसेच वाडियांत मातुश्री ताईसाहेबाची भेटी घेतली. त्यासी दुसरे दिवशी रा मलारबा आपले हवेली बोलत बसले होते. तेथे रा जिवाजीपंत अणा होते त्यासी बोलत होते की आम्हास सत्वर निरोप देवणे. आम्ही फौज धरली आहे. त्यापैकी नवे फौजेस काही आदियापि पुरती नालबंदी दिल्ही नाही. मागील समजावीस पुरती जाली नाही. दिलीवर आहमदखान पठाण येतो त्याची आवाई फार जाली आहे. तो पलीकडेच आहे तो जाऊन पोहचावे म्हणजे गोष्ट कार्याची. नाहीतर तो भारी जालियावर मग कार्यास येणार नाही, येसा कितेक विचार आहे, तरी आम्हास सत्वर निरोप देवणे येसे म्हणत होते. रा बाबूजी नाईक याचे पूर्वीहि वर्तमान सविस्तरे लिा़च होते की ते बरेवजेने फजीत पाऊन गेले. याची येकनिष्ठता स्वामीच्या पायासी आहे. तेथे आणिखी दुसरा अर्थ किमपि दिसत नाही. परंतु घरातच रुसावे, जे करणे ते घरातच करावे परंतु आणिखी विशम भाव कोणे प्रकारे दिसत नाही. आझूणहि येथे आले की लोकिकात जाले आहे की रुसले, ते परिमार्जन करावे. परंतु चितात कित की राजश्री रामचंद्रबावा दरबारी नसावे. येसा कित जो आहे तो काही निवत नाही येसे दिसोन बोलीचालीवरून येते. त्याजकडील फौजेचा मजकूर तरी धिराजी पवार व सेटियाजी जाधव वगैरे किरकोल पथके येसी ठेविलीच आहेत. मुजफरखान गारदी हाहि ठेविला आहे. याचा कारभारी हिराचंद कायेंत येथे येऊन बोली दरमाह दीड लक्ष रुपये घ्यावे आणि मुजफरखान याने चाकरी करावी येसा करार

करून गेला. वीस हजार रुा त्यासी हुंडी करून दिल्हे. वस्त्रे देखील दिल्ही येसे वर्तमान आहे. मागाहून जे होईल ते लिहिले जाईल. बहुत काय लिहिणे ? लोभ कीजे हे विज्ञाप्ति.

¶*Hari Narayan to the Peshwa giving news from Poona.*

---

*No. 50*] [*24-1-1753*

**श्री**

**श्रीमत राजश्री भाऊसाहेब**

**स्वामींचे शेवेसी**

विनंती सेवक अंताजी माणकेश्वर कृतानेक साष्टांग नमस्कार. विज्ञापना. तागायत पौष वद्य ५ पंचमी मुक्काम इंद्रप्रस्थ स्वामींचे कृपेकडून शेवकाचें वर्तमान येथास्थित असें विशेष. प्रस्तुत नवाब वजीर यांचीं पत्रें दक्षणेहून आलीं कीं, स्वामींचा व सलाबतजंगाचा सलूख होऊन, आपण आरकाटाकडे गेले. सरदार घरास आले. यैसें साकल्य वर्तमान वजिरांनीं सांगितलें. या प्रांतींचें वर्तमान तरी पहिले सरदार देशास गेलियापासून सुरजमल जाट, राजे माधोसिंग व राजे बखतसिंग यांसी जाऊन, भेटून आपण दिल्लीस येऊन वजिराची भेटी घेऊन करार केला कीं, नवाब बाहादुर यानें मऱ्हाठियांच्या घरांत पातशाही घातली. पातशाहा व राजश्री पंतप्रधान पगडी बदलोन भाऊ जाले. तेव्हां तुमची वजारत कोठें राहिली ? आगरें, अजमेर दोन सुभे दिल्हे. तेव्हां आमची स्थळें कोठें राहिली ? याउपरी सरदारसुद्धां फौजा दक्षणेंत गुंतल्या आहेत तों आपण नवाब बाहादर ठिकाणी लाऊन, पातशाहा आगरेयास घेऊन * * * उभयेतां राजे वगैरे * * * जमा करून जो खर्च तुम्हांस व पातशाहास लागेल तो देतों आणि दक्षणियांचा अंमल उठऊन देऊ. थोडीशी फौज अंताजी माणकेश्वर दिल्लीस येणार ती मार्गींच ठिकाणी लाऊन. यैसा इमानप्रमाण करून नवाब बहादर श्रावणमासींच ठिकाणीं लाविले. तों तिकडे राजे बखतसिंग अपमृत्यें मृत्य पावले. तेव्हां पातशाहास परिच्छिन्न भये वाटलें कीं, आपलियास मारतील. तेव्हां बापूजी माहादेव यांच्या गळा पाडिले जे. नवाब बहादर मारिला. आता आम्हास आश्रा राजश्री पंतप्रधान यांखेरीज नाहीं. ते दूर राहिले. तुमची फौज आमचे चाकरीस रवाना जाली आहे. ती ग्वालीयेर प्रांतीं आहे. परंतु फौज थोडी आहे. पांच सात हजार फौज जरूर रात्रीचा दिवस करून आणवणें म्हणजे तुम * * * तीन वेळां लिहिलीच आहे. तरी पाऊण लाखाची सनद पाठवावयास स्वामी समर्थ आहेत. लक्ष्मण शंकर व नारो शंकर देशास गेले, याकरितां राजश्री गोविंद बल्लाळ यांजवरी मुबादला यैवजाची सनद पाऊण

लाखाची पाठवावी म्हणजे साहुकारांचा पैका साहुकारांस पावतां करूं. विनंती उदास न करावी. मौजे कामरगाव हा शेवकाचा वतनाचा गांव; त्यास स्वामी कृपाळू होऊन, मौजे मजकूर मुकासा दिल्हा. त्यास च्यार वरसें जालीं. नवाब गाजदीखान दक्षणेस चालिले, तेव्हां आम्ही विनंती करून कामरगांव इनाम आपणांकडे करून घेतला. परवाना घेऊन राजश्री जयाजी आपाजी शिंदे यांजवळ दिल्हा आहे. त्यास मौजे मजकूरचा परवाना स्वामींनीं करून घेतलाच असेल त्याप्रमाणें सलाबतजंगापासूनहि घेऊन ठेवावा. ज्याप्रमाणें स्वामींनीं मुकासा शेवकास दिल्हा, त्याप्रमाणें इनाम गांव करून घ्यावा. इंद्रोजी पाटील स्वामींस * * * प्रकारें करून सांगतील. राजश्री * * * पागा रद-बदली करितील तरी सर्वथा चित्तांत न आणावी. शेवकासच स्वामींनीं गांव द्यावा. येविसीं पूर्वी सेवेशी विनंती लिहिली आहे. देशांत आमची मोठीत दौलत मौजे कामरगांऊ. वणजारा तेथील पाटील सरकारांत नरसिंग दिा पागा याच्या विद्यमानें चाकरीस राहिला. तो गांवची रदबदली करील तरी सेवकाचा अपमान न करावा. गाजदीखानानें गांव दिल्हा अथवा पातशाहानें दिल्हा तरी सरकारचा. आम्ही बारगीर. परंतु माझा गांव मजलाच द्यावा. जतींचेही रुपये येक हजार सर-कारांत आमच्या भावापासून घेतले ते दिल्हे. याउपरी कामरगांवाविसीं आम्हीं वारंवार ल्याहावें यैसे न करावें. थोर कारभार, विस्मरण पडेल. आमचा तों जीवप्राण कामरगांवासी लागला आहे. परगणें कुरोली, मंडराळेंविशई च्यार वेळां लिहिलेंच आहे, आपल्या चित्तास येईल तें करावें. इतकाहि आगत्येवाद सेवकाचा नाहीं यैसा नसावा. आम्ही घरचे खानजाद आहों. जेवढी मातबरी वाढवाल तेवढी स्वामींच्याच कामाची. वरकड सविस्तर पुरवणी आलाहिदा सेवेशीं लिहिली आहे त्याजवरून कळेल. सेवेसी श्रुत होय हे विज्ञाप्ति.

¶*Antaji Manakeshwar reports the intrigues of the Vazir, the Jat and Rajput princes to eject the Marathas from the North.*

---

*No. 51]* *[25-1-1753*

## श्रीम्हाळसाईश

### श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामीचे सेवेसी

विनंती सेवक हरि नारायेण कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती. येथील कुशल तागाईत पौश वद्य ७ गुरुवार मुकाम पुणे जाणून स्वकीय लेखन करा-

वयास आज्ञा केली पाहिजे विशष. येथील वर्तमान तरी राजश्री मलारजी होलकर व जयाजी सिंदे निरोप घेऊन गेले. रा जयाजी सिंदे पौश वद्य ४ सोमवारी संध्याकाली निरोप घेऊन चांभारगोंदियास गेले. रा मलारजी होलकर वद्य ५ मंगलवारी रा बाजी भिवराऊ याचे पुत्र मलारराऊ याचे घरी भोजन करून त्रितीय प्रहरी येथून वाफगावास गेले. श्रीमंत राजश्री राऊसाहेबी उभयेता सरदाराचे बहुत समाधान केले. त्याजवरून सरदारहि उभयेता बहुत संतोश पावले. पौश वद्य ४ सोमवारी उभयेताचे घरास जाऊन भोजनास सांगितले. राजश्री मलारजी होलकर याचे घरी आधी श्रीमंत राजश्री राऊसाहेब उभयेता गेले आणि भोजनास त्यास सांगितले. त्यानीहि ते समई उभयेतास वस्त्रे च्यार कडी येसी दिल्ही. बराबर जे कोण्ही ग्रहस्त होते त्यासहि वस्त्रे दिल्ही. त्याप्रमाणे राजश्री जयाजी सिंदे यानी दिल्ही. स्वामीनी रा जयाजी सिंदे याजकडे कराराची यादी करून पाठविली होती तेणेप्रमाणे सनदा करून दिल्हा. रा मलारजी होलकर याजकडे किरकोल गाव पाटिलकीचे वगैरे सुमारे गाव २५ पंचवीस येसे इनामपत्रे करून दिल्ही. मोगलाई जागीर जेणेप्रमाणे परगणे करार यादी होते तेणेप्रमाणे सनदा दिल्ही. गंगाधरपंत यास गाव सात इनामपत्रे करून दिल्हे व रामाजी यादव यास च्यार गाव इनामपत्रे करून दिल्हे. जयाजी सिंदे यास आकरा गाव इनामपत्रे करून दिल्हे व जागीर यादीप्रमाणे सनदा दिल्हा. त्याजपासून पंचवीस लक्ष रुपये सरकारात द्यावे. निमे रा मलारजी होळकर याजकडे साडेबारा याची याद त्याजपासून हफ्तेबंदीची करून घेतली. केवल निशा तूर्त जाली नाही. परंतु करार जाला त्याप्रमाणे पैका देतील. तूर्त त्याचे समाधान जे गोष्टीने जाले तैसा विचार करून त्यासी निरोप दिल्हा. महिनाभर वाफगाव व कोऱ्हाले इतकी जागात राहवे येसा करार जाला. रा गंगाधरपंत व रामाजीपंत व संताजी वाबले येथेच आहेत. सनदा घेऊन दो चो रोजानी मागून जाणार व आणिखी कितेक त्याचे खासगत सावकारी गुंते व सरकारचे गुता येसे उगऊन जाणार. जयाजी सिंदे व मलारजी होलकर याचे उभयेताचे चितात सेवगाव याचे वाटणीबदल विक्षप पडला येसे बाह्यातकारे वर्तमान आहे. आंतरयामी त्याचे ते जाणत. रा मलारबा तो येकनिष्ठ आहे. परंतु लोकिकात जाले होते [ अपूर्ण ]

¶*In this letter the writer Hari Narayan informs the Peshwa how Malhar Rao Holkar was placated through the mediation of Vishvas Rao and the Peshwa's mother.*

No. 52] [3-2-1753

श्री

श्रीमंत राजश्री पंतप्रधान
साहेबाचे सेवेसी

॥ऽ श्रीसकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्ये श्रो दताजी सिंदे कृतानेक दंडवत विनंती. येथील क्षेम ता। पुश वदे आमावाशापावेतो साहेबाचे कृपेकडून वर्तमान येथास्तित आसे विशेष. श्रीमंत राजश्री दादासाहेबा-बराबर तुमची रवाणगी केली आहे. त्यास ते मजल दरमजल जातात, तुम्ही आद्यापि गेला नाही म्हणौन आज्ञा केली. त्यास आपलीहि तयारी जाहाली आहे. त्यास येका दोन रोजा निघोन मजल दरमजल जाऊन श्रीमंत राजश्री दादासाहेबा-पासी पोहोचतो. साहेबास कलावे म्हणोन लिहिले आसे. विशेष काये लिहिणे हे विज्ञापना.

¶*Dattaji Sindia promises to join the Peshwa's forces without loss of time.*

---

No. 53] [8-2-1753

छ २१ जालौवल

श्री

श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामीचे शेवेसी

विनंती. सेवक अंताजी माणकेस्वर कृतानेंक साष्टांग नमस्कार विज्ञापना. सेवकाचें वर्तमान ता। माघ शुध ५ पंचमी मुकाम इंद्रप्रस्थ येथास्थित असें. आम्ही हस्तनाफुरास विजयादशमीस दाखल जालियातागाईत कासीद जोडी सात अजुरदार करून सविस्तर वर्तमान दिलीचे पातशाहा व वजीर व मीरबक्षी वगैरे यांचे व रजपुताचें व जाटाचे सादेंत पठाणाचें आदिकरून सविस्तर विस्तार सात वेला लिहिला तोंच मागती कोठवरी ल्याहावा ? मागील विस्तार याजकरितां न लिहिला. परंतु येकाहि पत्राचे उतर न आलें, याजवरून आपूर्व आहे. आसों. प्रस्तुत आबदाली पठाणाची फौज भारी अटक उतरली. याउपरी तेथेच मुकाम केला आणि पुढे त्यानी आपला येल्ची[१] मातबर इतबारी दोन हजार फौजनसी दिलीस पातशाहाकडे पाठविला, तों आजी तीन दिवस येऊन दिलीस दाखल जाला. त्यांस सालगुदस्ता पठाण आटक उतरला होता ते समई नेवाब[२] बाहदर यानें आबदाली पठाणास रुपये पनास लाख देऊन समजाऊन मागती

---

१ येल्ची–वकील. २ खोजा जावेद.

2 The Emperor's favourite, murdered in 1752.

अटकपार करून दिल्हा. जे समई सरदार दिलीस आले त्या समयातील गोस्टी हे आहें. याजमुळे सरदाराचाहि उपर उतमच जाला. आसों. प्रस्तुत नवाब बाहदर मृत्य पावला. अता पठाण मागती आटक उतरून हदेवरी येऊन मुकाम करून येलची येथे पाठविला. त्याचा यांचा जाबसाल जाला कीं सालगुदस्तां नवाब बाहदर याने रुपये पनास लाख दिल्हे ते साल गुदस्ताचे दिल्हे. पुढे साल दरसाल आमचे पनास लाख रुपये द्यावे. त्यास येंदाचे सालचे पनास लाख रुपये देणे म्हणजे रुपये घेऊन मागती अटक उतरून जाऊन. नाही तरी दिलीस येतों. जुझावयाची तयारी करणे. येणेप्रा जाबसाल येलचीचा जाला. ते दिवसी येलचीस वस्त्रें मेजमानी दिल्ही आणि उतर दिल्हे की, याचा जाबसाल आम्ही आठा दिवसानी देऊन. त्याजवरी पातशाहानी वजीर व तमाम आमीर बोलाऊन दरबार केला. सर्वास पुसिलें की, याउपरी पठाणाच्या येलचियासी जाब काये द्यावा तो सांगणे. नाहीतरी तो दिलीस येईल. कदाचित दिलीस न आला तरी लाहोर वगैरे तीन सुभे मिलोन दाहा क्रोडींचा मुल्क पठाण घेतील. नाही तरी जुझावयाचा सरंजाम करून सारें सरदार आटकेवरी जाणे. त्याजवरून सर्वानी येकच उतर दिल्हे की, हजरत आबदालीची मोहीम मऱ्हाठियानी कबूल केली. हजरतनी त्यास आजमेर आकबराबाद दोंन सुभें नामांकित दिल्हे व दरोबस्त बाविसा सुभियांची चौथ दिल्ही व पैका देऊन सर्व येख्तार मराठियांचा ठेविला. हे मसलत मऱ्हाठियासी पुसावी. त्याजवरी नवाब वजीर आखेर थोंर त्यानेच जाबसाल सर्वासी केला की मऱ्हाठें साल गुदस्तां अंतरवेदीत कामास आलें. पुढेहि चालीस हजार फौज त्याची दो महिनियानी येऊन दाखल होईल. आजी दिलीतहि त्याची फौज पांच हजार आहें. आणखी पाच हजार हे आठापंधरा दिवसा जमा करून दहा हजार फौजनसी आजी तयार आहेत व आपण तीस हजार फौजनसी आजी तयार आहे. येकूण मऱ्हाठेसुधा आजी चालींस हजार फौज माझी आहे.

¶*Antaji Manakeshwar, left with the Emperor with an army of five thousand while Sindia and Holkar have gone South, writes home about the situation that has developed as a result of the menace from the Abdali, who advancing as far as Attock, sent his envoy to Delhi to demand fifty lacs as his annual subsidy. The counsellors advised the Emperor to refuse the Shah's demand as the Marathas have agreed to drive away his enemies in return for Ajmer, Akbarabad and the chauth of all twenty-two subhas. The letter is incomplete.*

2236

No. 54] [20-2-1753

# श्रीम्हाळसाईश

## श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामीचे सेवेसी

विनंती सेवक हरि नारायेण कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती. येथील कुशल तागाईत माघ बहुल त्रितीया भौमवासर मुकाम कोन्हले नजीक गंगातीर जाणून स्वकीय लेखन करावयास आज्ञा केली पाहिजे विशष. स्वामीकडील वर्तमान बहुत दिवस कळत नाही. आम्ही येथून पाच सात पत्री साकल्य वृतांत लेहून पाठविला ते सेवेसी पावला किंवा नाहीत हे न कळे. कासीद जोडी येक पाठविली व जासुदाची जोडी दोन वेला दोन पाठविल्या आणिखी कोण्ही येथून जोड्या रवाना जाल्या त्याजसमागमे च्यार पत्रे पाठविली परंतु उतर आदियापि आले नाही. येथील वर्तमान तरी राजश्री मलारजी होलकर माघ शुध १ रविवारी सा घटिका दिवसा वाफगावाहून स्वार होऊन घोडनदीचे काठी मुकाम लाखणगावावर केला. तेथून मजल दरमजल मुकाम मजकुरास आले. येथे या प्रांती तमाम गावगणा बाभला तोडून फिरंगी कळेचे गाडे करवीत आहेत. पुणियाहून येक गाडा फिरंगी समागमे घेऊन आले त्याप्रमाणे येथे करितात. श्रीमंत राजश्री राऊसाहेबाचे पत्र येथे यास आले की तुम्ही सिनरचे ठाणे घेऊन देणे. त्यासी रा घिराजी पवार यानी सिनरास पाठविले. त्यानी त्याजसमागमे दोघे भले माणूस येथे पाठविले. सिनरकराचे मजकूर की जेणेप्रमाणे पूर्वी मोगलाचा इजारा होता तेणेप्रमाणे सरकारात कबूल करून रुपये घ्यावे, परंतु ठाणे न घ्यावे; येसा हेत धरून येथे आले. त्यासी यानीहि येक साल इजारा त्यापासून घ्यावा येसा विचार केला आणि मालजामीन व फैलजामीन त्यानी द्यावा येसा निश्चय केला परंतु मालजामीन त्यासी कोण्ही होत नाही. मग यानी त्यास परनिष्ठ गोष्ट सांगितली की तुम्हास ठाणेयाचे आगत्य आसल तर मालजामीन मातबर देणे, नाहीतर ठाणे खाली करून देणे. इतकियावर येकत नसाल तर आम्ही येऊन तेथे लागलो मग कोण्हाचे येकणार नाही, ठाणे घेईन तेव्हा उठण. त्याजवर सिनरास राजश्री फतेसिंगाकडे जाबसाल लेहून पाठविला आहे. तेथून त्याचा जाब आलियावर जो निश्चय होणे तो होईल. राजश्री नवाब सलाबतजंग याचे येथे वर्तमान आहे की नांदेडावर गेले. वराड प्रांती रघोजी भोसले यानी धामधूम मांडली आहे म्हणून तिकडे जाणार आणि नवाब याची बातमीहि याजपासी बसली आहे. दिलीकडील वर्तमान येथे आले होते की पातशाह आपले हवेलीत आहेत. मनसूर अलीखान आपले हवेलीत आहेत.

काबलास आवदुलखान पठाण आटक उतरोन आला. त्याची थोडीसी फौज लाहोरास आली. मीरमनू ते येकत्र होऊन दिलीवर येणार म्हणून वर्तमान आहे. माधोसिंग जयनगरकर यानी फौज जमा केली आहे म्हणून वर्तमान आहे. येथे वकील हिंदुस्थानचे तमाम आले आहेत. माधोसिंगाचे वकील येथे आहे. बिजयसिंग, बखतसिंगाचा लेक, याचा वकील येथे आला आहे. सुरजमल जाट याचा वकील आला आहे. गोपालसिंग करोलीकर याचा वकील येथे आहे. याजपासी तूर्त फौज तीन च्यार हजार जमा जाली आहे. त्रिचनापलीकर महमदखान त्याचे पत्र यास आले होते. त्यात मजकूर लिहिला होता की तुम्ही आम्हास वडील आनुर्दीखानाचे जागा आहा. आम्ही इकडे फुलचेरीचे फिरंगी याचे पारपत्य केले. पाच हजार पायेदल गारद केले. पंधरा हजार फौज लुटली आणि मातबर फिरंगी कैद केले. तूर्त आम्हापासी पायेदळसुधा चालीस पनास हजार फौज आहे. तुमच्या दरशनाचा हेत होता. ते तुम्हीहि या प्रांती येणार म्हणून येकिले होते त्याजवरून संतोश जाला होता. त्यास तुमचे येणे तो जाले नाही. तर पूर्वी गाजदीखानाचा कागद पाठविला होता की आमच्या हमराह होणे व पातशाही परवाना पाठविला की गाजदी-खानाचे ताबे राहणे. त्यासी ते गोष्ट तो तैसी जाली. तर फिरोन पातशाही परवाना आलादा आमच्या नावे होये येसे केले पाहिजे. तूर्त तुमची पत्रें श्रीरंगपटणचा राजा व आणखी मातबर आम्हासमागमे आहेत व गरमातबर पालीगर यास पत्रे पाठवणे की तुम्ही जैसे त्रिचनापलीकराचे हमराह तैसे राहणे. यैसे त्याचे पत्रे यासी आली होती त्यासी उतरेहि दिल्ही. राजश्री रावो गोविंद याजवर रागे फार आहेत. त्यानी मौजे जांबगाव पाा गांडापूर येथील वसूल घेतला आणि गावास चिठी पाठवीत. तेव्हा त्याचे माणूस जाऊ सांगे की राा मलारजी होलकर बदलून चालिले. म्हणून त्या गावकरियानी यास येऊन सांगितल. त्याजवरून रागे त्याजवर फारच आहेत. म्हणतात की आम्ही बदलून चालिलो असतो तर हा येथे कैसा राहता, हे उगेच आमची बदनावे करितात, हे काये गोष्ट आहे म्हणून त्याजवर रागे भरायास कारण इतके. मागे पुणियास राा गंगाधरपंत राहिले होते. सरकारातून सनदपत्र कराराप्रमाणे करून घेऊन, नायगावास त्याचे घरी पुत्राची मुंज आहे तेथे आले आहेत म्हणून वर्तमान आहे. मातुश्री आईसाहेबाची पत्रे याजकडे येतात. परंतु याचा येक भाव आहे. यासिवाय आणखी आढलत नाही. स्वामीचे पत्र यास आले त्यात मजकूर लिाा होता की तुम्ही फालगुणमासपरियेंत या प्रांतीच राहणे. कदाचित जाणे जाले तरी सेंधवे नागलवाडी पुढे न जाणे म्हणून लिाा होते, यैसे हे बोलत होते.

2238

सिनरची मामलत चुकल आणि गंगाधरपंत येथे येतील. मग पुढे कुचाचा मजकूर होणे तो होईल. मजलाहि पुसत असतात की श्रीमंताकडील काही वर्तमान आले की नाही? तरी मजला आज्ञापत्र पाठवणे त्यात मजकूर मजला त्याह्यायोग्य आसल ते लिहिला पाहिजे. येथे सरदार याजपासी धिराजी पवार आहेत त्यांची पाचाशा स्वाराची बोली पुत्राचे नावे केली आहे. त्याचा जैसा सरंजाम पहिला आहे तो सरकारातून करून घ्यावा म्हणून बोली आहे. रा उदाजी पवार आहेत त्याचा पुत्र यानी आपल्यापासी ठेवावा येसा विचार आहे. मुजफरखान गारदी येथे येणार म्हणून वर्तमान आहे. यानीहि येथे दोनसे गारदी दाहावीस फिरंगी ठेविले आहेत. तोफाचे सामान बहुत उतम करितात. दररोज तोफापासी जाऊन बसावे आणि तेथेच कारभार करावा येसा इश्क तोफेच्या गाड्याचा व तोफेचा फार लागला आहे. तूर्त हें विनंतीपत्र याचे कासिदासमागमे पाठविले आहे. येथून कूच जालियावर साकल्य वृतांत सेवेसी लिहिला जाईल. येथे मजपासी जासुदाच्या जोडे च्यार राहिले आहेत ते वरचेवर वर्तमान पुणियास लेहून पाठवितो. सेवेसी श्रृत होय. स्वामीकडील साकल्य वृतांत आज्ञापत्री लिहिला पाहिजे. तेणेकरून सेवकास आल्हाद होत जाईल. बहुत काय लिहिणे कृपावृधि कीजे हे विज्ञाप्ति. पुणियात गेलो होतो तेव्हां श्रीमंत राजश्री राऊसाहेबी आज्ञा केली की तुम्ही वरचेवर वर्तमान आम्हापासी पाठवीत जाणे, आम्ही लस्करात पावते करू, येसी त्याचीहि आज्ञा आहे. येथून कोण्ही याचे कासीद येतील मजला कलतील त्याजसमागमे वर्तमान सेवसी लिहीन व कूच जालियावर सरकारची जोडी रवाना करीन. बहुत काय लिहिणे हे विज्ञाप्ति.

¶*This letter refers to the reconciliation of Holkar and the Peshwa. It also mentions the keen interest he has evinced in artillery on the European model.*

---

*No. 55*] [*20-2-1753*

**श्री**

**श्रीमंत राजश्री पंतप्रधान तथा राजश्री**
**भाऊसाहेब स्वामींचे शेवेसी**

विनंती सेवक अंताजी माणकेश्वर साष्टांग नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल तागाईत माघ वद्य ३ तृतीया, मुक्काम इंद्रप्रस्थ सुखी आसों विशेष. दिल्लीस आलियातागाईत दाहाबारा जोडी अजुरदार करून पंधरा रोजांचे पधरा

रोजां वर्तमान पातशाहाचें व वजिरांचें व आमिरांचें, पठाणांचें, रजपुतांचें, जाटाचें वर्तमान तपशीलवार सात बंद लिहीत गेलों. उतर येक मात्र जाब भालकीचे मुक्कामींचा आला. च्यार पांच जोडी दिल्लीचे कासीद, राजश्री दामोदर माहादेव वकील यांचें वळखीचे होते, त्यांजवळ पत्रें कांहीं लस्करांत, कांहीं मार्गी, कांहीं नाशकाआसपास येकूण च्यार जोडियांनीं पत्रें दामोदरपंतांजवळ दिल्हीं; त्यांनीं सेवेसी दिल्हीं असतील किंवा नाही. दूर पंथ; सरकारच्या कामांकाजांचे मतलब अक्षरशा पत्रें वांचून उत्तराची सविस्तर आज्ञा करणार स्वामी समर्थ आहेत. आबदाली पठाण आटक उतरला. परंतु पुढें येत नाहीं. त्याचा वकील येलची येथें आला. पातशाहांची भेटी जाली. त्यांस आणखी पंधरा रोज ठेऊन घेतला आहे आणि फौजांची तयारी होत आहे. आमची पहिली फौज चार हजार आहे आणिखी वजीरांचे आज्ञेंवरून चिरंजीव तात्या, आमचें पुत्र, ग्वाली-येरीहून महिनेदार जाट, पठाण मिळोन येक हजार स्वार, माघ शुद्ध ९ दिल्लीस दाखल जाले. परंतु दिल्लीचा कारभार आहे. बाहेर निघावयास येक मास लागेल. पुढें पठाणाची यांची गांठ चैत्रमासीं पडेल. आसो. तूर्त राजे माधोसिंग जैनगरींच इतके दिवस होते, व राजे बखतसिंग यांचे पुत्र आपलें ठिकाणींच होते. सुरजमल जाट दिल्लींतून गेलियातागाइत आपल्या मुलुकांतच आहे. प्रस्तुत पातशाहाचा व वजिराचा कजिया घरांत वाढला आहे. वजिराचे लगामीं जाट व रजपूत पुरते आहेत; तेव्हां वजिराचा जोड भारी. वजीर दुसरा पातशाहाच आहे. तुराणियांमध्यें फूट आहे, च्यार चौवरचे, कोणी कोणाचे हुकमांत नाहीं. यैसें असतां नवाब बाहादर यांनीं सारी पातशाहाची चौथ व दक्षेणची येख्त्यार व अजमेर आगरे दोन सुभे दरोबस्त दिल्हे व पहिलें फार करून हिंदुस्थान तुमचेच पदरीं पडिलें. लाहोरचे चौथाईचा तगादा रोज मीर मन्नूच्या वकिलास लागलाच आहे. याजमुळें जाट, रजपूत, वजीर, कोणास चित्तापासून समाधान नाहीं. याजमुळेंच खोज्या[1] मारिला गेला. ऐसियासी सलाबतजंगांसी स्वामींनीं सल्ला केला, हें तुराणी यांस कांहीं समाधान नाहीं. परंतु वजिराचें मनांत समाधान कीं, जालें तें उतम जालें. स्वामींनीं सल्ला केलियाउपरी, श्रीमंत् राजश्री दादासाहेबांची रवानगी गुजराथप्रांतीं केली. त्यांचीं प्रांत खानदेश येथील पत्रें, वकिलास व आम्हांसही आलीं कीं, अपण सत्वरच अहमदाबादेस येतों. तिकडील सावेंत लिहिणें. त्याजवरून आमचीं व वकिलांचीं पत्रें व पातशाहांचीं पत्रें श्रीमंतांस गुजराथप्रांतीं गेलीं आहेत कीं, सत्वर

---

१ खोजा जावेद.

येणें; त्यांचीं उत्तरें काये येतील तीं पाहावीं. नबाब वजीर यांसी पत्रें देशींहून, राजश्री सुभेदारांचीं व दामोदरपंतांचीं येत असतात. राजश्री आपांचीं पत्रें आढळलीं नाहींत व येतही नाहींत. नबाब वजीर दक्षणेचे वर्तमान पंधरवडियाचे पंधरवडा सांगत असतात कीं, सरदार लौकरी येत नाहीं. मल्हारराऊ चाकरी टाकून मोगलाईंत येतात. वाफगांऊचा वाडा पाडिला, घरें जाळलीं. श्रीमंत राजश्री पंतप्रधान व नबाब सलाबतजंग अक्त्रिम येक जालें. उभयेतां मिळोन मल्हारराऊ यांजवरी इतराजीर्हा करणार. गाजदीखानांनें सरदार वगैरे सर्व जो मुल्रुक, गांवखेडें दिल्हे त्याप्रमाणें सलाबतजंगापासून वेऊन सरकारांत ठेविलें. कोणास कांहीं दिल्हें नाहीं. त्याजप्रमाणें वकिलाचे जाहापूरही दिल्हें नाहीं. म्हणून सरदार, वकील सर्व खट्टे आहेत. येकदिल कोणी नाहीं. श्रीमंतांनीं सर्वांस जाब दिल्हा जें, तुम्हांस गाजदीखानांनीं हें देणें दिल्हें होतें. पुन्हा पातशाहा गाज(दी)खानांच्याच पुत्रास सुभा देतील. तरी मागती आम्हीं तुम्हांस देऊं. यैशा खबरी तेथून लिहिणार वजिरांस व बापूजी माहादेव यांसही लिहितात. येथें सारें दिल्लींत लोक, वजीर, वकील बोलतात. वजीर राजश्री सुभेदारांस लिहितात जें, उत्तम पक्ष राजश्री पंतप्रधान तुम्ही येक आसावें. तथापि तुमचा त्यांचा रिणानुबंध तुटला तरी आम्ही सर्व प्रकारें तुमचें आहों, यैसें लिहितात. चित्तापासून आमचा संतोश तरी वजिरांसही नाहीं व कोणांसही नाहीं. जितकी घरांत फूट होईल तितकी उतमच आहे. फौजाही सरदार या प्रांतें लौकर न येत तर फार बरें. मागेंच यांनी दंगा माजऊन मुल्कांत फितुर करावा हा निश्चये होता, परंतु फौज स्वामींची दिल्लींत आली. सर्वांची रजाबंदी आम्ही केली. त्याजमुळें जिकडील तिकडे दबलें. आतां घरच्या फितुराच्या गोष्टी तमाम दिल्लींत लोक बोलतात. मल्हारबांनीं चाकरी सोडली. या मुलकांत मल्हारबांचा लौकिक मोठा. यांत मागती रजपूत व जाट येकत्र वजिरांनीं करावें यैसा करार करून सर्वांस बोलाऊं गेलीं. बहुधा सर्व येतील. आम्हांस सांगतात पठाणांसाठीं फौजा जमा होतात. पठाण इतकियांत दबोन राहिला तरी आणि(खी महि)नाभर सरदारांची वाट पाहावी कीं, सरकारचे चाकर होऊन येतात किंवा बागी[१] होऊन येतात. मग जें करणें तें करितील. व स्वामींचीं आज्ञापत्रें आम्हांस १ येक व बापूजी माहादेव यांस येक आलें कीं, याउपरी सलाबतजंगाचा आमचा अक्रुत्रिम सला जाला. तुम्ही याउपरी गाजदीखानांच्या पुत्रांस तेथेंच राहूं देणें. त्यांची मीर बक्षी त्यांस आहे. दक्षणेची सुभेदारी साफ त्यांस न देणें, त्यास इकडे वेऊन न येणें. सालाबतजंगांस सनद खिलत देवविणें, यैसी आली. यापूर्वी नवाब

१ बंडखोर.

वजीर त्यांच्या चित्तांत हेंच होतें. त्याजवरून नवाब वजीर यांनीं आम्हांस नेऊन सांगितलें कीं, राजश्री पंतप्रधान यांच्या चित्तांत असेल त्यांस मजला दक्षणेची सुभेदारी देणें. तुम्ही त्यांस लिहून मजला त्यांचें पत्र आणणें. त्याप्रमाणें सनद त्यांस देईन. चित्तापासून सलाबतजंगांकडे मनोगत वजिरांचें आहे. परंतु स्वामींसही पूर्वीं मुजरद जोडी पाठविली आहे. तरी साफ नवाब वजिरांस पत्र आमच्या कागदाबराबर पाठवणें कीं, नवाब सलाबतजंगांस दक्षेणेची सनद वस्त्रें देणें. माझी मालुमीतही[1] लिहिणें व बापूजी माहादेव यांसही मागती साफ लिहिणें कीं, तुम्ही सलाबतजंगाचेंच साहित्यें करून सनद वजिरांपासून देवविणें. गाजदीखानांच्या पुत्रांस सनद न देवणें. दिल्ही तर आम्हांस शब्द नाहीं, यैसें लिहिणें. स्वामी म्हणतील कीं, यैसें कायें कारण? तरी वकिलांचा आम्ही गिला करीत नाहीं. स्वामींची आज्ञा आम्हांस व त्यांस आली त्याप्रमाणें आम्ही उभयेतांनीं वर्तणूक करावी. तथाप वजीर आजी जबरद(स्त) दुसरा पातशाहा व तमाम रजपूत, जाट त्यांचें लगामीं. त्याची मीर-बक्षीचा पातशाहाचा या दिवसांत कलहे आहे. वजिरांचें मनोगत सलाबत जंगांसच आसावी यैसें असतां, स्वामींवरी ठेविलें आहे. त्यांचें पत्र मजला येईल तेंच करीन. परंतु दक्षणेहून किताका गृहस्तांचीं लिहिलीं येथें येतात कीं, मागती गाजदीखानांचा पुत्र उभा करावा. त्याजवरून बापूजी माहादेव, दक्षणेच्या लिहिल्यावरून, मागती गाजदीखानांच्या पुत्रांचें साहित्यें करूं लागले. गाजदीखानांच्या पुत्रांनीं गुलसनाबाद साहाणक वगैरे त्यांची रजावंदी कळेल तैसी करून दिल्ही. त्यांनीं दक्षेणची लिहिलियारून हा मागती उत्पात मांडिला. वजीर याजमुळें बापूसी गैररजावंद आणि वजिरांसी यांनी खांदे[2] बांधिला आहे. वजिरांची जंड रजपूत, जाट सुद्धां भारी. येखांदा डोहणा जाला तरी उत्तम नाहीं. याजकरितां आम्ही वजिरांचा लगाम राखिला. बापू मागती मीर बक्षीस सुभेदार करावयाची तजवीज करितात तें कांहीं आम्हांस कळों देत नाहीं. आमचे माणूस कोठे जाऊं देत नाहींत. आमचे घरीं कोणांस येऊं देत नाहींत. नवाब वजीर आजी पांच महिने रोजमरा फौजेस द्यावयास तयार. परंतु तेही गोष्टी होऊं देत नाहीं. आम्ही आग्रह करावा तरी याची जंड भारी. मानमानें तैसें येखादें तुफान घेऊन आमचे * * च बुडवितील याजकरितां आग्रह न करितां त्यांचेच मर्जीनें आसों. परंतु हें केवळ स्वामींची मर्जी न राखीत. वजिराची मर्जी न राखीत. वजीर हातचा गेला तरी मोठा बखेडा

---

१ माहिती. २ शत्रुत्व.

होईल, याजकरितां वजिरांस मात्र येकांतीं आम्ही राजी राखिलें कीं, तुम्हांस इमारत श्रीमंतावरी. मी खासगी चाकर आहे. श्रीमंत तुम्हांस निराळे नाहींत. तुम्हांस श्रीमंतांचा कागद बजिन्नस आणून देतों जें. सलाबतजंगांस वस्त्रें देणें, सनद देणें. आम्ही सर्वप्रकारें नवाबाचे आहों. माझीं मालुमातीची पत्रें आणून देतों, तोवर साहेबीं सनद महकुफ करावी यैसें अंत्र राखून सेवेसी पूर्वीही येक जोडी रवाना केली व हाल्लीं जोडी रवाना केली असें. तरी येविशीं सविस्तर पत्र वजिरांस लिहिणें व बापू(स) ही लिहिणें. गाजदीखानांच्या पुत्रांस साफ न देणें म्हणून स्वामींचें आज्ञापत्र आम्हांस व बापूंस आले म्हणून आजी आम्ही राजश्री बापूंसही साफ जाब दिल्हा कीं, तुम्ही हें श्रीमंतांचें मर्जीखेरीज करितां हें कामाचें नाहीं व वजीरही राजी नाहीं. साराच डोहणा कोणांच्या बोलें करितां? हें कार्याचें नाहीं. याउपरी श्रीमंतांचें दुसरें उत्तर येतोंपरियेंत दोघांस महकुफ राहूं देणें परंतु गाजदीखानांच्या पुत्रांस सनद न देणें. तें ते नाइकेत म्हणून व्दाही दिल्ही, त्याजवरून परम श्रमी जाले व वजिरांस अर्जी लिहिली कीं, हजरत श्रीमंतांचें पत्र सत्वरच हजरतीस येते. त्याप्रमाणें हजरत ज्यांस देणार त्यांस देतील. पत्र खामखा सत्वरच येत. याप्रमाणें काम करून महिना सवा महिनीयाचे मुदतीनें काम पाडिलें. याजकरितां राजश्री बापूजी माहादेव आम्हांवरी फार श्रमी जाले. इतराजीही फार केली, ती पत्रीं लिहितां न ये. परंतु स्वामींची मर्जी सलाबतजंगांकडे; तेच वजिरांची मर्जी. यैसें असतां याचे जालहापूर व कोणांचे मुलूक कांहीं कोणांस नाहीं म्हणून देशींहून कितीकांनी यांस लिहिलें; त्याजवरून यांनी मागती लालुच पाहून या उत्पातांत पाडिलें म्हणून आम्हां यांची बेमर्जी आजी पांचा महिन्यांत केली कीं, खावंदाची मर्जी नाहीं. वजीर आजी बिघडतो. तमाम मुलुकांत डोहणा होईल म्हणून अमर्यादेनें विनंती केली. याची आज्ञा स्वामींनीं जें करणें असेल तें सविस्तर निवडून सेवकास करावी. काडीचा गुंता ठेऊन न ल्याहावें. नाहीं. जे मर्जी स्वामींची असेल त्याच प्रमाणें वर्तणूक करून. वजीर रजपूत येक, मीरबक्षी, खानखाना कमरदीचा पुत्र येक. यांत आपल्यांत आपण कलहे मोठा. बापूंस मोगलीयांकडे होणें. याजमुळें वजीर पहिल्यापासून हिंदुस्थानाचा बिघाड रजपुतांस घेऊन करणार. आम्ही चोरून वजिराचा दोर राखिला. उजागर तों बापूंची आज्ञा येक गोष्टी कोणांसी बोलावयास संमंध नाहीं. परंतु सरकारचें काम बुडतें. याजकरितां वजिरांची रजावंदी सर्वप्रकारें आजीतागाइत राखिली. कोठें फितूर होऊं न दिल्हा. आतांही स्वामींचें उत्तरें येईतोंपरियेंत बंदोबस्त राहील. पुढें जें होणार तें हो. आमचें पाघरूण थोर नाहीं. फोडून लिहितां येत नाहीं. दुसरें, वजिरांची रजावंदी न राखावी, त्यानें चाकरीस

बोलाविलें तरी न जावें, गाजदीखानांच्याच पुत्रांस दक्षेण व्हावी. यैसेंच असिलें तरी सेवकांस साफ ल्याहावें. आमचें कांहीं येथें ठेविलें नाहीं. आजीतागाइत फौज चाकरीस पातशाहांच्या, वजिरांच्या व तुराणियांच्या बापू जेथें जेथें पाठवीत असेत तेथें तेथें पाठवीतच आहों. खर्चास कोठें कांहीं आम्हांस तरी आलें नाहीं. वजिरांची आमची अंतस्तें वळख म्हणून वजीर मात्र जें बोलणें तें बोलत असतात. प्रस्तुत वजिरांचें मतें पातशाहांची व आपली चाकरी मात्र करावी, मीरबक्षींकडे न जावें. बापूंची मर्जी तूर्त वजिरांकडे येकंदर चाकरीस साफ न जावें. मीरबक्षींस दक्षेण व्हावी ही चीड मोठी वजिरांस. या पेंचांत आम्ही पडिलों आहों. परंतु स्वामींचें आज्ञापत्र यें तोंवरी वजीर राजी राखोन त्याची चाकरी करून, मीरबक्षींची दक्षेणेची सनद होऊं देणार नाहीं. परंतु वकील कांहीं आमची स्थित राहूं देणार नाहींत. स्वामींस देशांत बहुतांस गिल्ला आमचा फार लिहितील. आम्ही गरीब आमचा बच्याव कैसा होतो? राजश्री जयाजी शिंदे यांचें पत्र वजिरांस, वकिलांस आजीतागाइत कांहीं आलेंच नाहीं. हें काये कळत नाहीं. सारांश स्वामी थोर प्रिथ्वीची पालण करितात. राजश्री मल्हारबा थोर सरदार सलावर्तीचे आहेत. स्वामींनीं सर्व प्रकारें त्याचा गौर करून समाधान करून, उभयेतां सरदार यांची रवानगी सत्वर या प्रांतें करावी हें उत्तम आहे. या मुलुकांत लोकांनी व दिल्लींत मनमानेसारिखे तर्क केलें जें, याच्या घरांत फूट जाली. हें यैकोन सर्वांस हर्षच जाला. तर यैसें न करावें. सरदारांवरी कृपा करूनच त्यांची रवानगी करावयास स्वामी समर्थ. म्हणजे सर्वांचीं तोंडें काळीं होतील. आणि कोणींच लबाडी करणार नाहीं. स्वामींनीं तो कृपाच केली असेल. परंतु येथें थोरथोरच बोलतात, याजकरितां लिहिलें आहे. श्रीमंत राजश्री दादासाहेब या प्रांतें कदाचित आलेच तरी संवत्सर प्रतिपदेइतके येतील. परंतु श्रीमंत आले तरी सरदारांची रवानगी जरूर पाहिजे. स्वामी म्हणतील कीं, इतकी गोष्टीचें प्रयोजन वारंवार सरदारांचे लिहावयाचें काये? तर इतका विस्तार पत्रीं लिहिणार नाहीं. सेवेसी आलियाउपरी रुबरू विनंती करीन; त्या वेळेस स्वामींच्या चित्ताची निशा होईल. मुख्यें चित्तांत असलें तरी साफ वजिरांस पत्र आमचें मालुमांत घालून, सलाबतजंगाचें सनदेचे ल्याहावें. नाहीं, गाजदीखानांच्याच पुत्रास देणें असेल तरी तैसेंच लिहिणें व आम्हांस साफ ल्याहावें जें, राजश्री बापू माहादेव म्हणतील तेंच करणें. तुम्ही वजिरांचे चाकरीशीं व रजावंदीशीं प्रयोजन कायें? तरी तैसेंच साफ लिहिणें. त्याप्रमाणें आजी पांच माहिने वर्तणूक केली, त्याप्रमाणें मृगसालपावेतों याचेंच आज्ञेनें वर्तणूक करून सेवेसी येऊन. जर स्वामींची आज्ञा येईल कीं, बापूंच्याच विचारें वरकड वर्तणूक करणें परंतु वजिरांची चाकरी वजीर सांगेल त्याप्रमाणें

करणें, त्याची रजावंदी राखणें, बखेडा होऊं न देणें, तरी तैसेच वर्तणूक करून. ज्याजती फोजेचे शिबंदीचे रुपये मागेंच मेलऊन फेडिलें असते. आम्ही मेलवावें कोठून? आम्हांसी कोणांसी दर्शनासी संमंध नाहीं. जो कारभार करणें तो बापू करितात. चाकरी मात्र जें जें हे सांगतात तें करितों. वजिरांसी आम्ही आर्जी लिहिली कीं, श्रीमंताची मर्जी आहे कीं, सलाबतजंगास सनद आहे. तरी साहेबीं गाजदीखानांच्या पुत्रांस न देणें. येविशई श्रीमंतांचें पत्र साहेबांस आणून देतों. त्यानें पत्र येई तों महकूफ केलें यामुळें राजश्री बापूंनीं आम्हांवरी इतराजी फारच केली. देशीं फार फार गिल्ला लिहिला. आम्हांसहि इतका बखेडा करावयास प्रयोजन नव्हतें. परंतु स्वामींनीं आम्हांस लिहिलें आहे जें, सलाबतजंगाचें साहित्य करणें म्हणून इतका उत्पात केला आणि तूर्तच वजीर, रजपूत बखेडा करितील, डोहणा भारी होईल, याजकरितां केलें. पुढें आज्ञा येईल त्याप्रमाणें वर्तणूक करून. बापूंनीं, मीरबक्षींनीं व खानखानांनीं येक होऊन कांहीं पातशाहांसी करार केलें. त्याजमुळें रजपूत, वजीर, जाट येक जाले. वैर वाढलें. वजिरांस दगा करावा, तें वजिरांस कळलें; त्याजउपरी वजीर, बापूंसीं तों स्वामींच्या नांवाकरितां बोलत नाहीं परंतु त्यांसी वैर राखितों. बहुधा वजीर, मोगल बादशाहा इतकियांत येखादियासी दगाही आपल्या आपण कोणास करितील, गर्दी होईल, यैसेंहि दिसते. बापूंचे बखेडे मोठे. बरें जाले तरी बरें. नाहीं, दरोबस्त हिंदुस्तानचा डोहणाच होईल. श्रीमंत राजश्री दादासाहेबांस सत्वर राजश्री बापूंनीं बोलाविलें व पातशाहांचीहि चिठ्ठी पाठविली आहे; तो मनसबा काहीं दुसरा नाहीं. तुराणियांकडे पातशाहांस करावें आणि श्रीमंतांस तिकडे करावें आणि वजिरांसी कलागत करावी, दंगा करावा. परंतु असाध्य काम. वजीर, जाट, रजपूत मिळोन थोडें तरी च्याळीस पंनास हजार फौज. मोंगलांपाशीं पांच हजार फौज नाहीं. याजकरिता श्रीमंत राजश्री दादासाहेबांस या बखेडियांत घालावें यैसें आमच्या चित्तापासून नाहीं. बरें, वकील काये करिता पाहावें त्यापेक्षां पातशाहा वजिरांपासून खर्चास घेऊन, पठाणांवरी शह द्यावा हें उत्तम आहे; परंतु आपला कारभार वकील शेवटास जाऊं देणार नाहींत, श्रीमंतहि यैकणार नाहींत, नाहीं तर वजीर, श्रीमंत येक करून तमाम रजपूत, जाट यांची मामलत विल्हेस लाऊन देतों. असो. आम्हास ज्याप्रमाणें स्वामी आज्ञा करितील त्याप्रमाणें वर्तणूक करून. पुढें सालगुदस्तां सलाबतजंगासी झुंझोन लोक आपलें आपलें घरास आले; आम्हास हिंदुस्थानास छावणीस पाठविलें त्याजवरी छावणी करून पुढें दिल्लीची मसलत सांगितली. दिल्लींत दररोज स्वारास पोटास रुपया येक १ लागतो. यैशा मसलतीची चाकरी सांगितली तीही कबूल करून, पुढें कर्जदार होऊन काय

फळश्रुत होईल पाहावें. त्यास लोक आडसाले जाले. पुढें मृगासाल जालियाउपरी काहीं कोणी राहणार नाहीं. त्यांत दिल्लीची चाकरी. दुसाला आमची मुलुकगिरी जाली. आतां मृगसाल घालऊन आम्हांस श्रावणमासीं सेवेसी येणेंयाची आज्ञाही लिहिली पाहिजे. स्वामी मोघमच लिहितील कीं, त्या प्रांतीं श्रीमंत राजश्री दादासाहेब येतील अथवा सरदार येतील तें आज्ञा करील त्याप्रमाणें वर्तणूक करणें, तरी यैसें * * * न ल्याहावें. दुसालां चाकरी करून छावणी करून वरीसभर दिली(ची) चाकरी करून मागती राहाणें होणार नाहीं. याजकरितां मृगसालपरियेंत राहून येऊं. याची आज्ञा ल्याहावी जरूर. दिल्लीस सरदारही न आले श्रीमंतही न आले, आम्ही ज्येष्ट मासीं कूच करून स्वार जालों आणि नवाब वजीर यांणीं फारसा आग्रहच केला तरी येक स्वार व चिरंजीव तात्या व नारोपंत मुजुमदार यांसी ठेऊन, त्यांची उत्तम प्रकारें रजावंदी राखोन आम्ही येऊन; याचीही आज्ञा ल्याहावी. वजिरांची रजावंदीस्तव चिरंजीवास येक हजार स्वारानशी ठेवावें किंवा न ठेवावें? सरदार अथवा श्रीमंत दिल्लीस आलेच तरी आम्हांकडे गुंता नाहीं; परंतु कांहीं दिल्लीच येणार नाहींत, वजीर तर राहावयाचा आग्रह करील, याजकरितां हेंही निवडून ल्याहावें. या पत्राचा मजकूर सरदारांस न कळावा. आमची पातशाहाची मुलाजमत केली ते दिवशीं पातशाहांनीं साहेबनौबत, हत्ती, उंटें व चाकर सर्व सरंजामसुधां नौबत दिल्ही. आम्ही आग्रह केला परंतु त्यांनीं तूर्त दुमाही रोजमुराही त्यांस देऊन पाठविलें कीं, तुम्हांस पुढें पायाही (बी?) लाऊन देऊन; हें देणें राजश्री पंतप्रधान यांचेंच समजणें. त्याजवरून घेतलियाची विनंती पूर्वीं सेवेसी लिहिली आहे. त्याची आज्ञा सरकारची करणें तें केली पाहिजे; त्याप्रमाणें वर्तणूक केली जाईल. तूर्त लोकांत * * * * होई ऐसें न करावें. वरकड सेवकावरी कृपाळू होऊन कागदपत्र यैसा लिहीत आसावा जें सेवकाची प्रतिष्ठा चौघांत वाढे. तेंही सर्व प्रताप स्वामींचा आहे. आम्ही घरचे लेक खानाजाद आहों. तूर्त बापूंची मर्जी फारच निकड आढळली कीं मीरबक्षींस दक्षेण देवावी आणि वजिरांची चाकरी फौजेनें न करावी व आतांच च्यार कलागती आणून पाडाव्या. श्रीमंत गुजराथेंत, सरदार देशीं आणि डोहणा माजवावा. म्हणून बापूंस विनंती केली कीं, तूर्त महिनाभर महकूफ करणें. श्रीमंतांचें दुसरें आज्ञापत्र येईल त्याप्रमाणें वर्तणूक करणें. इमानें न करीत म्हणून स्वामींच्या पायांची आण घातली आणि वजिरांस आर्जी लिहिली कीं, हजरत श्रीमंतांचे हजरतला पत्र येईल त्यांस सनद द्यावी. त्याजवरून वजीर खुशी जाला, इतका मात्र आमचा अन्याये जाला; याजवरून आम्हांवरी आतां काये प्रयोग होतील ते पाहावें.

तूर्त दिल्लींत आतांच मनमान तैसें वखेडे जाले आहेत. वजिरांचे चाकरीस आतां हे जाऊं देत नाहींत; परंतु हें उत्तम नाहीं व आम्हांस कांहीं लाभही दिसत नाहीं. दीड हजार फौज नवी ठेविली त्याचा पैका तरी मिळवून परभारें फिटतें तरी बरें तेंही नाहीं. कोठें काये कोणास यांनीं केलें असेल न कळे. आम्हांस म्हणतात तुम्हा काये प्रयोजन आहे? आम्ही सांगू त्याप्रमाणें चाकरी करणें. श्रीमंत पैका देतील तेही मान्य करून पांच महिने वर्तलों व पुढेंही वर्त (वर्तेन) परंतु वजीर चाकरीस बोलावील तरी आम्ही जाऊं; त्यांची रजावंदी राखूं; हें बापूंच्या चित्तास येत नाहीं. हें दगा खावयाचें लक्षण आहे, याजकरितां वजीर बोलावितील तरी आम्ही जाऊन त्यांची चाकरी करून, त्यांची रजावंदी राखूं. याची मागती फिर्याद सेवेसी बापू लिहितील. त्यांत येखादें तुफानही घेऊन लिहितील, याजकरितां सेवेसी लिहिलें आहे. आमच्या खासगत कामकाजाचे जाबसाल आम्ही फार लिहिलें, त्याचें उत्तर येकही येत नाहीं. यांत आमचा जीव कोणें प्रकारें वांचतो? याकरितां सेवेसी आतां पुरवणी अलाहिदा लिहिली त्याची विनंती उदास न करितां, त्याचीं उत्तरें लिहिल्याप्रमाणें देऊन, सेवकाचा तरणोपाये होये तो करणार स्वामी समर्थ आहेत. फार लिहितों याचा विशाद न मानावा. दूर पथ, याजकरितां लिहिलें. स्वामींनीं लिहिलें कीं, नवाब वजीर दक्षेणची सुभेदारी आपल्या पुत्रांस द्यावी असें असेल तरी हें कार्याचें नाहीं. तरी हे गोष्टी सर्वथा नाहीं. मीरबक्षी मात्र पुत्रांस व्हावी हा अर्थ चित्तापासून होता; परंतु तोही स्वामींवरी दृष्ट देऊन न घेतला व दक्षेणची सनद चित्तापासून सलाबत-जंगांस द्यावी. तऱ्ही स्वामींचा उज्जुर केला कीं, राजश्री पंतप्रधान यांचे खत मजला तुम्ही जो कोणी आणून त्यांस देईन तेंही स्वामींवरी ठेविलें; तथाप गाजदी-खानांच्याच पुत्रांस बापूंनीं आग्रह करून देविली, स्वामींचीं उत्तरें लौकर निवडून वजिरांच्या नांवें न आलीं, आम्हांस न आलीं, तरी यानें वस्त्रें घेतलीं-याउपरी यांस आज्ञा जाली तरी फजीत करून मागती फिरऊं. जैशी आज्ञा येईल तैशी वर्तणूक करून. सविस्तर उतराची आज्ञा निवडून ल्याहावयास स्वामी समर्थ आहेत. सेवेसी श्रुत होये हें विज्ञापना.

¶*Antaji Manakeshwar in his usual verbose style informs the Peshwa of the intrigues of the two rival factions at the court of Delhi. He says serious differences between himself and Bapuji Hingne have arisen as the latter favoured the claims of the son of Gaziuddin (Mirbakshi) contrary to the desire of the Vazir and the Peshwa's interests. He also touches on the reported defection of Malharji Holkar and urges a rapprochement so that the affairs in the North may not get out of hand.*

2247

No. 56] [April 1753

श्री

पुरवणी श्रीमंत राजश्री पंतप्रधान
स्वामीचे सेवेसी

विज्ञापना. स्वामीच्या घरांतील खबर कार्दीनेकोडी[1] वजिराच्या घरास पंधरा दिवसाची डाक (ब)सली आहे. स्वामीच्या सरकारांत नेहमी वर्षासनें चौघा-जणांचीं वजिराचीं आहेत ते खबर जे भोजन देखिल करितां ते देखिल सांगून पाठवितात. सदैव जालें वर्तमान येतें. आम्ही वजिराचे चाकरीमुळें राबता बहुत केला आहे त्याजमुळें सर्व वर्तमान आम्हांस सांगतात. वजिरानीं खबर सांगितले कीं सरदाराचा अपमान श्रीमंतानी केला. सलाबतजंगाच्या कामा-काजांत त्यास येऊं दिल्हें नाहीं. जे गांव व जे परगणें गाजदीखानानें दिल्हे होते त्याप्रमाणें सलाबतजंगापासून घेऊन सरदारास न दिल्हे. वकिलाचे जालहापूर परगणा वकिलासही न दिल्हा. याजमुळें सरदार आपले घरीं येऊन बैसले. श्रीमंत आर्काटाकडे गेले. दामाजी गायेकवाड व श्रीमंत राजश्री दादा-साहेब गुजराथेस गेले. आणखी घरांतील वर्तमान कादीनेकाडी विस्तार सांगितला. देशींहून ही किताकाची लिहिलीं किताका प्रकारें आलीं. त्यांत मजकूर नाना प्रकारें आहे. फार पत्रीं फोडून लिहितां येत नाहीं. आमचें पाघरूण लांहाण आहे. जें वजिराचें बोलणें आहे त्याचा अर्थ धरून सेवेसी लिहितों. स्वामी खावंद आहेत. सरदार आपण वाढविले, त्याप्रमाणें त्यानी कामेंही मोठीं मोठीं केलीं. पुढें त्याची उमेद उत्तम प्रकारें राहिली तरी आणखी थोर कामें करितील. नाहीं तर श्रमी[2] चाकर दुशमन बराबर; कामांत अंतर पडेल. आपण समर्थ आहे. गावखेडियाची विशये काये? स्वामीच्या भाग्याचे विभागी आहेत. वरकड सेवक या प्रसंगी जितके दिवस राहील तितके दिवस येथून सरकार-कामाची फिकीर न करणें. वजिराच्या खबरी राजश्री मल्हारजी होलकर याची घरची पुरुशोपंत दर आठवडा लिहितो व राजश्री आपांचे[3] घरची रामराऊ लिहितो. विषेषे आमचे लोकास आखेर सालीं दोन वर्षें होतात पुढें लोक कांहीं राहाणार नाहीं. सरदार कांहीं वैशाख जेष्टांत या प्रांतीं येतां दिसत नाहीं. पातशहा व वजीर कांहीं निरोप खुशीनें देणार नाहींत. जेव्हां फौज व येक सरदार चाकरीस येथें ठेवावा तेव्हां चांगला समाधानें निरोप देतील. याजकरितां तेथून कोणी सरदार फौज येथें ठेवणें असेल त्यांस अगोदर पाठवणें. केवल दोन वर्षें जाली.

---

१ इत्थंभूत, बारीकसारीक. २ असंतुष्ट. ३ जयापा.

याउपरी मागती आम्हांसच राहा म्हणतील, लोक राहणार नाहीं. याची आज्ञा निवडून साफ लिहिणें जरूर जरूर. कोणी फौज येंदा पाठवावयाची नसली तरी आपली मर्जी असेल की पातशहा वजीर यांची रजावदी राखणेच तरी पुत्रांस दोन हजार फौज जथोन ठेऊन त्याची रजावदी राखोन आम्हांस जरूर येणेंच आहे. हें कलम निवडून जैसें असल तैसें साफ निवडून ल्याहावें. या पत्राचीं उत्तरें वैशाखमासीं आम्हांजवळ पावतील तेव्हां आवकाश कोणता राहिला? याजकरिता दुसरी फौज येथें चाकरीस पाठवावी आथवा दोन हजार फौज पुत्र ठेऊन रजावदी राखून येणें अथवा झाडून येणें यैसी तीन गोष्टींतून येक निश्चय निवडून लिहिला पाहिजे. संधयुक्त न ल्याहावें. तथाप सरदार इंदुरास उजनीस छावणीस आले तऱ्ही आम्हापासून येका महिनियानीची वाटेवरी आहेत, कांहीं या प्रांतास येणार नाहींत. येथें वैशाख जेष्टांत येते तरीं सर्व त्यासच पुसतों. याजकरितां हा मजकूर सविस्तर निवडून ल्याहावावें. फौजेचे नेमणुकेची सनद लिहिल्याप्रमाणें पाठऊन द्यावी. दिलीची लाहोरची मोहीम ; त्या फौजेचे नेमणूकेची खलखल व्हावी यैसा अर्थ नाहीं. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.

¶*News-letter from the Peshwa's agent at Delhi giving details of the movements and doings of Vazir Safdar Jang.*

---

*No. 57*] [*About March 1753*

करून घ्यावी. सलाबतजंगाचा मामा येथे वकील आहे. त्यानेही रात्रदिवस पेगम केले जे, पंनास लाख निदान पंच्याहतर लक्ष रुपये घ्यावे; परंतु दक्षणेची सुभेदारी सलाबतजंगास द्यावी. जाट व माधोसिंग व बखतसिंग राठोड यांचे पुत्र यानी बहुत पेगाम केला कीं आगरे अजमेर दोनी सुभे द्यावे. येसें शत्रूनी येक महिना रात्रदिवस पातशाहास अर्ज करीत गेले. परंतु रा सरदारांनी पातहाशासी करार केला जे हुजूरचाकरीस दाहा हजार फौज पाठवितो. त्यापैकी आमची रवानगी पांच हजार फौजेनिसी केली. पांच हजार फौज समयास दिलीत येऊन दाखल जालियावरी पातशाहास बहुत आनंद जाला व मऱ्हाठेयांवरी इतबार बहुत बसला * * * ठी व रा बापूजी माहादेव यानी विचार करून तमाम तुराणी यांचा जोडतोड करून पंचवीस हजार फौज जमा केली व जेथवरी आम्हास फौज मिलाली तेथवरी आम्ही ठेवीत गेलो. येकूण तीस पस्तीसहजार फौज जमा करून पातशाहाच्या दोनी दरवाजियास बैसलो. आणि पातशाहाची कृपा संपादून येवढे कार्य करून घेतले व पातशाहाची ममता इमादनमुलुक याजवरी बहुत पहिलियापासून होती म्हणून सर्व गोष्टी होऊन स्वामीच्या पुण्यप्रतापें घडोन आल्या. पुढें आठां चौ रोजानी दक्षणचे सुभेदारीचा परवाना व वस्त्रें याच

निजामनमुलुकास करून घेतो. आगरे अजमेर दोन्ही सुभे स्वामीकडे आहेत त्याप्रमाणे करार आहेत. सलाबतजंगाच्या वकिलाची रदबदली आजीतागाईत वजिराचे मारफातीसच होती. त्यास आर्जी वजिराचे रुबुरु सलाबतजंगाचे वकिलांस पातशाहानी साफ जाबसाल दिल्हा जे दक्षणेची सुभेदारी निजामनमुलुक-यांस दिल्ही व त्याचा येख्तार राजश्री पंतप्रधान यांकडे आहे; ते दक्षणेचा बंदोबस्त करितील. सलाबतजंग यानी येक भागानगरचा सुभा खाऊन निजामनमुलुक यांची चाकरी करावी. पाचा सुभ्यात दखलगिरी करावयास प्रयोजन नाहीं. नवाब गाजदीखान यानी आम्हास नजरेचा पैका द्यावयास केला आहे तो व बालाजीराऊ यास द्यावयास केला आहे तो निजामनमुलुक देतील. दक्षणेची सुभेदारी निजामनमुलुकाची आहे व येख्तार बालाजीराऊ यांचा आहे याप्रमाणे साफ जाब सलाबतजंग याचे वकिलास पातशाहानी दिल्हा. याउपरी सलाबत-जंगाचें पारपत्य स्वामीनी उतम प्रकारें करावें. आजी दिलींत वजीर मोठाच आहे. परंतु स्वामीचा नक्ष मोठा जाला तो आनंद पत्रीं कोठवर ल्याहावा? जें काम आजी पनास हजार फौज दिलींत असोन व्हावें तें काम येवढेच फौजेने स्वामीच्या कृपेकरून होऊन आलें. कदाचित स्वामी म्हणतील कीं पनास हजार फौजेचें काम होतें तें पाच हजार फौजेने कैसें जालें? तरी रा बापूजी माहादेव यानी आमचा व दुराणी याचा जोड घालून दिल्हा म्हणोन कार्य होऊन आलें व ह्या कार्यांत रा बापूजी माहादेव यांनीं बहुत श्रम करून स्वामीकार्य केलें. आजी पंधरा रोज जाले वजिरानी पातशाहासीं सख्त रदबदली * * *
(पुढील कागद गहाळ)* * *

¶*News-letter from Delhi—of which unfortunately both the beginning and the end are missing—referring to the intrigues at the court of Delhi. The writer Antaji Manakeshwar says it was his presence with a strong force that saved the day for the Marathas. The Emperor agreed to assign Ajmer and Agra to the Marathas. The Nizam is to administer the Deccan Subas with the advice and under the supervision of the Peshwa.*

---

*No. 58*] [*June 1753*

## श्रीशंकर

सेवेसी विज्ञापना. स्वामीनी तिकडील वर्तमान लिहिले ते सविस्तर कळलें. श्रीरंगपटणचे बेत्रीस लाख करून उलटलो म्हणोन लिहिलें. ऐसियासी पूर्वी तीर्थरूप कैलासवासी राव गेले तेव्हां येकवीस लाख देत असता न घेतले. आधिक आशेमुळे गोष्ट साध्य न जाहाली. तसाच विचार सालमजकूरचाहि होता. स्वामीचे जाणे फालगून मासी जाहाले, त्याजवर मोर्चे लाऊन घेऊन म्हट-

त्यास आवघड. आम्ही व आणीक फौज असली तरी गैर हंगाम आवघडच. स्वामीनी मनसुबा उतम केला. पायंडा पडला. पुढे दरसाल थोडे बहुत तरी करार करील. मातबर फौज गेल्यास जाजतीहि देईल. बहुधा स्वामीनी दर सालेचेहि करार केलेच असेल. नसिले केले तरी तो पुण्यात विल्हे लाऊन वेईल. स्वामीच्या प्रतापापुढे कार्य कोणतेहि नासत नाहीं. हिकडील मजकूर तर दिलीत वीसपंचवीस लाख रुपये पातशाहा तूर्त व पुढें थोडे बहुत देत असता आम्ही न घेतले. राणाजीच्या धाकव्या भावाचा नाथजीचा पक्ष केला असता तरी मनसुबा सिध्ध जाहाल्यावरी पंधरा देत होता, तथापि तिकडे घराऊ पेच याजमुळे रुपये टाकिले व पातशाहाची मर्जीहि मोडिली. आसो; आम्हास स्वामीचे आज्ञेपेक्षा कोणता मजकूर? पुढे थोडासा मनसुबा जिवट हिकडेच दिसतो. भुजनगरच्या-पासून थोडीबहुत * * दाहापाच ठहरतील तेव्हडे घेऊन त्यास बराबरी घेऊन सुभे ठठा व मुलतानलगते आहेत तेथं परगण्यापरगण्यापासून जे मिळेल ते घेऊन यावे. रुपये मिळणे न मिळणे हे स्वामीचे आदृष्ट; परंतु हिकडे आल्यासारिखा श्रम करावा, मर्दुमी करावी. होणे कांहीं चाकराच्या हाती नाहीं. दुसरे सुरतचेहि राजकारण उतम आहे. होईल तेव्हा खरे. असो; तूर्त आम्ही छावणी करितो. पोटास नाहीं. पुढील रुपयाचे आशेवरी करितो. * * * * * कडील हिकडे रुपये वारले तरी वराता करू. घरास आलो तरी समजावीस नालबंदी यास ऐवज स्वामीस द्यावाच लागेल. गुजरातच्या रसदा म्हणाव्या, आठरा लाख रुपयाचे छतीस देखील व्याज जाहाले. व गैर ठाणे व गैर रवानगी वगैंर आम्ही गुदस्तापासून पाचसात खर्चिले. येकूण आणिक येक वर्ष भिटावयास समग्र पाहिजे. येवंच ऐवज तिकडेच स्वामीस द्यावा लागेल तो हिकडे थोडक्यावरी वारेल असा हिशोब; तथापि हिकडे मेहनत करून रुपये मिळाले तरी वराता कशास करू? जसे बनेल तसे करू; परंतु येकदा लांबवर जावेसे मनात आहे व सुरतचाहि कारभार होत आहे, याअर्थे छावणी करितो. मल्हारबा जयापा याणीहि तिकडे येणे म्हणोन आमचे भिडेने कागद लिहिले; परंतु तिकडे जात नाहीं. बिरमगावापासून वीसपंचवीस कोसी छावणी करितो. मुलूख काठेवाडासारिखा कोठे नाहीं. उज्याड आहे. हा मोठा दोष. हे विनंती+.

¶*Raghunathrao congratulates the Peshwa on his successful expedition in the South and on exacting tribute from the Raja of Seringapatam, and gives an account of his activities in the North.*

---

+ पत्र रघुनाथरावाचें नानासाहेबास. बहुधा स. १७५३ च्या पावसाळ्यांतलें असावें. जयापाचा मृत्यु १७५५ च्या जुलै महिन्यांत झाला.

No. 59] [1754

श्री

शेवेसी विज्ञापना. चिठी पाठविली त्यात आज्ञा की राजश्री नारोपंताकडील तोफा व दिवाण हर गोविंद याजकडील तोफा येका जागा करून जागा योजून प्राथ:काली येक प्रहर मार द्यावा व साईकाली येक प्रहर मार द्यावा आणि जाटास निसनाबुद करावे म्हणून लिहिले व राजश्री आपाकडून उजेनीच्या तोफा आणवितो व मुजफरखान गारदी बमये तोफखाना व मालवियातून आणिख तोफा आणून छयावणी करून जाटाचा निसनाबुद करावा म्हणून आज्ञा. त्याजवरून सांडणीस्वार इंदुरास रवाना करावयासी तयार केले आहेत ; तर थोर तोफा कितेक आणाव्या? च्यार तोफा बारा बारा सेरा गोलयाच्या व पाच तोफा दाहा दाहा सेराच्या व गरनाला दोन व च्यार सेरी पाच सेरी दाहा बारा आहेत त्यातून ज्या तोफा आणावयाच्या आज्ञा होईल त्याप्रमाणे मुजरत सांडणीस्वार पाठऊन तोफखाना आज्ञेप्रमाणे आणवितो. घशडियाच्या तोफा फते(सिं)ग व माणिकराव याजला पाठऊन दोन्ही तोफा आणविल्या आहेत. तरतूद करून निसनाबुद जाटास करावे उतमच आहे. सेवेसी शृत होये हे विज्ञापना. प्रतिउतर आले म्हणिजे सांडणीस्वार रवाना होईल हे विज्ञापना+.

¶*Gangadhar Yeshwant, Holkar's Diwan, seeks orders regarding pieces of artillery to be brought over from Indore for bombarding the Jat stronghold. Can this refer to the siege of Kumbher in 1754?*

---

No. 60] [17-7-1754

नकल

श्री

**राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री कृष्णरावजी स्वामीचे सो**

पो। पुरुशोतम माहादेव सां। नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल ता। आषाढ वदी १२ मुकाम इंद्रप्रस्थ येथास्थित जाणून स्वकीये कुशल लेखण करीत असिले पाहिजे विशेष. बहुत दिवस जालेत, स्वामीकडील पत्र येऊन वर्तमान कलत नाहीं. पूर्वी दोन जोड्या विठोजी वगैरे जासूद आले होते ते कांहीं येक दिवस सैन्यात ठेऊन कुंभेरचे मुकामीहून हुंडीपत्रासहित स्वामीकडे रा। केले ते पावले असतील, परंतु पावलियाचे उतर न आले. चांदवडचे कागदापत्राचे काम सिध होऊन हस्तगत जालेच आसेल. इंद्रप्रस्थास आलियावर पातशाही फर्मान करून घेतलेत तेथीलहि पत्र लिहिल्याप्रा। करून घेतलीच असतील. इकडील वर्तमान तर कुंभेरीस सुरजमल जाठ त्याने पातशाहासी विरुध करून तमाम शहर लुटले.

+ पत्र गंगाधर यशवंताचें.

त्याजवरून पातशाहानी जाटाचे पारपत्यास वारंवार पत्रे येजमानास लिहिलीत की पत्रदर्शनी स्वार होऊन जाटवाडियासी येणे. आम्हीहि तोफखानियासुधा येतो. जाट खारीज[१] करून पुढे पातशाहीचा बंदोबस्त करणे त्याजवरून येजमान मजल दरमजल चाललेत. जयेनगरास येऊन तेथील फैसला[२] करून जाटवाडियासी येऊन मुख्य जाट कुंमेरीस होता तेथे मोर्चेबंदी करून बसले. पातशाहानी कराराप्रा तोफखानियासुधा यावे तो न आले. जाट व आपन येक जालेत. पूर्वी खंडेराव बाबा व तात्या पुढे इंद्रप्रस्थास गेले होते तेव्हांच पातशाहची मरजी पूर्ववत प्रा न देखिली. गाजुदीखानाचा पुत्र येऊन भेटला. वचनाप्रा आले होते. त्याप्रा गाजुदीखानाचा पुत्र आपले फौजेनसी येऊन येजमानास शामील जाला हेहि पातशाहास दु:सह जाले. त्यावरून पातशाह व खानखाना वजीर गाजुदीखानाचे पुत्रासी आकस करून गेले. तेव्हां येजमानही त्यासी वचनप्रा केले की तुम्ही काही चिंता न करणे. तुम्ही आम्हाकडे आलेत म्हणोन खानखाना तुमची आकस करितो तरी चिंता काये आहे? जाटाचे पारपत्य जालियावर जाऊन तुम्हास वजिरी देवऊ असे प्रमाण केले. हे वर्तमान पातशाह व खानखाना ऐकून खानखानाने पातशाहास तोफखाना व फौजसुधा बाहीर काहडले. जाटाचे साहित्यास्तव येजमानास शह दिल्हा. येमुना उतरून सिकंदरा चालीस कोस आहे तेथे येऊन राहिले. तेव्हां येजमानहि जरूर जाणोन जाटाचा फैसला तीस लाखावर केला आनि तेथून कूच करून सडे आपले फौजेनसी वृंदावनी येमुना उतरोन पातशहास खबर न देता रातोरात धावले. श्रीमंत दादासाहेब व जायापा सिंदे हे आपले फौजेनसी (मथुरेस राहिले). येजमानानी आपले फौजेनसी पातशाहसी गाठ घातली. रात्रीचा समय. पातशाह व वजीर हे उभयेता सडे पलोन गेले. पातशाही बेगमा मलकाजमानी वगैरे साडेतीनसे बायेका धरल्या. लशकर तमाम लुटले. पातशाह किलियात दाखल जालेत. दुसरे दिवशी येजमान पटपटगंजापासी मुकाम करून फौज व तात्यास येमुना उतरून शहरात पाठविले. कबिलेहि पाठविले. शहरातून किलियासी जाऊन अहमदशाह कैद करून आजुजिदीन नामे शाहजादा होता त्यास तख्तावर बसविले. आलमगीर नाव ठेविले. गाजुदिखानाचे पुत्रास वजीरी देविली. बक्षिगिरी खानदौराचे पुत्रास देविली. मागून श्रीमंत व आपाहि आलेत. साडेब्यायंशी लक्ष रुपये वजिरानी यांसी करार केले आहेत. त्यासाठी तात्या शहरात गेलेत. लौकरीच निर्गम होईल. जयाजी सिंदे मारवाडात रामसिंगास राज्य द्यावयासी गेलेत. श्रीमंत व सुभेदार इंद्रप्रस्थी आहेत. येथील बंदोबस्त

---

१ हद्दपार. २ निकाल.

जालियानंतर जाटाचे पारपत्य येथास्थित करावे हा उद्योग आहे. नवाब मनसूर-आलीखान आपले फौजेनसी गोमतीचे तीरी पापडघाटापासी छयावनी केली आहे. येजमानाचा त्याचा स्नेहच आहे. त्यासहि इंद्रप्रस्थास आणून त्यासी वजिरासी ऐक्यता करून पातशाहीचा बंदोबस्त करावा ऐसा विचार आहे. जयापाचे मनात विशम फारसे येऊन श्वतंत्र मोहीम करून राठोडासी लढाईस गेले. होईल प्रसंग तो कलेल. बहुतेक कललाच आहे. पातशाहावर येजमान गेले तेव्हां सर्वांस हटकिलें की तुम्ही चला अगर तुम्ही आपली फौज बराबर देणे. त्यानी गरूरी[१] मनी अणून फौज न पाठविली. येक राऊत दोही लशकरचा न आला. मग येजमान सडे फौजेनसी सांता प्रहरांत पोहचून फते केली. श्रीने येश दिधले. निमित्य की दुसरा कोन्ही शामील नव्हता. हे फते जालियावर सर्व हात चोलीत राहिले. पहिले फौज न द्यावयासी कारण हेच की पातशाही तोफखाना भारी व वीस हजार मोगली फौज; आपली पुरी पडनार नाही. जरी हे येकलेच गेले तरी कार्ये कारितील? फजीत होऊन येतील म्हणजे हलके जाले; यात हितच आहे. हा कुभाव क्षुलकानी मणी आनून न गेले. श्री जीने निराले यांसच येश दिधले. निमित्य की विशम कोनाचेही मनात येत नाही. प्रस्तुत लौकिकात कोट्यावधीचा लुटीमुले भ्रम जाला. पाहता मऱ्हाष्ट लशकर ज्याचे हाती लूट आली तो घेऊन गेला. पाहता याजकडे हातीं चालीस पंचेचालीस आले ते श्रीमंताचे नजर केले. त्यापैकी दाहाबारा यासी दिधले. बाकी सरकारात ठेविले. वरकड लूट दिसता पदार्थ कितेक रथ उंट घोडी आली ये जातीचे वर्तमान आहे. तेथून द्रव्याचा निर्वाह करून घेऊन पुढे आवकाश तो देशास यावयाचा नाहीं. कदाचित श्रीमंत दादासाहेब आले तरी येतील. येजमान तरी शंभरावाव्याने येत नाहीत. बलात्कार जाला तरी न कले. त्यास स्वामीनी सनदपत्राचे काम करून घेऊन लिहिले पाहिजे (ती) येजमान संतोष पावत * * * * * * * *

¶*This important news-letter from Purushottam Mahadeo reports that Raghunathrao, being ordered by the Emperor to punish the rebellious Jat Surajmal, invested his stronghold of Kumbher. Evil counsels prevailing, the Emperor changed his mind and prepared to join Surajmal in destroying his southern allies. Getting wind of the treachery, Holkar swooped down upon Sikandra, surprised the Imperial army and encircled the Padshah. One Aziz-ud-din was seated on the Imperial musnud and Gazi-ud-din's son, a steadfast ally, was appointed Vazir on the condition of paying the Marathas 82 lakhs of rupees. The writer at the end refers to the differences between Holkar and Sindia who undertook the Marwad campaign and left Delhi on his new enterprise.*

---

१ मगरुरी, गर्व.

*No. 61*] [पो *20-8-1754 ?*

पो छ १ जिल्काद

श्री

**राजश्री बापू स्वामींचे सेवेसी**

विनंती उपरी. आपलीं पत्रें शनवारीं संध्याकाळीचीं दोन प्रथक प्रथक जोड्या पाठविल्या, त्या रविवारीं संध्याकाळीं येकामागें येक यैशा पावल्या. त्या उभयेतांस इनाम देविल्या. प्राा दर रुा ४ प्रमाणें आठ दो जोडीस दिल्हें. स्वामीस कळावें. राजश्री जनार्दनपंत शनवारीं प्रात:काळच्या प्रहर दिवसास येऊन सामील जालें. चाकरीच्या कामास कांहीं यांचा गुंता नाहीं. माहागाई भारी, रस्त कोठून येत नाहीं. याकरितां त्यांच्या पोटाची बेगमी जरूर जरूर करून पाठवावी. त्याप्रमाणें राजश्री मुरारपंत त्रिंबकपंत चाकरीस हजर आहेत. त्यांची चाकरी रोहिल्यांचें लढाईत चांगली जाली. त्यांसहि पोटास पाठवावें. जैतासिंग गुजर आम्हाजवळ काली दाखल जाले. तूर्त यास लाऊन ठेविलें आहे. दुखवतां येत नाहीं. रोहिल्याचें पारपत्य जाल्यावरी मग यासीं मामलतीची गोष्टी बोलावयाचीं ते बोलूं. त्यांत स्वामीची मर्जी असेल तेच आज्ञा करावी. राजश्री विठल आपदेव आम्हापासून कालीं साहा कोसावरी होते; त्यांस पत्र पाठविलें होतें. त्यांचें उत्तर त्यांणीं पाठविलें कीं आम्ही दुसरिया कामास जातों. त्यास आजी राजश्री तात्याचें पत्र त्यांस आलें तें पाठविलें आहे. आतां उदेक सोमवारीं पावतील. सशये नाहीं. फौज तरी बरीच जमा जाली आहे. मेरटेंत नजीबखानाचा चुलता व चुलतभाऊ बकशी यैसें जमा तीन हजारच तूर्त आहेत. पांचसे तों पहिलें विल्हेस लढाईत लागलेंच आहेत. लढाई मोठी जाली. लोक त्याचे फार मारिलें. आम्हाकडील घोडीं पडली. लोक जखमी व ठार फार. असो. साहेबकाम जालें. पहिली लढाई व हत्ती घेतलियाची खबर पहिलीच लिहिली. आजी तागाईत पत्रें साहा पाठविलीं तीं पावलीं कैसी नाहींत हें न कळे. सांडणीस्वार येक स्वामीकडील येक राजश्री तात्याकडील आले तेच दिवशीं त्यांस दुरोजा बेगमी च्यार रुपये उभयेतांस देऊन पत्रें देऊन रवाना केले. परंतु दोन दिवस हापडामध्येंच[१] होते. अनंदराऊ मायाजींची चिठी आली होती. ते सुखरूप पावले असतील. रोहिल्याची प्रात (प्राज्ञा) बाहेर निघोन आम्हावरी यावयाची नाहीं. तोफा चिखलाच्या निराळ्या पावणार नाहींत. आम्हीच

१ हापड हें मेरटेजवळ एक स्थळ, मीरटच्या दक्षिणेस २५ मैल.

तजविजीनें त्यांस काढावयाची तजवीज करितों. निघाले तरी उत्तम न निघालें तरी मग हला करून मारितों. परंतु शहर लुटलें जाईल तें पुन्हा वसणार नाहीं म्हणून तीन रोज धरून मात्र बसलों आहों. शंभर वांटें त्यांस काढून गंगापार लावावयाची तजवीज करितों. न जालें तरी हला करून मारावें प्राप्त जालेंच आहे. यास कुमक गंगापारीहून मिरापुरास हजार बाराशें आले आहेत, त्याचे बातमीस डांक बसविली आहे. पांच सात कोशीं आलियाउपरी त्याजवरी फौज पाठऊन मारितों. यांची, व येतात त्यांची, स्वामींनीं चिंता न करावी. आम्हीं इतकेंच पुरे. आमचे मारिलेले रोहिले आहेत, चिंता नाहीं. परंतु दिल्लीकडील मात्र फौजेची बातमी आम्हाकडें नाहीं. स्वामींनीं दिल्लीकडील बातमी राखावी. आम्हीहि माणसें पाठवितों. परंतु आम्हास दोन कामें आहेत; मेरटेंतील व गंगापारचे येणार ते फौज, यैशी आहेत. याजकरितां दिल्लीकडील बातमी राखोन त्यांकडील मुकाबलियास असावें. हापडामध्यें अनंदराऊ मायाजी यांस ठेविल आहे त्यास तगीर न करावें. कारकून सरकारचे पाठवावें. यैवज सरकारांत घ्यावा परंतु बाम्हणास धंदा सांगितला त्याचा दूर मात्र न करावा. हें कासीद सोमवारीं संध्याकाळीं स्वामींपाशीं पावलें तरी इनाम द्यावें. येथून रविवारीं येक प्रहर रात्र गेलियाउपरी रवाना केले आहेत. रूपरामाकडील कागदपत्र सारें होते ते झाडून आम्ही दीननाथपंत कारकून आमचा रूपरामाकडे आहे त्याजकडे पाठविलें आहेत. ते रूपरामास देतील. परंतु तिसा लाखांची मामलत कुंभेरीवरी जाली ती टीप रूपरामाची कबुलात सरकारांत असेल ती रूपराम मागतो ती आम्हाजवळ नाहीं. सरकारांत असेल ती द्यावी अथवा रूपरामाची खतारजमा करावी. येक पत्र मालुमातीचें[1] दत्ताजी शिंदे यांस दाहा हाजारांचे रूपरामास द्यावें कीं जैनगरचें खर्चाचे रुपये अंताजीपंतीं तुमचे सरकारांत दिल्हे. रूपराम म्हणतो ते रुपये माझे; तुमचा रूपरामाचा करार असेल तरी देणें. अंताजीपंताकडें गुंता काये? आला ऐवज सरकारांत जमा धरिला. यांजकडे गुंता नाहीं. तुम्हासी वचन असेल तेणेंप्रमाणें करावे यैसें पत्र जरूर द्यावें, म्हणजे आमचे रुपये रूपराम देईल. राजश्री जनार्दनपंत आम्हावरी रुसतात तरी दोन माहाल त्यांकडें जफ्तीस सारंगपूरचे देऊन संनद आमच्या लाखोटियांत घालून पाठवावी. अनमान न करावा, काहीं जात नाहीं. फौजेस यैवज कोठून देणार? रोजमुरां जनार्दनपंत मुरारपंत त्रिंबकपंत यांचा जरूर पाठवावा. रूपरामास आमच्या कारकुनाची निरवणूक करावी. तूर्त जलाली बीलरामचें

---

१ माहितीचें.

रुपये जाठानीं घेतलें. त्यांत चौथाई माहाल मजकूर देऊन यैवज तीन हिसे घ्यावा. पुढें समजावें. तूर्त सारा पैका बुडवावासा नाहीं. आम्ही पत्रें फार पाठविलीं तीं न पावलीं हें काय ? हे विज्ञापनां.

*¶The expedition against the Rohillas referred to in this document needs to be cleared up. The writer Antaji Manakeshwar writes to Sakharam Bapu about the situation at Delhi.*

*No. 62*] [*May 1755*

**श्री**

सेवेसी विज्ञापना. राजश्री जायापाचे मर्जीचे वर्तमान वरचेवरी सेवेसी लिहीत गेलो. प्रस्तुत स्वामी रूपनगरी आटकोन राहिले सबब आम्हास पत्र मारनिलेनी लिहिले आहे, तेच बजिनस सेवेसी पाठविले आहे. सारांश, अगोधर आमचा शह पडिला. आतां स्वामीचा शह पडिला; यामुळें फारच वाईट मानिलें आहे. त्याचे काम होणे जाणे ईश्वराधीन आहे; परंतु ते याप्रकारे लिहितात. आम्ही वारंवार किती स्वामीस ल्याहावें ? गोसाव्याचा सालजाब वाटेने येता केला असता तरी कामास येता. तेथें राहावयाचें काम काय होतें ? रामराव आपणाजवळ आले ते स्वामीची भीड राखून बोलतात. जायापाहि साफ लिहीत नाहींत. स्वामी धणी. त्याणी, इकडे न यावें, तिकडेच जावें, असे कसे ल्याहावें बोलावे ? चाकर लोकास अमर्यादा होते. यांजकरितां आम्हास लिहिलें. आम्ही सालजाब आज तीन मास खेळविले. परिणाम नाहीसा देखिला. कोठे मुकाम न करिता शह तोडून आलों यैसे आहे. अद्यापहि जे धण्याच्या चित्तास मानेल ते करावें. आम्ही काय ल्याहावें ? कासीद मुदतीनें रवाना केला. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

*¶The whole letter is in Sakharam Bapu's hand. He writes to Raghoba about the attitude of Jayappa Sindia and others.*

*No. 63*] [*1754*

**श्री**

**पुरवणी श्रीमंत राजश्री दादा**
**साहेब स्वामीचे सेवेशी**

विज्ञाप्ति ऐसीजे गाजुदीखान वजीर याचे मानस कीं पातशाहा दुसरा करावा व पैकाहीं समयानुसार देऊं. बंदोबस्त सर्व स्वामीचा आसावा. त्यास हे स्वामीचे आगमनाचा मार्ग लक्षितात. श्रुत होये. कृपा केली पाहिजे हे विज्ञाप्ति.

*¶Dadasaheb is informed that Ghaziuddin solicits his help to place another Emperor on the Delhi musnud.*

+ अंताजी माणकेश्वराचें पत्र सखाराम बापूस—रघुनाथरावाची स्वारी कुंभेरवर झाली त्यानंतरचें.

No. 64] [1754?

**श्रीसांबदुर्गा**

सेवेसी विज्ञापना यैसीजे. आज्ञापत्र सादर जालें. तेथें आज्ञा कीं संध्या काळीं कारकून बोलाविला असतां दीडप्रहर रात्रपावेतों न आला, म्हणोन शब्द लाऊन लिहिलें तें कळलें. त्यासी कारकून बोलावयास कोणी आले नसतां शब्द लाऊन लिहिलें हे अपूर्व * * * * सिंगा-कडील मामलत उर * * * मैन आज्ञा त्यासी त्याचा प्र * * * * * नाहीं जें केलें असलें तें उत्त(म) * * * * * खावंद आहेत. * * * * * * यावयास सरकारच्या तोफा व राजश्री मल्हारजी होळकर यांजकडील तोफा होतील तेव्हां तुम्ही आपली फौज पाठवणें, म्हणोन आज्ञा. त्यासी तोफा आलियानंतरी फौजेची रवानगी करितों; परंतु सिंदे होळकर वगैरे याजकडील मातबर फौज गेलिया कार्य होईल. यावरी मर्जी. राजश्री गंगाधर येशवंत व तुम्ही जाऊन गुजराची तहशील करणें, म्हणोन आज्ञा. यैसियास गंगाधरपंता-कडोन निरोप आल्यानंतरी कारकून पाठऊन देऊं. ऊष्णाचे उपद्रवाकरितां माझें जाणें होणार नाहीं. सविस्तर अर्थ राजश्री कृष्णाजी गोपाळ विनंती करतील. सेवेसी श्रुत होये हें विज्ञापना.

*¶This letter though fragmentary gives some information regarding Sindia and Holkar. The writer and the date are both unknown.*

---

No. 65] [June 1754

**श्री**

सेवेसी विनंती. राजश्री बगाजीपंत याजकडील पत्र पाठविलें ते पावलें. त्याजवरून सर्व वर्तमान कलले. तीर्थरूप राजश्री नाना स्वामीचें पुण्य समर्थ. येणेकडून असें दिसतें (कीं) पूर्वी तीर्थरूप कैलासवासी नाना याणी महमदशाह पातशाहा तख्तीं बसविला. त्याप्रमाणेंच हेहि शाहजाद्यास आपले हाते राजीं बसऊन आपला स्थापित असा करोन येतील. सेवेसी श्रुत होये. बगाजी-पंताचा कागद माघारा पाठविला आहे हे विज्ञापना.

*¶The letter refers to the revolutionary changes at Delhi when Ghazi-ud-din dethroned Ahmedshah and had another puppet Aziz-ud-din seated on the imperial musnud.*

*The following extract from the Peshwa's Diary bearing on this event will be read with interest.*

[25-6-1754

छ ३ रमजान खमसखमसैन

सिलिकबंद जमा. "१६२। कमावीस नजर. दिलीस नवा पातशाह बसविला म्हणोन राजश्री दादाची पत्रे आली. सबब लोकानी नजरा केल्या त्या जमा"

नजर करणारांत बळवंतराव गणपत, बाबा सरनाईक, रामाजी मल्हार चिटणीस, मल्हारपंत निा मजमदार, बगाजीपंत पारसनीस, हरि बलाल कारकून निा फडणीस, हैदरखान, निराजी त्रिंबक, महिपतराव पोतनीस, वासुदेव नाईक दिा पोतदार, गोविंदराव चिटणीस, हरि विठ्ठल, गोपालराव गोविंद वगैरे लोक आहेत.

---

*No. 66*] [*1754*

## श्रीमोरया.

शेवेसी विज्ञापना. चिठी पाठविली, तेथ आज्ञा कीं राजश्री दामोदर माहादेव यांची चिठी आली कीं कामाकाजाचा निर्गम निकड जालियाखेरीज होत नाहीं. त्यास राजश्री गंगोबास पाठवून द्यावें. निकड जालियाविना कामाकाजाचा निकाल कैसा होतो? याजकरितां राजश्री गंगाधरपंतास गांवात आजी लौकर पाठवावे; म्हणून आज्ञा. त्यास नवाब वजीर व अकबत महमुदखान यांजकडून चिठ्या आल्या कीं "आम्ही ज्यासीं बोलावयाचे त्यांसी आजी बोलतो. आपणाकडील पैकियाचे ताकिदीस आजी न पाठवावें. ते आलियानें आमचें बोलणें तैसेंच राहतें. उदईक राजश्री गंगाधरपंतास व सेटिबास पाठवावें," यैसें त्याचें लिहिलें आलें. याजकरितां आजी गावांत पाठवावयाचें महकूफ केलें. उदईक पाठऊं. याहीवर जैसी आपली आज्ञा तैसी वर्तणूक करूं. श्रुत होय हे विज्ञापना.

¶*The letter refers to some financial transaction with the Vazir.*

---

*No. 67*] [*January 1755*

(मु)कामीहून आली ती छ ९ रबिलाखरी पावली. वर्तमान कलले. पत्रीं आज्ञा, मारवाडचे काम सत्वर उरकोन चिरंजीव राजश्री दादाकडे सत्वर जाणे, काशी प्रयाग ग्वालेरचा बंदोबस्त ठीक करून घेणे म्हणून विस्तारे आज्ञा केली.

यैसियास येथील वर्तमान पूर्वी सेवेसी लिहिले आहे. प्रस्तुत नागोर जोधपूर येथील दाणाघास(?) मोर्चे लाविले. रसद बंद केली. जोधपुरास सुरंग बहुत नजीक गेलें आहेत. खावंदाचे प्रतापे करून येथील कार्याची निर्गमता थोडके दिवसांत करून आज्ञेप्रमाणे श्रीमंत राजश्री दादासाहेबाकडे जातो. राणाजी-कडील रुपया सत्वर वसुलात आणून कर्जदारास पावे ते करणे म्हणून आज्ञा. यैसियास राणाजीकडील रुपयाचा तपशील पूर्वी सेवेसी लिहिले आहे व श्रीमंत राजश्री दादासाहेबानीं तपशीलवार लिहिले असल त्यावरून विदित होईल. सेवेशी श्रुत होय हे विज्ञाप्ति.

¶*The writer, probably Jayapa Sindia, replies he will join Dadasaheb after the investment of Nagore.*

---

*No. 68*] [*30-4-1755?*

पौ छ १९ शाबान

श्री

**तीर्थरूप राजश्री नाना व तथा राजश्री भाऊ स्वामीचे सेवेसी**

आपत्यें रघुनाथानें चरणावरीं मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील क्षेम तागाईत छ १७ रजबपावेतों वडिलांचे आसीर्वादे कसबे पोहरी ताल्लुका नरवर येथें येथास्तित असे. विशेष. किला ग्वालेर हस्तगत करावयास्तव दरकूच या प्रांती मुकाम मजकुरास आलों. किला खाली करून द्यावायाचा पेगाम गोहजवाला जाट बलजू वगैरे याचा आहे. करार ठहरला नाही. करारमदार ठरोन किला खाली करोन देतील. त्यास किला साध्य जालियावरी सविस्तर सेवेसी लेहून पाठवीन. येते वेळे जितके खेचींचे काम होईल तितके करून येत असो. थोडे बहुत जाहले आहे. बाकी राहील तेहि स्वामीचे प्रतापे होईल. बहुत काय लिहिणे? कृपा केली पाहिजे विज्ञापना.

¶*Refers to the capitulation of the fort of Gwalior.*

---

*No. 69*] [*Beginning of 1755*

हकीकत हिंदुस्तान वगैरे दिलीपासून चालीस कोस फुजीलखान व अफजलखान वगैरे पठान जमियेत दाहा हजार स्वार राखितो. सारभुम नरमाईल जाणून त्याने सोखी आरंभली. यास्तव सारभुमाने दूरवर विचार न करिता टोपीवाले वगैरे पानिपत करनालचे वाटेने पाठविले. त्यास पठान गालब जाला. त्याने फोज

लुटून घेतली. घोडी वगैरे मालियेत नेली. हाती डेरे दांडें नेले. लोक मारले फार गेले. काही येक जीव घेऊन पळाले. याजवरून सारमुमास बहुत चटपट लागली. त्रिवर्ग येकविचार करून बाहेर निघाले. सारमुम शालमारीबागावर जाऊन उतरले. खानदौराचा लेक पुड सात कोस पानिपत करनालचे वाटेवर. त्यापुड गाजुदीखानाची फौज थानेस्वराअलाकड नौ कोस. त्यास पुड सारमुमाने जलदी करून जावे तर साजसरंजाम व खर्च व जमियेत कळतच आहे. काही भूपतीची सेना नारनोल परगन्यास आली होती. तेथे माधोसिंगाचे लोकाही लुटून घेतले. काही पळाले. आता तमाम लोकास ताकीदपत्रे पाठविली आहेत की जलद येऊन पोहोचने. भूपती पुड जायासही वसवास करीत आहेत की थोडे जमियेतीनसी बाहेर निघालिया मुदयाच्या काबत आल्या उपाये नाही. पुड भगवंतइछा प्रमाण. सरकारच्या फौजा तेथे होत्या या दबावाकरता कोन्ही डोई काडीत नवते. आता सीक वाहगुरुवाले वगैरे मवास खवले आहे. श्रीमंत राजश्री दादास व मल्हारजीसही पत्रे पाचारावयास आली असतील. श्रीमंत दादा व मल्हारजी शाहापुरापासून तेरा कोस आहेत. रजपुत लाबेवाला त्याच्या गडीस माहासरा केला होता तो रुजू जाला.

जयापाच्या चौकिया नागोरेभवत्या बदस्तुर गोसावी रदबदलेत पडला आहे. नागोऱ्यातील येक तले पान्याचे आटले. येक आहे. गावातून लोक निघून जात आहेत. शहर नागोऱ्यात निरख. आफू वीसा रुपई सेर आहे. मीठ रुपयाचे दीड सेर ८८१॥ धान्य रुपयाचे ८१३ तेरा सेर आहे. लाकूड तर नर्दारद. कोन्ही आफू चोरून गावात जात होता त्यास धरून उंटावर बसऊन शहर बाहर केले. ज्यालोरचा किला हातास आला असता मागती त्याच्या लोकानी घेतला यैसे वर्तमान आहे. किल्यात येते रात्री चिठिया नागोरच्या आल्या त्यात लिहिले आहे की पनासा लाखाची बोली आज जाली आहे. साकल्य मागून होईल ते लिहून.

नागपूरचे वर्तमाण कृष्णाजी गोविंद व केसो आपा वगैरे व आपाची धोंडाजी कुल मंडली राजश्री जानोजीपासी गेली. सर्वाही जानोजीचे आज्ञेत आसावे. ज़मिलबेगखानाचे लेकाचा नायेब बाळापुरी आहे तो बागी होऊन खोजे शरीफ यासी भांडत आहे. सबब की माहालातील पैसा वसूल नाही. हुजिरीहून तनखा जाल्या आहेत. सिबंदी पाचसे स्वार व हजार प्यादा आहे. लोकानी बतंग केले तेव्हा बाळापूरचे नायेबास लिहिले की खर्चास पाठवणे. त्याने साफ उतर लिहिले की परगन्यात अमल नाही. आम्हापासून रसद घेतली आहे ते देणे

---

१ खर्चून गेले ?

आणि पुढे तुम्ही आपला नायेब पाठऊन देणे. पैसा इतक्यावर आपनापासीं नाही. साफ उतर केले होते. यामुळे धनी व नौकर भांडत आहेत. मोंगलाईचे अमलाची बदवकरी[1] वराडात जाली आहे.

गुजरातेपलाकड खमाच (?) आहे. तेथे नुरुदीमहमदखान मोमीनखानाचा लेक भांडायास सिध जाला आहे. शंकराजी माहादेऊ सरकारचे तरफेने सेना घेऊन नाना प्रकारची उपाध करीत आहेत, भोताले पुरे होते ते जाळले. फैसला जाला नाही. विशष वर्तमान सरकारात आले असल ते खरे.

नवाब सलाबतजंग सिन्याहून पुढे कोस अठावीस गेले. गदवालवाल्यावर च्यार लाख रुो मोकरर जाले होते त्यापैकी यैवज आला तो फिरंगी घेऊन बसले आहेत. यामुळे कारभारी स्रमी. राजश्री माहादाजीपंत फौजेसुदा बिदनूर प्रांते गेले. मोंगलाच व त्याचा पनासा कोसाचा तफावत आहे. बिदनूर व श्रीरंगपटण येथील वकील आले आहेत. जाबसाल लागला आहे फैसल जाले नाही.

¶*News-letter giving news about the potentates of India in 1755. (i) The Emperor is having much difficulty with the rebels in the province of Panipat ; (ii) The siege of Nagore is being pressed with vigour ; (iii) Janoji Bhonsle has been recognised as the rightful successor to Raghuji by the Nagpur Sardars.*

---

*No. 70*+] [*4-9-1755*

भाद्रपद वद्य दशमीस
पत्रे आलीं मारनिलेकडून

श्री

**राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री**
**मुकासीबावा व राजश्री बाजीपंतबावा**
**व गणेशपंत दिवाणजी स्वामीचे सेवेसी**

पोष्य अतांजी माणकेश्वर सां नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल ता। श्रावण वद्य १३ त्रयोदसी मुकाम नजीक कोच यमुनातीर जाणून स्वकीय कुशल लेखन करीत गेले पाहिजे विशेष. बहुत दिवस पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं तरी सविस्तर लिहावें. आम्हाकडील वर्तमान तरी श्रीमंत राजश्री दादासाहेबांनीं राजश्री गोपाळराव गणेश यांस कुराजाहानाबादेचा मामला अंतरवेदीतील राजश्री गोविंद बलाल यांकडे होता तो दूर करून सनदा देऊन आमचे हातीं दिल्हे जे यांचा अमल बसऊन देणे. त्यावरून आम्ही दरकूच काल्पीस गेलो. राजश्री

---

१ अप्रतिष्ठा. + पु. २—ले.५२ मध्यें ह्याच मजकुराचें पत्र आलें आहे.

हरीपंतबावांची भेटी जाली. अंतरवेदीतून राजश्री गोविंद बलाल आले. त्यास गोविंद-पंत मामला सोडीत नाहींत. दरबारास जाऊन फडच्या करून यैसें बोलिले. आम्ही पार जावें इतकियांत राजश्री दताजी सिंदे यांची पत्रें मारवाडांतून आलीं जे राजश्री जयाजी सिंदे यांस दगा जाला तरी तुम्ही पत्रदर्शनी स्वार होऊन दाहा हजार फौजेनिसीं येणे मग पत्र वाचणे, यैसी लागोलाग च्यार पांच पत्रें आलीं. त्यास वरकड कामें टाकावी सारिखी जालीं. येक मारवाड सर जाले तरी तमाम हिंदुस्थानांत बंद होईल. साहेबकाम भारी जाणून अंतरवेदीत न जातां दरकूच मारवाडांत चालिलो. आम्ही देशीहून आलों ते समई पांच हजार फौज होती. जाजती विठल सिवदेव नारो शंकर वगैरे याकडील अडीच हजार फौज नवी ठेविली. येकूण साडे सात हजार व जाजती भदावरकर शेवढेकर व राजे गोपालसिंग व जाट वगैरे अडीच हजार फौज ठेऊन दाहा हजारानिसी बारा बारा कोसांच्या मजली करून मारवाडांत चालिलों. श्रीमंताचे पुण्येकरून ईश्वर उतमच करील. आपणांस कळावें म्हणऊन लिहिलें असे. राजश्री हरिपंतबावा कालपीस सुखरूप आहे. वरकड दरबारचे वर्तमान सविस्तर लिहावें. राजश्री विठल सिवदेव येथून कंबर बांधोन आले आहेत. आपण घडीघडीची बातमी राखावी. चिरंजीव आपा व बाबूराऊ तुम्हाकडे येतील. त्यास सालाबादप्रमाणें सेतसनदा व कोकणची दस्तकें व वेठे बिगारी गवत कापावयाचे वगैरे जे सालाबाद प्रों असेल ते दप्तरी रुजू पाहून कागदपत्र सनदा वराता साल मजकुरी लिहून घेऊन मुलांचे हवाला करणे. राजश्री मल्हाररावबावा रास्ते यांस पत्र पाठविले आहे ते त्यांस द्यावें. आमचे तीन महाल इटावे फुफुद शुकोवा(रा)बाद अंतरवेदींत जागिरीचे आहेत तेथील मक्ता श्रीमंत राजश्री दादासाहेबांनी करून मामला गोविंद बलाल यांकडे आमचे तर्फेनें दिल्हा असतां राजश्री नारो शंकर श्रीमंतापासी रदबदली करीत आहेत. जाजती चढ लावितात म्हणून ऐकिलें. त्यास आम्ही जागीर मुफत मेळविली नाही. कष्ट मेहनत करून मेळविली आहे. यैसें असतां नारोपंती चढ जाजती करावा हे उतम नाही. नारोपंतास रुो बहुत जाले तरी दानधर्म करावा अथवा श्रीमंतास नजर द्यावी. येविसी श्रीमंतास विनंती करून नारोपंतास निक्षून ताकीद करवावी. फिरोन आमच्या मामलियाचे नांव हे सरदारी बाग तुमचा आहे; वाळला तरी नुकसान तुमची; कल्याण असिले तरी तुमचे. दुशमन फार आहेत. सावध राहून थोरले यजमान भाशेस गोवणे हे विनंती.

¶*Antaji Mankeshwar writes that he is proceeding post-haste towards Nagore to relieve Dattaji Sindia who is hard pressed by the Rajputs.*

No. 71] [पौ 4-10-1755

पौ छ २७ जिल्हेज

श्री

सेवेसी विज्ञाप्ति. गोविद तमाजी याजवर राजे माधोसिंग यानी काये तुफान ठेऊन त्याचे घरी चौकी ठेविली. येअवरूनवर गोष्ट आली. तेव्हा त्यानी विष-प्रलयेकरून मृत्य पावले म्हणोन वर्तमान आले आहे. स्वामीस विदित व्हावे याजकरिता लिहिले असे हे विज्ञाप्ति.

¶*News is reported to the Peshwa regarding Govind Tamaji who put an end to his life by taking poison owing to the fact that guards were placed over him by Madhosing.*

---

No. 72] [9-10-1755 ?

छ २१ सफर

श्री

श्रीमंत राजश्री दादासाहेब स्वामीचे सेवेसी

विनंती सेवक रामाजी अंनत कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील वर्तमान स्वामीचे कृपावलोकनेकडून ताा छ २ मोहरम मुा नागोर येथास्थित आसे विशेष. छ २१ जिल्कादचे व छ २४ जिल्कादचे आज्ञापत्र सादर जाहले ते छ २९ जिल्हेजी पावोन लेखनार्थ कलला. येथील सविस्तर वृत राजश्री दताजी सिंदे व राजश्री जनकोजी सिंदे याचे पत्री सेवेसी लिहिले आहे त्यावरून विदित होईल. स्वामीनी जैनगरकराकडून तीन लाख रुपये देविले होते, त्यापैकी येक पैसा आला नाही. राजश्री दामोदर माहादेव याजकडून रोहिल्याबाा येवज देविला तोहि आला नाहीं. दिलीस माणसे मागती पाठविली आहे, उत्तर येईल त्याप्रमाणे सेवेसी लिहून पाठऊ. जाटाकडील येवज दोन लाखपैकी बारा हजार बाकी राहिले वरकड येवज आला. राणाजीकडील वसूल * * त येणे आहे याजकरिता उदेपूरची वकिली राजश्री विष्णुपंताकडे जाहाली. तरी तेथील वसुलाची हरतज-वीज होऊन वसूल होईल. सेवेसी श्रुत होय हे विज्ञाप्ति.

¶*Ramaji Anant reports progress in the work of realizing money.*

---

No. 73] [20-10-1755

श्री

श्रीमंत राजश्री भाऊ स्वामीचे सेवेसी

विनंती सेवक गोविंद बलाल कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती विज्ञापना. ताा आस्विन शुध १५ पावेतो स्वामीचे कृपावलोकनेंकरून सेवकाचें वर्तमान

यथास्थित असें विशेष. इकडील वर्तमान दोन तीन पत्रें पाठविली त्याजवरून विदित जाहालेंच आहे. राजश्री गोपालराऊ गणेश यांजला कुरा व कडा येथील सनद स्वामीनी देविली. त्यास मीहि येथे येऊन त्याजला राजी केलें. इकडे चहूकडे गडबड, फौज तैनातीस नाही; याजकरितां नवी फौज ठेऊन बंदोबस्त केला. दरमजलीनी सेवेसी येतों. हिसेब आज्ञेप्रो सर्व घेऊन येतों. पा भूगाव परगणा नवाब वजीर यानी नवाब अहमदखान पठाण फरुकाबादवाले यांजला जाहागीर दिल्ही. हे वर्तमान आम्हास कलले. भूगाव परगणा इटावे फफुंद सकुराबाद याजला लागला आहे. तेथे पठाण येऊन बसलियास तिनी परगण्यासी नित्य कजिया करितील. आमचा दस्त राहो देणार नाही. याजकरिता दिलीस वजिरासी पैगाम करून परगणा इजारा करून घेतला आणि वजिराची सनद नवाब अहमदखान याची तगिरी करून सनद घेऊन परगणा दस्त केला आहे. सनद आणून आपणाजवल ठेविली. सर्व परगणियाचा हिसेब घेऊन सेवेसी येतो. वर्तमान विदित करीन. हजार हुनरीने जागा घेतली. सर्व स्वामीची जागा आहे. हे वर्तमान सेवेसी येऊन विदित करीन. श्रीमंत राजश्री दादा स्वामीनी सनद पाठविलीच आहे परंतु स्वामीस वर्तमान विदित व्हावे याजकरिता लिहिले आहे. वरकड साद्यंत चिरजीव बाबूराव यास लिहिले आहे ते साद्यंत विदित करितील. जयेनगरी माधोसिंग यानी मामलेदार जिवे मारिले आणि दिलीस वकील पाठऊन पातशाहा वजीर याजला विनंती केली की, आपण मराठे याचा खून केला. तुम्ही बाहेर निघावे. आम्ही सामिल होतो. त्यास वजिराने सांगितले कीं, आपणावर सिबंदीचा पैसा चढला आहे. पोटास नाही. त्याजवर माधोसिंग वगैरे यानी सागितले की, तुम्ही बाहेर निघा आम्ही खर्च चालऊ. जाट, माधोसिंग, वजीर, रोहिलें च्यारी आसामी येक जाहाले. पुढे तोंफखाना व पातशाहा बाहेर निघणार. उपद्रव दिसतों. स्वामीनी या प्रांते मातबर सरदार मातबर फौज पाठविलिया बंदोबस्त राहील. दिलीत गडबड आहे. बाहेर निघणार. या प्रांते फौज नाही. मारवाड प्रांते राजश्री दताजी सिंदे आहेत, त्याजवर जावें, त्याजला तेथून उधळून लावावें आणि तमाम मुल्क दस्त करावा; हा मनसबा आहे. वरचेवर दिलीची लिहिली स्वामीस येतच असतील. आइकिले वर्तमान सेवेसी लिहिले आहे. वरचेवर जे होईल तें लिहीत जाईन. मी सेवक, मजला आज्ञा जाहाली ते मी करीन. परंतु दिलीस जामिनी गुंतली. स्वामीच काढून देतील. भूगाव परगण्याची सनद आणिली, तेव्हा पेसंगी[1] तूर्त पंनास हजार रुा दिलीत दिल्हे आहेत. सेवेसी साद्यं (त) तेथे आलि-

[1] आगाऊ दिलेली खर्ची.

यावर विदित करीन. वरकड साद्यंत चिरंजीव बाबूराव यासी लिहिले आहे. ते विदित करितील. या पत्रामागोमागे मीहि येतो. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*Govind Ballal describes to the Peshwa the efforts that the writer took in helping Gopalrao Ganesh to settle in his province and how he managed to establish his influence in the districts bordering on those occupied by Ahmadkhan Pathan. He further relates how Madhosing tried to subvert the Maratha influence in Delhi by promising succour to the Emperor and by persuading him to come out.*

---

No. 74]

[About 20th October 1755

(पाहिला बंद गहाळ)

(आश्वि) न सुध पंचमीस जाल्या. खासा अनरुधसिंगानी दोंशा राऊतानसी आम्हाकडे यावे याप्रमाणे कररामदार केला. तो त्यास खबर बिजेसिंगाकडील लोक व बखतवारमल दिवाण बिकानेरकर याची खबर कलली की दोन तीन हजार फौजनसी मदतीस आज उद्या येतात. त्यावरून दुसरे दिवसी बिघाडाची गोष्ट सांगितली. छ ९ मोहरमी त्यानी रामगडीहून कूंच केलें आहे. आमचे रोखे येतात. त्याजबरावर शाहापूरवाला उमेदसिंग याचे लोक व बाहादुरसिंग रुपनगरवाला याचे लोक व करोलीकर गोपालसिंग याचे लोक व उमेदसिंग बुंदीवाला याचा भाऊ दीपसिंग बरावर आहेत. यासिवाये त्याची घरची फौज बरावर आहे म्हणोन बातमी आली आहे. आसपास आमचे लोक आहेत. येका दो रोजानी याची त्याची झटपट होणार आहे. ईश्वरकृपेने त्याचें पारपत्य होईल. ते बहुतच संनिध आले, तरी स्वामीचे प्रतापेंकरून शत्रूचे पारपत्य येथायुक्त केलें जाईल. त्याची चिंता आहे ऐसे नाही. स्वामीचे आसीर्वादेकरून त्याचा आमचा मुकाबला जाल्यानंतर फत्तेच होऊन येईल. याउपर जे वर्तमान होईल ते वरचेवर सेवेसी विनंतीपत्रें पाठवीत जाऊ. आम्ही तर आपले तर्फेच त्यासी सामदामदंडभेद करावयास चुकलो नाही. ते होऊन गर्व धरून आम्हावर येतात. त्याची चिंता नाहीं. स्वामीचे तेजप्रतापेकरून उतमप्रकारे पारपत्य होईल. सेवेसी श्रुत होय हे विज्ञाप्ति.

¶*Marwad Campaign, 1755.*

---

No. 75]

[October 1761

**श्रीमोरया**

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री सखारामपंतबापू स्वौ पोष्य गंगाधर येशवंत साष्टांग नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये कुशललेखन

करीत आसिले पाहिजे विशेष. साप्रत आपणाकडून पत्र येवोन परामर्ष होत नाही. तरी सदैव पत्रीं संतोषावाप्ति करावी. इकडील वर्तमान तर आम्ही दिली प्रांतातून जाट, नजीबखान वगैरे ज्यांचे त्यापरी सौरश्य राखोन दरमजल विजयादशमीस इंदुरी आलों. येथें श्रीने घात केला यामुळे च्यार रोज येजमानास आवरोध जाला. तदनंतर माल्वे प्रांती बंदोबस्तास फौज पागा वगैरे रवाना करून आपल्या श्रीमंतांच्या लिहिल्याप्रमाणें स्वार होऊन यावें या उदेशांत होतो. हे वर्तमान माधोसिंगास कललियानंतर राजसिंग घोडचढा वगैरे माल्वे प्रांती रवाना केले आणि नेणवियावर निकट केली. इकडील विलग टाकून श्रीमंतांचे आज्ञप्रमाणे तिकडेच यावे, तर तिकडे बखेडा, इकडेहि बखेडाच; टाकून येता न ये. इकडे स्वार होऊन आलो. मासपक्षांत कछवियाचे पारपत्य होऊन बंदोबस्त होऊन येईल. राजे-रजवाडे हरामखोरी धरितात, त्यांचे पारपत्य करून सत्वरी आपल्याकडे येतात. राजश्री सुभेदारास श्रीमंतांचे पायाखेरीज दुसरे लक्ष कदापि नाही. स्वामीसेवेखेरीज आर्थ जाणत नाहीं. दुसरे, आपण म्हणतील, दक्षेणेत धण्यावरी काम पडले, हाजीर नाहित; याकरितां मनांत वाटेल. त्यासी, जरी राजश्री सुबेदार नर्मदेपार जाहाले म्हणिजे नजीबखान व सुज्यातदौला वगैरे सर्व हिंदुस्थान येक जाहाले. नर्मदेपावेतो दक्षणचे मोगल ते हे येकच जाहाले म्हणिजे फार जड पडेल. या-कारितां शह हिंदुस्थानांत दिल्हा. हें खरे जाणौन मनसबा येथार्थच आहे यैसे जाणौन दुरंदेसीने[१] विवेक आसो द्यावा. आपण सूज्ञ आहेत. श्रुत होये हे विनंती.

¶*Gangadhar Yeshvant writes to Sakharam Bapu that the disturbances created by the Rajputs make Holkar's presence in the North essential to Maratha prestige in consequence of which his march to the south has to be postponed.*

---

No. 76] [6-11-1755

**श्री**

**श्रीमंत राजश्री भाऊसाहेब स्वामीचे सेवेसी**

विनंती सेवक जनकोजी सिंदे कृतानेक दंडवत विज्ञापना. सेवकाचे वर्तमान तागाईत छ १ सफर मो नागोर स्वामीचे आसीर्वादे येथास्थित असे विशष. येथील

---

१ दुरंदेशी—दूरदृष्टी.

वर्तमान व जोतपुराकडील व जालोराकडील व कछव्याचे फौजेचे अनरुधसिंग दिडवाण्यामध्ये येऊन दाखल जाल्याचे सविस्तर पुरवणी पत्री तपसीलवार सेवेसी विनंती लिहिली आसे त्यावरून विदित होईल. सारांश स्वामीचे तेजप्रतापे सर्वहि रांगडे पादाक्रांत होतील. सेवेसी श्रुत होय हे विज्ञाप्ति.

¶*Jankoji Sindia writes from Nagore to the Bhausaheb.*

---

*No. 77]* *[November 1755*

**श्री**

सेवेसी विज्ञापना. अनरुद्धसिंग खंगोरांत यानी रामगडीहून कूच करून दीडवाणियास आल्याचे वर्तमान पूर्वी सेवेसी विनंतीपत्र लेहून पाठविले ते प्रविष्ट जाले असेल. ते समई तपशीलवार वर्तमान आले नव्हतें म्हणोन मोघमच सेवेसी विनंती लिहिली होती. मागाहून तपसीलवार वर्तमान आले त्यावरून सेवेसी लिहिले असे. अनरुद्धसिंग रामगडीस असतां त्याजपाशीं जमाव सेखावंत कुली सरदार व राजावंत कुली व नरोके कुली व कुभावणी व नाथावत खंगोरात व चव्हाण वगैरे रजपूत माधोसिंगाकडील जमाव होता त्यास सामील उमेदसिंग शहापूरवाल्याचे लोक व बहादरसिंग रुपनगरवाल्याचे लोक व गोपालसिंग करोलीकर यांचे लोक व हाडे बुंदीकर यांचा बंधु व गौडसोपारकर हे येऊन सामील जाले. मागून बख्तवरमल दिवाण बिकानेरकर व बिजेसिंगाकडील लोक असे जमावासुद्धा रामगडी असतांच सामील जाले. जमाव भारी म्हणोन गर्वारुढ होऊन कूच केले. यास्तव त्याचा मनोदये कीं दरकूच नागोरास जाऊन बिजेसिंगास सामील होऊन लढाई करून आम्हास नागोरी * * * द्यावा हा विचार करून कूच केले. त्याच दिवशी आम्हाकडील लोकानीं त्यांचे चंडोली शी(गाठ) घातली. तेथें आम्हाकडील लोकांची कामेकाजे उत्तम प्रकारे जाली. त्याचे फौजेतील रजपूत सातशे-आठशे ठार जागाच केले. त्यासिवाय जखमी केले. हजार बारासे घोडे घेतले. चालीस पन्नास उंटे घेतली. तोफा २ दोन व गंजिफा गाड्या दोन रहकेले चार दारु व गोल्याच्या वगैरे लढाईच्या सामानाच्या गाड्या दोन ऐशा लुटून कछव्याकडील मुरदे देखील काढूं दिल्हे नाहीं.

चंडोलाचा मोड करून माघारे हाटविले. त्या लडाईत आम्हाकडील लोक जखमी व मयत बितपशील.

| जखमी | मयत |
|---|---|
| १ मर्तुजाभाई तरवारेची जखम | १ कासिबा फालके वलद संताजी फालके पाडलीकर |
| १ कुसाजी जवार यास मांडीस गोली | १ उदाजी घारगे याजकडील भला माणूस दिंमत नरसिंगराव सिंदे |
| १ नाईकजी जाधवजी गोली गुडघ्यास | २ |
| ४० किा असामी गोली तरवारचे | २९ घोडी ठार |
| ४३ | |
| ४९ घोडी जखमी | |

येणेंप्रमाणें जखमी व मैत जाले. जुंज चार घटिका * * परियेंत होत होते. आम्हाकडील लोकानीं मोठी श * * * * कछव्याचा रेच मोडून थंडे केले. उपरांतिक अनरुद्धसिंग यानीं मध्यें बुनगे घालून * * यासी फौज व तोफखाना व प्यादे (ठे)ऊन दररोज दोन कोस आडीच कोस दरकूच दीड * * * ण्याचे सुमारे येऊं लागला. आमचे लोक असपास रात्र-दिवस राहतच होते. नित्यानी त्याची तटे व उंटे बैल संध पाहून अणीतच होते. तेव्हां निदान जाणोन अनरुद्धसिंग जीव वाचवावयास छ १४ मोहरमी दीड-वाण्यास येऊन पावला ते दिवशीं आम्हाकडील लोकांनीं मार्गातील विहिरी बुजवून जागाजागची तली रोखून उभे राहिले. लोकानीं बहुतच निकड करून कछव्याचे रजपूत तीनसे चारशे मारले. सेंभर सवासे घोडे घेतले. तीन तोफा सांडविल्या. प्रातकालपासून दोन प्रहर रात्रपर्यंत तीन कोस चालला. मार्गामध्यें पाण्यावाचून त्याचे लष्करचे रजपूत व माणसे व घोडी उंटे बैले वगैरे बहुत मृत्यु पावले. तेणेकरून बहुतच सिकिंदा जाला. कछव्याच्या लोकांची दीडवाण्याहून पुढें यावयाची हिंमत न जाली. बिजेसिंगाकडील लोक दौलतपूरचे व दीडवाणें मिलोन चारपांच हजार सामील जाले तरी कूच करावयाची हिंमत न जाली. या जुंजांत लोक जखमी व मयत.

| जखमी | मयत |
|---|---|
| १ राणोजी भोई ये * * * माडीस तीटरी * * * टून निघाली हा * * * वाचले असे | १ निबाजी सिंदे नांदूरकर |
| | १९ घोडी ठार |
| | १६ |

१ राणोजी जाबूलकर मानेच्या
 सुताटीजवळ गोळी जखम भारी
२१ किा असामी तरवारचे व
 गोळयाचे जखमी
____
२३
३९ घोडी जखमी.

येणेंप्रमाणें दुसरें जुजांत जखमी व मयेत जाले. लोकांनीं दोनी जुजांमध्यें शर्त केली. कामेकाजे उत्तम प्रकारे जाली. दीडवण्याच्या असपास आमच्या लोकांच्या चौक्या रात्रदिवस उभ्या राहून त्याची रसद व कहीं मना केली. विकानेरची रसद कछव्याच्या लष्करांत जात होती. त्याची बातमी आपल्या लोकांनीं राखून दौलतपुरासंनिध गांठ घालून रसद लुटली. सेंमर सवासे माणूस मारले. वरकड माणसे दौलतपुरियांस पलोन गेली. त्यामुळें रसद त्यांचे लष्करांत जाऊं पावत नाहीं. याजकरितां महर्गता विशष जाली आहे. तीन चारशेर धाण्य जाले असे. वैरणीचा तोटा बहुत आहे. दीडवाण शहर चांगले म्हणोन त्यास सामान पुरविले. त्यामुले आजपर्येंत त्याचे मुक्काम दीडवाणीयांतच आहेत. नाहीं तरी मार्गेंच लुटला असतां. अनरुद्धसिंगानीं विचार केला कीं आपले जाणे (नागोरे) होत नाहीं. नागोरास (जावे तरी) जाऊं देत नाहीं. त्यानीं फौजेचे बल पाहिले तो ती बल न धरी आण आम्ही आपल्या तोफखान्याची व लोक जमा करून त्याजवर जावयाची सिद्धता केली. हे वर्तमान येकोन स्वामींचे तेजप्रतापेकरून भयाभीत होऊन लाच्यार जाणोन सलुखाचा संदर्भ लावून राजश्री नरसिंगराव सिंदे व खानाजी जाधवराव व राणोजी भोईटे व रामराव निलकंठ याची भेटी आस्विन वद्य ११ एकादशीस दोनसे राऊतानें अनरुद्धसिंग येऊन भेट घेतली. परस्परे बोलणीचालणी बहुतच जाली. ठेराव जाला नाहीं. येथें येऊन कराररमदार करावा यैसा त्यानीं करार केला असे. परस्परे शफतपूर्वक जाली असे. तो नागोरवाल्याचीही रदबदली करीत असे. येथें चौपांचा रोजांत येणार आहे म्हणोन पत्रे आम्हाकडील सरदाराची आली असत. अनरुद्धसिंग येथें येऊन जो ठराव होऊन निछयामध्यें येईल ते सेवेसी तपशीलवार विनंती लेहून पाठवूं. अनरुद्धसिंग खंगारोत याणी बिजेसिंगास पत्र लेहून नागोरास पाठविले होते. ते व बख्तवरमल दिवाण दिंमत राजा गजसिंग बिकानेरकर याचे पत्र यैसी चौकीवर सांपडली होती ते सेवेसी पाठविली आहेत. त्याजवरून त्याचे कसकसे हाल जाले व त्याची फौज किती आहे ते साद्यांत विदित होईल. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*The movements of the various Rajput sardars and an action in which they were worsted are reported to the Peshwa.*

2270

श्री

फेरिस्त माहालानिहाय प्रांत हिंदुस्थान सुाा सीत खमसैन मया व अलफ

१ प्रांत बुंदेलखंड निाा गोविंद बल्लाळ
१ प्राा भोवरासे निाा मेघशाम बापूजी
१ प्रांत अंतरवेद निाा बापूजी माहादेव
१ प्रांत अंतरवेद निाा अंताजी माणकेश्वर
१ प्रांत अंतरवेद निाा गोपालराव गणेश
१ प्रांत अंतरवेद निाा गोविंद बल्लाल
१ प्रांत बुंदेलखंड वगैरे माहाल निाा हरि विठल
दिाा मेघःशाम बापूजी व गोपालराव बापूजी
१ पाा शाहाबाज निाा विठल सिवदेव
१ पाा ग्वालियेर निाा विठल सिवदेव
१ पाा दुराब निाा सिवाजी विठल
१ पाा कालाबाग निाा त्रिंबक हरि
१ पाा बेरसे निाा राघो गोविंद
१ माहाल निाा नारो शंकर
१ साा सेवढे निाा नारो शंकर
१ पाा उचाड निाा धोंडो नारायेण
१ साा उदेपूर निाा गोविंद कृष्ण
१ पाा भेलसे निाा राघो गोविद
१ पाा चंदेरी निाा हरबाजी कृष्ण
१ पाा चंदेरी निाा सदाशिव दामोदर
१ पाा इदोर व अ थ ई खेडे ?
निाा गोपाल केशव
१ पाा इदोरे व अ थ ई खेडें ?
निाा मोरो राघव
ताल्लुके उबारी निाा रामचंद्र गोविंद
१ माहाल निाा विश्वासराव लक्ष्मण
१ पाा सामखेडा निाा सदाशिव त्रिंबक
माहाल निाा जगजीवन पवार
१ पाा नरवर निाा सटवोजी जाधवराऊ

१ पा आष्टे नि। विष्णु माहादेव
१ ता। कपवाई पा रणोद नि। धोंडो कृष्ण
१ पा कुरोली मडरायेल नि। बाजी सखदेव
१ पा उदेपूर बासोदे नि। भगवंतराव अनंत
१ सा खेचीवाडा नि। विष्णु माहादेव
१ पा संबलगड नि। मनोहर कोनेर
१ सा सेवढे नि। भिकाजी ना। रास्ते
१ सा मंडले नि। महिपतराव केसो
१ तालुके उंबारी पा गुन्हा नि। पांडुरंग कृष्ण
१ किले माडवे व सोनगड
१ प्रांत अहीरवाड नि। गोपाल केशव

---

३७

चंदेरी नि। हरि दामोदर
१ प्रांत मालवा नि। जनकोजी सिंदे
१ पा सिरसी पांडोणी नि। जनकोजी सिंदे
१ प्रा बुंदी नि। जनकोजी सिंदे
१ पा पाटण केशवरायाचे
१ ठाणे बिझरावण वगैरे गाव नि। जनकोजी सिंदे
१ पा आष्टे नि। विष्णु माहादेव
१ प्रा मालवा नि। कृष्णाजी पवार
१ पा खुटावद नि। माहादाजी अंबाजी
१ जलाली बिलसद नि। भगवंतराव अनंत
१ अकबरापूर बिरबलाचे
१ सावेर व सुज्यालपूर
१ प्रा मालवा नि। मल्हारजी होळकर
१ किले ग्वालेर नि। गोपालराव गणेश

---

१ पा रेवा मुकुंदपुर नि। मानाजी पायगुडे

¶*A list of the provinces recognising Maratha suzerainty and the officers by whom they are managed.*

2272

No. 79] [21-1-1756

पो छ १८ रबिलाखर

श्री

पुरवणी श्रीमंत राजश्री भाऊसाहेब स्वामीचे सेवेशी

विज्ञापना ऐसीजे. जयेनगरप्रांती येतांच मागती राजश्री जनकोजी सिंदे याची पत्रे आली. स्वामीचीहि आज्ञापत्रे एकदोन पावली. त्यांत अज्ञा कीं जयेनगरचा मुल्लुक जालून फना करणें. त्याजवरून जेथवरी आमचा हात पोहचला तेथवरीं मुल्लुक जाळिला. या मोहिमेमुळें कर्ज फार जाले. आगरियाच्या साहुकारांत पत चांगली होती व राजश्री गोविंद बल्लाल यानीं उपराला सरंजामपैकीं व कर्जाऊ उभारणी केली आणि मोहीम सिद्धीस नेली. सुरजमल जाटाच्या चित्तापासून आम्हास दगा करावा, पुत्र दहा हजार निवड करून व माधोसिंगाचा बकसी मिलोन कोठे तरी दगा करावा ऐसे होते. परंतु स्वामीचा प्रताप थोर. सेवकानेंच त्याचा मुल्लुक मारून त्याच्या उरावरून आलो. त्याणीच शेवकाची दहशात खादली. स्वामीची कृपा चित्तापासून मजवरी आहे ते कृपेनें जेथें जाईन तेथें स्वामीचा नक्ष राखीन. स्वामी खानाजादावरी अधिकोत्तर कृपा करीत असिलिया सेवकापासून मोठी मोठी चाकरी होऊन येईल. खाजगत वर्तमान तरी आमच्या-फौजेंत एकाच्या चित्तात नव्हते जे मारवाडांत जावे. मारवाडांत पांचसेर दाणे व एका रुपयाचे गवत एका घोड्यास पुरेना. पाणी दीडशा हातावरील व मार्ग कठीण. मध्यें आडवे जाट कछवे वगैरे फौजा. येवढे संकटांत न जावे. अंतरवेदींत असावे. परंतु राजश्री जयाजीअपासारिखा सरदार मारिला गेला. राजश्री दत्ताजी सिंदे याची पत्रे नानाप्रकारची आली. मुख्य निरोपाचे समईहि मजला आज्ञा होतीच व राजश्री अपाहि माझा हरएकविसीं भरंवसा राखीत होते या गोष्टींवरी नजर देऊन आपले सर्व स्वार्थ एकीकडे ठेवून जिवाचा संकल्प करून जेथवरी कर्ज मिलेल तेथवरी मेलऊन येऊन पोहचलो. येथें आलियाउपरी राजश्री जनकोजी बावा व दत्ताजी बावा संतोषी जाले. पुढें स्वामीचा पुण्यप्रताप तरी याउपरी उत्तमच मनसबा घडोन येईल. गोहदकर जाठ याणी आतां अम्हासी चांगला सलूख केला. फौज चाकरीस सांगाते दिल्ही आहे व निमे मुल्लुक वाटून द्यावा त्याच्या वाटण्या केल्या आहेत. याउपरी गोहदकराविसी तेथें कोणी पुण्य वेचील तरी स्वामीनीं ध्यानास अणावे. भदावरकर राजे यास टिका करून हत्ती सिरपाव व वस्त्रे घोडा श्रावणमासीच दिल्हा. हत्ती घोडा सिरपावाचे परभारे दहा हजार निराले करून निव्वल सरकारची नजर पन्नास हजार रुपये करून साहा

महिनियाचे मुदतीनें सावकारी निशा करून आम्ही घेतली. याखेरीज त्याणी आम्हास कांहीं कबूल करून टीप जेष्ठमासचे मुदतीची करून घेतली आहे. ते मुदतीस त्याजपासून घेऊन तेहि कलम सरकारचे सरकारांतच जमेस येईल. परंतु राजश्री नारो शंकर त्यासी अदावत करितील तरी त्यास स्वामीनीं ताकीद करून भदावरकरास गौरसीचे पत्र पाठवावें. नारोपंताचे कारकून आम्ही बोलाविले त्याणी साफ उत्तर पाठविले जे राजा भिकारी आहे. दहा पंधरा हजार करार कराल तरी आम्ही येऊं नाहीं तरी तुम्ही जाणा ते जाणा. मग आम्ही परभारे केले. सरकारचे केले तेहि सरकारचे व आम्हास देऊ केले तेहि सरकारचे, याप्रमाणें आहे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Antaji Manakeshwar sent to succour Dattaji Sindia in Marwar, reports his proceedings.*

---

*No. 80*]

पौ छ १८ रबिलाखर

**श्री**

**पुरवणी श्रीमंत राजश्री भाऊसाहेब**
**स्वामीचे सेवेसीं**

विज्ञापना ऐसीजे. प्रस्तुत बिजेसिंग बिकानेरास गेला तो पलत फिरतो. बिकानेराभोंवते बारा कोस पाणी विहीर देखील नाहीं. जयेनगरची फौज घेरली त्यांत बिजेसिंगाचे लोक बिकानेरवाले व रूपनगरवाले झाडून पंचवीस हजार आहेत. परंतु आमच्या लस्करांत माहाकाल. च्यार सेर दाणे रुपयाचे आहेत. हे आठा चौं दिवसानीं रात्रीं पलोन जातील तऱ्ही लुटींतच आहों. नाहीं तरी महिना पंधरा दिवसा सडऊन बुडऊं. परंतु बिजेसिंग हातीं लागतां दिसत नाहीं. माधोसिंग पांच लाख रुपये नजर देऊन आपले फौजेस मोकलें करावयास सिद्ध आहे, परंतु याजला सोडावें ऐसें नाहीं. बिजेसिंग याचेंच नांव तूर्त ठेवावें लागतें. फौज आम्हांपासी भारी. यास पैका किती पाहिजे? येथें कोरा रोजमराच दीड लाख रुपये महिनियास लागतो. ऐसें असतां साल गुदस्तां समजाविसी नालबंदीपैकीं वरात रुपये ७०,००० सत्तर हजारांची राजश्री हरि विठल यांजवरी दिल्ही होती ते सालगुदस्तां त्याणी दिल्ही नाहीं. साल मजकुरीं देतो ऐसें मान्य केलें असतां हालीं हरि विठल याचें पत्र आलें जे श्रीमंतानीं वरात मना केली कीं रुपये न देणें. सुरजमलाकडील यैवज नेमून

दिल्हा त्यास इसनेचे रसदेबद्दल रुपये येक लाख नेमून घेतले होते तो हिसेब पुणियांत येकंदर हिसेबीं आला होता तो हिसेब न पाहतां नेमून घेतले होते ते सरकारचे रुपये आम्हीं घेणार नाहींत. सुरजमलाकडील नेमणुकेपैकीं येक रुपया साता लाखांत वसूल जाला नाहीं. पांच महिने ब्राम्हण बैसले आहेत. त्याचा मतलब रजपूत आपण येक व्हावें. शहाजादा बाहेर काढावा. तमाम हिंदुस्थानांतून मऱ्हाटे बाहेर घालवावे! तेथें रुपये देणे कलतच आहे! साता लाखापैकीं सरकारचें येक लाख, दुबारा नेमणूक करून घेतली आहे ते सहा लाख आमचे. त्यांत मागती राजश्री मल्हारजी होलकर यांस देविले येक लाख त्रेसष्ट हजार रुपये. वरकड आम्हांकडे. त्यांत येक कवडी वसूल नाहीं! वसूल जालियाउपरी सरकारचे लाख रुपये सरकारांत वसूल देऊं. राजश्री मल्हारजीबावांचे त्यांच्या ब्राम्हणांजवल देऊं. आमचे आम्हीं घेऊं. आमचे सिबंदीचे दाहा लाख सरकारांत आसिले तरी सरकारचे लाख रुपये आम्हीं दुबारा घेणार नाहीं. परंतु येक ताकीद सरकारची सुरजमल जाटास परभारी पाठवावी जे तुम्हांकडील दरोबस्त सालाचे सात लाख रुपये राजश्री अंताजीपंतास देविले, त्यास येक रुपया अद्यापि दिल्हा नाहीं हें तुम्हांस उत्तम आहे ऐसें नाहीं. हें पत्र पावतांच सात लाखांची निशा अंताजीपंताची करणें म्हणून जरूर ताकीद पाठवावी. आमचे घरी चिरंजीव व्यासरायाचें आमच्या पुत्राचें लग्न आहे. साहित्य उपसाहित्य काडीचें नाहीं. शाहाजी माने यास मौजे धामोरी गांव जागीर दिल्हा. सनद स्वामींनी दिल्हा असतां अमल अद्याप मिलत नाहीं व राजश्री नारो बावाजीकडून नेवास परगणियांत येका हजाराची वसुली तावरें यास देविला. सनद दिल्हा असतां गांव अद्याप पावला नाहीं. पिपलगाऊ मालवी येथील आंबराईपैकीं इरसाल झाडें पस्तीस स्वामींनी सनद करून दिल्हीं असतां मागती गोपाळ शंकराकडे देविले. त्यास आम्हांस सनद दिल्ही असतां या मुलकांत आम्ही असोन मागें दुसरियास द्यावें? आम्ही आलियाउपर मग देणे तरी द्यावें. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Antaji Manakeshwar informs the Bhausaheb what he has been doing against Bijesing and his chances of success and further requests him to write to Surajmal to pay at once to the writer the sum of 7 lacs already agreed upon to enable him to pay the rojmura to the Army which is long in arrears.*

No. 81] [22-1-1756

श्री

* * * * राजश्री पंत (प्रधान)
* * * स्वामीचे सेवेसीं

* * * गोविंद बलाल कृतानेक सां नमस्कार * * * * ता। पौष वद्य पंचमीपावेतो स्वा(मीच्या कृपाव) लोकनेकरून सेवकाचे वर्तमान येथास्थित असे विशेष. इकडील सविस्तर वर्तमान पेशजी (पत्री) लिहिलेच आहे त्याजवरून विदित जाले * * * * आली देशास यावें स्वामीचे चर * * * इकडील बंदोबस्त करून चिरं(जीवासी) पुणियासीं यावे हा विचार * स्वामीचे आज्ञापत्र सादर जाले. तुम्ही देशास (आल्यास) जागा खाली पडेल. जमीदार हरामजादे * करितील यास्तव तुम्ही देशास न येणे. तिकडील बंदोबस्त राखणे म्हणोन आज्ञा * थील जमीदार मोठे हरामजादे, हमेशा फौज जबरदस्ती असिली तरीच दबतात. फौज (नसल्यास) फिसाद व्हावयासी विलंब नाहीं; परंतु * * * येऊन हिसेबचा फडशा करावा हे ज * * * स्वामींनी आज्ञा केली कीं न येणे त्याजवरून * * * विचार केला. इकडे राहून बंदोबस्त * * देशास येतो तर इकडील बंदोबस्त * * राहता हेहि खरेच आणि दे * हिसेब फडशा करावयास्तव त * * * जावयाच्याहि विचारात होतो * ची आज्ञा जाली त्याजवरून * * महिने राहिले. स्वामींनी फौज आम्हाकडे तैनातीस पाठविणे. फौज * * या प्रांती ठेऊन बंदोबस्त करून देशास येऊं. वरकड वर्तमान चिरजीव बाबू * * लिहिले आहे त्याजवरून विदित करितील. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Govind Ballal to the Peshwa saying that the writer will first restore order in the province in the North by curbing the recalcitrant zamindars and then return to the South as directed by the addressee.*

---

No. 82] [January 1756

२ श्री

पुरवणी श्रीमत राजश्री पंत
प्रधान स्वामीचे शेवेसी

विज्ञापना. तेव्हा राजश्री जानकोजी सिंदे यांचीं पत्रें आलीं कीं, जोतपूर प्रांते जाऊन ती फौज मारून काढणे. त्यावरून कूच करून जोतपूर प्रांतें गेलों.

फौजेची आवाई ऐकोन बिजेसिंगाचा पुत्र फौजसुधां पलोन गेला. अंमल जागां जागां पूर्ववतप्रमाणे बसला. उपरांतिक मागती नागोराहून पत्रें राजश्री जनकोजी सिंदे यांची आली की फौज त्या प्रांते ठेऊन सडे सेपनासानिसीं भेटीस येणें. त्यावरून चिरंजीव तात्या फौजसुधां जोतपूर प्रांते ठेऊन आम्ही सडे नागोरास आलों. राजश्री दताजी सिंदे व राजश्री जनकोजी सिंदे यांची भेटी जाली. त्याणी कितेक मनसबा वि( चा )रिला. आम्हास जो अर्थ सुचला तो सांगितला. तेव्हां बिजेसिंगाची मामलत केली. जालोर व अजमेर दोन किले द्यावे, पंनास लक्ष रुपये नख्त द्यावे व निमे मुलूक वांटणी करून द्यावा; येणेप्रमाणे करार जाला आहे. राहाताना येक जोतपूर मात्र त्यांजकडे राहिलें आहे, तेंहि संकटास्तव राहिलें. लस्करांत च्यार (सेर) दाणा व च्यार सेर वैरण; तेहि न मि(ले). दिवसेंदिवस कमी पडत चालिले. फौज बुडाली. बाकी कांही राहिली नाही. यैसें चौंकडून संकट जाणून मामलत केली आहे. निमे मुलूक घ्यावा, त्यास राजे रामसिंग याणी थोडे बहुत पैकियाची वाट केली तरी निमे मुलूक घेतला तो त्यांजकडे द्यावा. काहीच यैवजाची तरतूद न होये, तरी मग सरकारांतच मुलूक ठेऊन आपला अंमल करावा. पंनास लक्ष रुपये करार केले; पैकीं पंचवीस साल मजकुरीं द्यावें, पंचवीस राहिले ते दोन सालांत पुढिल्या द्यावे यैसा करार केला आहे. तहसिलेबदल आठ च्यार दिवस येथें मुकाम आहे. उपरांतिक येथून कूच करून जयनगर प्राते जाणे होईल. तिकडीलहि, हे विज्ञापना. [अपूर्ण]

¶*Terms of the treaty proposed by Sindia, on behalf of Ramsing, to Bijesing are reported to the Peshwa.*

---

*No. 83*] [*29-3-1756*

**श्री**

राजश्री मल्हारजी बाबा होलकर सुभेदार गोसांवी यांसी सकलगुणालंकर्ण अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नो अंताजी माणकेश्वर आसीर्वाद विनंती उपरी. येथील कुशल ता। फालगुण वद्य १४ मु। नजीक रूपनगर सुखी आसो. या प्रांतीचे वर्तमान आम्ही याजपासी राजश्री जयापाचा काल जालियाउपरी आलो ते साद्यंत पूर्वी दोन वेळा तपसील सेवेसी लिहिलाच आला. जे आमच्यानें श्रमसाहास जाले ते जीवापेक्षा दाहा हजार फौज घेऊन केले. याचे श्रीमंतास त्यानी काये लिहिले असेल न कले. प्रस्तुत बिजेसिंगाने मामलत पनास लाखांची

+ पत्र अंताजी माणकेश्वराचें.

ली. निमे मुलूक वाटावा. जालोर किला दिल्हा. नागोर जोतपूर विजे-
गाकडे राहिलें. याप्रो सलूख करून येक महिना जाला. कूच केले आहे.
हिबांस कलावे म्हणून लिहिलें असे. आपण सदैव कृपा करून पत्री सांभाल
रीत आसावा. माया निष्ठुर न करावी. आमचेविशी श्रीमंतासही विनंती
रून सर्व प्रकारे ते कृपाच करीत ते करावयासी आपण वडील आहेत. पहिले-
ासून आपले आहो त्यापेक्षा कृपा करून सांभालास अंतर न करावे. आपणा-
ाडील साद्यंत वर्तमान लिहून संतोषवीत असावे. आता प्रस्तुत मारवाडचा गुंता
ाहीं. पुढें होईल वर्तमान तें तपसीलवार लिहून पाठऊन. आपला गुंता त्या प्रांती
केतीकां दिवसांचा आहे? या प्रांती कधी येणार ते लिहून संतोषविले पाहिजे.
बहुत काये लिहिणे? कृपा लोभ आसो दिल्ही पाहिजे हे विनंती.

मुद्रैषा शंभुचरण-
द्वंद्वनिष्ठस्य सर्वदा
माणिकेश्वरसंभूत
अनंतस्य विराजते

¶*Antaji Manakeshwar from the vicinity of Rupnagar reports the treaty patched up between Bijesing and Ramsing, the rival claimants of Marwar, according to which the Marathas will receive 50 lacs while the two cousins divide the kingdom among themselves.*

---

*No. 84]* *[19-4-1756*

**श्री**

**श्रीमंतर माहाराज राजश्री पंत**
**प्रधान साहेबांचे सेवेसी**

प्रतिपूर्वक निंबाबाई शिंदे दंडवत विज्ञापना. येथील कुशल तागाईत चैत्र
वद्य ५ पंचमी जाणून साहेबाचे कृपावलोकनें येथास्थित असें. साहेबांकडील कांहीं

वृत्त कळत नाहीं तेणेंकरून चिंतार्णवीं असों. तरी आनंदरूपाचें वृत्त लेखन केलें पाहिजे. मारवाडांतील वर्तमान चिरंजिवाचीं पत्रें आम्हास आली नाहींत परंतु मालव्यातून वर्तमानें येतात कीं मारवाडचा तह जाला. लष्कर नागोरावरून कूचे करून मेडत्यावरी आलें, ऐसें वर्तमान आहे. चिरंजीवाचीं पत्रें आलियावरी सेवेसी लेखन होईल. सेवेसी श्रुत जालें पाहिजे हें विज्ञाप्ति.

¶*Nimbabai Sindia—Ranoji Sindia's wife—communicates to the Peshwa the news that her sons have arrived at a peaceful understanding with the Rajputs and have withdrawn their forces towards Medta.*

---

*No. 85*] [*9-5-1756*

श्री

श्रीमंत राजश्री दादासाहेब
स्वामीचे सेवेसी

विनंती सेवक दताजी सिंदे कृतानेक दंडवत विज्ञापना. सेवकाचें वर्तमान तागायत छ ९ साबान मो रूपनगर स्वामीचे आसीर्वादें येथास्थित असे विशेष. आज्ञापत्र पाठविलें तें पावलें. तेथें आज्ञा मारवाडचा गुंता सत्वर उरकोन मोकलें होणें. अत:पर स्वारींचे दिवस राहिले नाहीं म्हणून तपसिलें आज्ञा. यैसियास आज्ञेप्रमाणें बिजेसिंगासी तह करून नागोरीहून कूच केल्याचें वर्तमान तपसिलें पूर्वी सेवेसीं लिहिलें आहे त्यावरून विदित जालें असेल. प्रस्तुत रूपनगरास येऊन मोर्चे लाविले आहेत. राजश्री समसेरबहाद्दर छ ९ साबानीं येथें आले त्यानी मोर्चे लाविले आहेत. मोर्चे संनिध गेले आहेत. थोडके दिवसांत येथील कार्य स्वामीचे तेजप्रतापें उरकोन मागाहून तपसीलवार सेवेसीं विनंतीपत्र लेहून पाठऊं. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञाप्ति.

¶*Dattaji Sindia writes to the Peshwa that after finishing the Marwar affair he has invested Rupnagar.*

---

*No. 86*] [*26-5-1756*

पा छ ९ सवाल

श्रीगजानन प्रसन्न

श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामीचे शेवेसी

विनंती. शेवक नारो शंकर कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. शेवकाचें वर्तमान छ २६ साबान मुकाम नजीक मडफा प्रांत बुंदेलखड स्वामीचे कृपावलोकनेकरून येथास्थित असे विशेष. माघ मासीं झांसीस येणे जाले. तदनंतर

विसा रोजानी तयारी करून राजश्री दतबाकडें मारवाड प्रांते जावयाची सिद्धता करून कूच केले तों श्रीमंत मातुश्री सगुणाबाई झांसीस तेच दिवसीं दाखल जाली. त्याजमुळें आठदाहा दिवस मुकाम जाले व राजश्री समसेरबाहादर यांचीहि पत्रे आली कीं तुम्ही पुढे न जाणे समागमेंच सामील होऊन जाऊ. याजवरून पंधरा रोजांचा गुंता पडला. याउपर कूच करून दरमजल जावें या उदेशे नरवरपर्यंत आलो तों राजश्री दतबाची पत्रें पांच सात मुजरद जासुदासमागमे आली की तुम्ही राजश्री गोविंद बलाल याजकडे जाऊन त्याचे मामलतीचा बंदोबस्त करणे. त्यावरून दरमजल कडे व सहजातपूर श्रीगंगातीरीं गोविंद बल्लाल यांची भेटी जाली. तदोतर सासातसे स्वारानसी श्रीप्रयागस्नान करून मागती मशारनलेसमागमे बुंदेलखंडांत आलो. याचा तहरह लौकरच होईल. तदनंतर मशारनलेपासून निरोप घेऊन झांसी प्रांते जाऊ. दोन वरसे दरबारी राहाणें जालें याजमुले आमचे खासगत मामलतीचा बंदोबस्त राहिला नाही. च्यार मास राहून पारपत्य करून बंदबस्त करावा तरी चाकरीची आज्ञा वारंवार जाली त्यावरून इकडे येणें जालें. प्रस्तुत यांचे मामलतीचा बंदबस्त उतमच आहे. बखेडा कोठे राहिला नाही. यास्तत्र झासीस जावयाचा विचार करून जाऊ. अखेर सालहि जाले. सोंढे वगैरे जाटाकडील पैसा आला नाहीं. विनापारपत्याखेरीज पैसा येणार नाही. पुढें सेवढियाचा मुलुक आज्ञेप्रमाणे वाटून घ्यावा लागतो. ये गोष्टीस फौज सुधां च्यार महिने मेहनत करावी तेव्हां बंदबस्त होणें तो होईल. आमचे मुलकांत राहणें न जालें याजकरितां निमे वसूल निमे बाकी मामलतीत राहिली. सरकारचा पैसा तों कराराप्रमाणें द्यावाच लागतो. साहुकारांचे कर्ज घेऊन भरणा करावा लागतो. फौजेस देखील पोटास कर्ज खर्विसे जाले आहे. मुलकांत पैसा येणे तो जबरदस्ती पोहोचल्याखेरीज येत नाही. शेवेसी विदित व्हावे. पुढे आज्ञा होईल तेणेप्रमाणे वर्तणूक केली जाईल. करनाटक प्रांती स्वामीस मेहनत भारीच पडली. मुरारजी घोरपडे व मुजफरखान यानी हरामखोरी केली. तेणे प्रमाणे सज्यावार[१] जाले. यैसा वाखा त्याचा कधीच जाला नसेल. स्वामी धर्ममूर्तिप्रतापेंच शत्रू पादाक्रांत होऊन शरणागत जाले. स्वामीचा तपप्रताप वर्णावयात येत नाही. ईश्वर सलामत राखो. स्वामी गरीबनवाज बहुतांचे छत्र आहेत. सेवेसी शृत होय हे विज्ञापना.

¶*Naro Shankar's letter to the Peshwa referring to his activities during the past year. It sounds a note of optimism on the peaceful atmosphere in the North and the addressee's successes in the South.*

---

१ शिक्षा पावले.

No. 87] [1755?

श्री

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री विष्णुपंत स्वामीचे
सेवेसी

पो। गोपाळराव गणेश सा। नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल ता। छ २ सवालपावेतो मु। ग्वाल्हेर येथास्थित जाणून स्वकीय कुशल लिहित गेले पाहिजे विशेष. श्रीमंताची आज्ञा घेऊन किले ग्वालेरीस आलो. राजश्री बाबूराव भास्कर यास फौजसहवर्तमान अंतरवेदीत कुराज्याहानाबादचे बंदोबस्तास पाठविले आहेत. किल्हे ग्वाल्हेरीचा जकिरा उतरावयासी दिसगत लागली यास्तव आम्ही राहिलो. जकिरा व जाटास उतरून किल्याचा बंदोबस्त जालियावरी आम्ही अंतरवेदीत जाऊन. राजश्री गोविंद बलाल याचे (मा)नस कीं महिना दोन महिने मनसब्याखाली घालून हुजूरचा जाब आणवावा. येविसी आम्हीहि साद्यांत वर्तमान श्रीमंतास लिहिले आहे. प्रसंगी आपण आहेत. साहित्य करून गोविंदपंतास ताकीदपत्राविसी श्रीमंतास विनंती करावी. बहुत काय लिहिणे लोभ कीजे हे विनंती.

¶*Letter announcing that Gopal Ganesh has occupied the fortress of Gwalior on its evacuation by the Jats.*

---

No. 88] [19-10-1756

श्रीगजानन

श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामीचे सेवेसीं

विनंती सेवक नारो शंकर कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील सेवकाचें वृत्त स्वामीच्या कृपाकटाक्षेंकरून ता। आश्विन वा। ११ मुकाम जनस्थान यथास्थित असे विशेष. राजश्री अंताजी माणकेश्वर राजश्री गोपाळराव गणेश याजकडील अंतर्वेदचे मामलतीचा बंदोबस्त करून द्यावयानिमित्य ग्वालेर प्रांतींहून स्वार जाले ते फौजसह प्रांत भदावर व कछवाघार येथील सरदेस येऊन राहिले. कांहीं दिवस प्रांत मजकुरीं राहून मागती मारवाड प्रांतें जावें हा मनसबा करून प्रांत मजकुराहून ग्वालेरीकडे आले. जातां येतां व मुलकांत मुकाम करून राहिले तेव्हां धामधूम फार केली. खरीफे गावगनांची कापून नेलीं व पाटील पटवारी गावांतील जमीदार मातबर पाहून धरून आणून पैकाहि घेतला. आम्हाकडील तालुकदार त्या प्रांतीं होते त्यानी पंत मा।रनिलेपासीं जाऊन धामधुमेविषयीं विनंती बहुतसी केली. परंतु कोणाचेंहि ध्यानावर न घेतां मुल्क

बळेंच लुटिला. खरीपाची तहशील बुडविली. येके धणियाचे सेवक असतां याप्रमाणें अंताजीपंतीं मुलकाची खराबी करावी हें उचित नाहीं. आम्ही देशीं गुंतलों. तिकडे त्यांणीं मनास येईल त्याप्रमाणें धामधूम करून जमीदार नागविले. येणेंकरून अंमलांत खलेल होऊन खरीपाचे तहशिलेंत भदावर व कछवाघार मिलोन पाऊण लक्ष रुपयांचें नुकसान पडलें. याप्रमाणें तेथील तालुकदारांचीं पत्रें नाशकास आलीं, त्या वेळीं व आगोधर पुणियांत असतां राजश्री लक्ष्मण नारायण आमचे तर्फेनें झांसीस आहेत त्यांची पत्रें याप्रा पंत मारनिल्हेच्या कर्तृत्वाचीं आलीं तेव्हांहि स्वामींजवळ विनंती केली व आतां बजिन्नस कमावीसदारांची महालो-महालचीं लिहिलीं आलीं त्यांवरून सेवेसीं विनंती लिहिली असे. मुलकाचे नुकसानीचा इनसाफ करणार महाराज समर्थ आहेत. आधींच यंदा पर्जन्यानें उघाड दिली यामुळें महागाई पडोन रयत आनास आजीज जाली. कोणे गोष्टीची आस्त राहिली नसतां आम्ही महाराजांची मर्जी संपादन करून आलों. देशीं पैका कर्जें काढून भरला. मुलकांत बाकी बेमुबलग राहिली ते व सालमजकूर उगवणें त्यांत याप्रमाणें विघ्नें जालीं. या सेवकाचा तरणोपाय कोणे प्रकारें होईल, येशि-याशी स्वामी कृपाळू आहेत. मामलत इजारियानें भारी बसली. याकरितां सेवकास रा आंताजीपंत यांणी याप्रा नुकसान केलें त्याबद्दल आज्ञा कर्तव्य ते करून ज्यांत तरणोपाय होत तें केलें पाहिजे व राजश्री पंत मारनिल्हेसहि (?) येक ताकीद लिहून पाठवावी जे तुम्ही भदावर कछवाघार प्रांतचे गांव जातां येतां व तेथें फौजेसह मुकाम करून लुटून खराबी केली, पिकें कापून नेलीं, तर तो मुलूक कांहीं दुसऱ्याचा नाहीं. तुम्ही सरकारचे चाकर असोन याप्रां सरका-रचेच मुलकाची खराबी करून नुकसान केलें हे गोष्ट कार्यास येणार नाहीं. नुकसान केलें त्याचा पैका राजश्री नारो शंकर याजकडील कारकुनाचे विद्यमानें होईल तेणेंप्रमाणें तुम्हांस देणें लागेल, यांत अंतर होणार नाहीं. ऐसें ताकीदपत्र पंतमारनिल्हेस द्यावयास आज्ञा करावी, आणि या नुकसानापासून सेवकाचा निभाव होय हें करावें. मुलकांत अनावृष्टीमुळें महागाई जाली हे आफत. तशामध्यें रा अंताजीपंतीं रयत लुटून खलेल केले याकरितां विनंती सेवेसीं लिहिलेली असे. निभाव करणार महाराज समर्थ आहेत. यानंतर राजे सावंतसिंग वोडसेकर यांसी माघारें घेऊन जावें म्हणून आज्ञापत्र सेवकास पाठविलें व राजे मजकूर यांसहि जाण्यानिमित्त एक पत्र पाठविलें तें पावलें. राजे मजकूरहि नाशकास दाखल जाले. पत्रें त्यांस दाखविलीं व करारमदार हुजूर ठराविला तोहि त्यांस सांगितला. परंतु राजे नगरसेटीच्या उपद्रवाकरितां तीर्थवासच करून राहूं म्हणून श्रमी होत आहेत. नगरसेटीनें राजा देशास आलियावर राज्याचे

प्रांतांत सक्ती करून पैका मुबलक घेतला. सात्र महाजन व जमीदार लुटले यामुळें दरोबस्त मुलूक उजाड जाला आहे. हें वर्तमान तिकडून लिहिलें आलें व राजांनींहि सांगितलें. परंतु स्वामींनीं (एक[1] ओळ फाटली) पाठवून द्यावे जे राजियाकडील कर्जवामाचा बंदोबस्त हुजूर करून कारकून फैसलियावर पाठविले आहेत ; त्याप्रां तुम्ही वर्तणूक करून मुलकांत मनमानेसा पैका जाजती घेतला असेल तो वाजबी रुजुवातीनें तुम्हाकडे लागेल त्याप्रां फिरोन देणें. याप्रमाणें नगरसेटीस एक पत्र पाठवून कारकुनाचीहि रवानगी सत्वर केली पाहिजे. म्हणजे राजियांचें समाधान करून घेऊन जाऊं. भदावरचे राजियाकडील करार-मदार जालियाप्रा त्यांसहि पत्रें पाठवावीं व हाती सिरपाव बा देणें तो उत्तम द्यावयाची आज्ञा करावी म्हणजे राजियाचें समाधान होईल. तैनाती फौज जे योजून देणें त्याचीहि आज्ञा करून रवानगी केली पाहिजे. किरकोळी गांवखेड्याबा कामें मागाहून करून पाठवितों. तुम्ही आज्ञा घेणें म्हणोन सेवकास आश्वासन दिलें त्यावरून स्वार होऊन आलों. परंतु अद्यापि गावखेडियाबा जाबसाल न जाला. तर स्वामी कृपाळु आहेत. किरकोळी देशच्या गांवाबा कार्य राजश्री अंताजी विश्वनाथ सेवेसी विनंती करितील तेणेंप्रा करून दिल्हे पाहिजे. राजश्री (एक ओळ फाटली) आले आहेत त्याज बाहि कुमकी खर्चाचा जाबसाल समक्ष मनास आणून सेवकास सनद करून पाठविली पाहिजे.

यो[2]नंतर सेवेसीं विज्ञापना ऐसीजे. वोडसेकर राजियाचें मानस कोणाचें सांगित-ल्यावरी बहकले आहे कीं, सरकारांत जे वाटणीशिवाय जागा जफ्त जाली ते अर्ज करून सोडवावी. परंतु जागा घेतली ते कैसी सुटणार? सेवेसी सूचनार्थ विनंती हेच कीं एक खेडे साधुणूकपैकीं न सोडावें. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.

*¶Naro Shankar to the Peshwa, complaining that Antaji Manakeshwar has ravaged his provinces in the North and requesting the Peshwa to issue orders to him to stop all these activities. The writer further requests the addressee to write to Savantsing of Odsa by way of consoling him.*

---

*No. 89*] [*24-10-1761*

छ २९ रबिलाखर

**श्री**

**पुरवणी श्रीमंत राजश्री पंतप्रधान**

**स्वामीचे सेवेसीं**

विज्ञति यैसीजे. छ २४ रबिलावलीं राजे नागरमल व याकुबअलीखान व अबदुल आहदखां सर्व मंडळी येक जागा होऊन नजीबखानापासीं गेले आहेत.

---

१ (नगरसेटीचें नांवें एक पत्र?) २ अक्षर वेगळें.

दो गोष्टी * * विचार मसलत होती कीं नागरमल यासी ठाकूर सुरजमलापासीं पाठविलें पाहिजे. कां कीं ठाकूर सुरजमलास समजाऊन दिलीजवळ आणावें, नजीबखानाची व ठाकराची भेट होये, मग ठाकराचे पुत्रास नजीबखानाबराबर घेऊन सर्व मंडळीनें पातशाहापासी जावें. दुसरे हाहि विचार आहे कीं सर्वांनी नजीबखानसुधां येकत्र होऊन वचनप्रमाण राजेरजवाडे वगैरेसी करून मग पातशाहापासीं जावें या विचारांत आहेत. अद्याप ठैरल नाहीं. ठैरलियावर सेवेसी विनंती करूं. छ २९ रबिलौवलीं नजीबखानास रुखसंत[1] जाली. हसी हिसाराकडे बंदोबस्तास जाणार. छ मजकुरीं राजे नागरमल यास ठाकूर सुरजमलाकडे रुखसत केलें की ठाकरास घेऊन दिलीस यावें. तोवर नजीबखानहि पंधरा दिवसानीं फिरून दिलीस येईल. मग ठाकराची व याची भेट होऊन मग पातशाहाकडे जावयाचा विचार ठैरल तो विनंती सेवेसी लिहूं. कृपा केली पाहिजे हे विज्ञप्ति.

¶*News letter to the Peshwa from Delhi written by his Vakil Bapuji Mahadev Hingane.*

---

No. 90] [Date of receipt 23-11-1761

छ २९ रबिलाखर

**श्री**

**पुरवणी श्रीमंत राजश्री पंतप्रधान**
**स्वामीचे सेवेसी**

विज्ञप्ति यैसीजे. राजे दलेरसिंग व रूपराम व मोहनसिंग ठाकूर सुरजमलापासीं छ ८ रबिलावलीं दनकोरास गेले होते. पांच रोज ठाकरापासी राहून जाबसाल पका केला. छ १६ रबिलावलीं दिलीस आले. छ १७ रोजीं नजीबखानापासीं गेले. जाबसाल नजीबखानाचा व ठाकराचा सल्लक ठैरला. परगणे झझर वगैरे ठाकूर सुरजमलापासीं बाहल राहिले. कांहीं यैवज देणे सालबसाल ठैरला. त्याचे जामीन राजे नागरमल ठैरले. ये गोष्टीची शपथ अणभाष व्हावयासी फिरोन राजे चेतराम व दलेरसिंग नजीबखानाचे तर्फेनें कुरान घेऊन ठाकरापासीं गेले.

---

१ निरोप.

आतां ठाकराचें व नजीबखानाचे भेटीचा मजकूर आहे. ये गोष्टीचे जाबसालास च्यार दिवस ठाकरास लावणें यास्तव श्रीगोवर्धनचे मेळयास गेले. या उभयेतां- सहि बराबर नेले. पुढें होईल ते विनंती सेवेसी लिहूं. कृपा केली पाहिजे हे विज्ञप्ति.

¶*This and the previous letter report some intrigue between Surajmal and Najib.*

---

[1761-62 ?

No. 91]

**श्री ३**

**पुरवणी साहेबाचे शेवेशी**

रांगड्याचे लागले आहेत. पाहावे. राजश्री सुभेदाराकडील दबाव आहे. याच्या चितात बिघाड उत्तम प्रकारे करावा यैसा विचार आहे. प्रस्तुत त्रिवडी शामराम याचे कारण बहुत. याचे विचारे मसलतीनें राजे चालत आहे. राजकारणात बहुत पेश[1]. सर्व कारभार त्याचे हस्ते होत आहे. सर्व मुतसद्दी मुसाहिबे[2] त्याचे विचारे कारभार करितात. त्यानी हा विचार करून राजे बाहीर काढिले. राज्यापासीं दहा बारा हजार फौज उणी थोर पावेतो सामील होईल. सेखावत तमाम येणार आहेत. भारी जमाव एका जागा करावयाचा विचारे आहे. नजीबखान यासी पैगाम बहुत आहे. आकुबवलीखान मथुरेस होते ते दिल्लीस गेले यैसे वर्तमान आहे. त्याजकडील वकील राज्याकडे आला आहे. कागदपत्र त्यासी राजकारण आहेच. शहाआलम यासी पैगाम बहुत लाविले आहे. भला माणूस त्याजकडे पाठवावयाचा विचार आहे. सर्व राजे रजवाडे एका जागा होऊन पका विचार करून भारी राजकारण करावे या डौलात आहेत. पुढें जो विचार होत जाईल ते सविस्तर लिहीत असो. राजश्री जनकोजी सिंदे याजकडील वर्तमान उज्जनीस गेले यैसे वर्तमान यैकितो. परंतु निश्चये वर्तमान कांहींच नाहीं. सैन्यातून राजश्री सुभेदाराची पत्रे अली. वर्तमान तथ्य कांहीं आले नाहीं. निश्चये वर्तमान ध्यानास आलिया सविस्तर लिहीत असो. राजे माधोसिंगजी यानीं मातबर हवेली राहावयास दिल्ही होती ते घेऊन पदमसिंग गोगावत पैना- सिंगाचे बंधू यास रहावयास दिल्ही. आम्हास राहावयास दुसरी जागा देविली

---

१ वजनदार. २ स्नेही.

आहे. प्रस्तुत सैन्यांत राज्याबरोबर गेलो आहे. येथील कारभार आल्पबुधी सर्व दबावाचा सर्व साहेबास श्रुत आहे. सर्व गोष्टींनें गौर सांभाल करावयाचा साहेब धणी समर्थ आहेत. विशेष काय लिहिणे? कृपा वरधमान केली पाहिजे हे विज्ञाप्ति.

¶*The writer reports the attitude of the Rajput Princes and their intrigues against the Marathas with Najib Khan and Shah Alam.*

---

*No. 92*] [*2-12-1761*

पौ छ ३० जावल

**श्री**

**श्रीमंत माहाराज राजश्री दादा**
**साहेब साहेबाचे शेवेसी**

विनंती. सेवक चिंतो कृष्ण चरणावर * * क ठेऊन सिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना. सेवकाचे वर्तमान ताा छ ४ माहे जावलपर्यंत येथास्थित आसे विशेष. अंतरवेद प्रांताहून उजेनीस आलो. पुढे देशास यात्रे तो हाडोती प्रांते माधोसिंगाच्या फौजेन तमाम ठाणी उठविली. धूम केली. त्यावरून राजश्री सुभेदारानी आम्हासहि समागमे घेतले. कूच दरकूच पाा मांगरोल प्रांत हाडोती प्राा कोटे येथे * * * * त्यासी गाठ घातली. त्यास कछव्या * * * * * * राजसिंग घोडचढा व नंदलाल दिवा * * * * कविराम व सुरतराम वगैरे सरदार (ऐ) से दाहा बारा हजारा फौज व तोफा व रहेकले व बाणाचे उंट वगैरे जुंजाचा सरंजामेनसी होते. त्यास छ १ जााली मागील चार घटका दिवस राहाता गाठ पडली. त्यास च्यार घटका रात्रपावेतो गोलागोलीचे युध्ध जाले. उपरांतिक रात्र जाली म्हणोन च्यार प्रहर रात्र कंबरा बांधून घोड्यावर उभेच राहिलो. छ २ जावली इंदुवासरी जुंज प्रात:कालापासून अस्तमानपर्यंत जाले. साहेबाचे प्रतापे फौज तमाम कछव्याची मोडून कुल लुटून घेतली. घोडी उंटे वगैरे सरंजा(म) कुल * * लुटला. त्याजकडील मोठे मोठे पटाईत * * * * कितेक घायाल होऊन पडले. से दोनसे मात्र पलून गेले. ईश्वरे येश स्वामीस दिल्हे. येणे-करून हिंदुस्थानात नक्ष जाला. आम्ही डावे बाजूस होतो. येथानशक्त शेवा-चाकरी केली. सरकारपागेस से सवासे घोडे आले. त्यासिवाये उंटे आली आसेत. आम्हाकडील लोक कितेक पडले व जखमी जाले त्यार्चा याद मागाहून शेवेसी विनंतीपत्री * * * * रून पाठऊ. राजश्री मल्हारजीबावा-

च्या (डा)व्या हातच्या मनगटास गोलीची जखम लागली. गोली चाटून गेली. स्वामीचे कृपेकरून खैर जाली. चिंता न करावी. सेवकावर कृपा करून आज्ञापत्र पाठऊन परामृष करणार स्वामी समर्थ आहेत. शेवेसी श्रुत होये हे विज्ञाप्ति.

¶*Chinto Krishna reports to Raghoba a severe action between Holkar and Madhosing. Madhosing's army was routed.*

---

*No. 93*] [*2-12-1761*

पौ छ ३० जावल

**श्री.**

**राजश्री सखारामपंतबापू गोसावी यांसी**

ॐ सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्ये श्नो खानाजी जाधवराव दंडवत विनंती. येथील कुशल ताा छ ४ जमादिलावल मुकाम मांगरूळ प्रांत हंडोती जाणौन स्वकीये कुशल लेखन करीत गेले पाहिजे विशेष. इकडील वर्तमान तर राजश्री माधोसिंग याची फौज दाहा बारा हजार येऊन कोट्यांचे प्रागण्यात धामधूम करीत होता. त्यास राजश्री सुभेदार व आम्ही मिलोन कचव्याचे फौजवर गेलो. त्यास छ ३ जमादिलावली इंदुवारी येक प्रहरा दिवसा उपरांतिक तो अस्तमान होईपरयेंत जुंज जाले. कचव्याचे फौजचा मोड जाला. त्याजकडील थोरथोर पटाईत कामास आले व बुनगे व तोफखाना लुटला. दाहाबारा हजारानतून च्यारतीनसे स्वार पलोन गेले. नाहीं तर फौज आगदीं संतेनासास मिलोन दिल्ही. ईश्वरे आपल्यास येस दिल्हे. हिंदुस्थानात मोठा नक्ष जाला. कछवे मोठा जोराने भारी जमाव करून आले होते की नर्मदेपावेतो अंमल करावा. श्रीभगवंतकृपेकरून त्याचेच पारपत्य जाले. पलोन गेले. संतोषाचे वर्तमान आपल्यास कलावें. राजश्री मल्हारजीबावा सुभेदार यास गोलीची जखम डाव्या हतास लागली आसे. चाटून गेली. हालकी आहे. चिंता न करावी. ईस्वरे खैर केली. विशेष काय लिहिणे ? लोभ आसो दीजे हे विनंति.

¶*Khanaji Jadhao to Sakharampant, informing him of an engagement between Madhosing and himself in which the former sustained a severe defeat. Malharrao Holkar who assisted Jadhao received a slight wound on his left hand.*

No. 94] [5-12-1761

पौ छ ३ जाखर

श्री.

राजश्री सखारामपंतबापू गोसावी यांसी

९ सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्ये स्नो खानाजी जाधवराव दंडवत विनंती उपर- येथील कुशल ताा छ ७ जौावल मुकाम बडोदे प्राा सोपार जाणोन स्वकीये लेखन करीत गेले पाहिजे विशेष. इकडील वर्तमान तर राजश्री माधोसिंग याची फौज दाहाबारा हजार येऊन प्राो नेणव्यास मोरचे लाविले. त्यास राजश्री सुभेदार व आम्ही पैसे पांचसा हजार फौजेनी कूच दरकूच मुकुंदबारीपरंत आलो. आखेराम पंचोळी याच्या भेटी जाल्या. उपरांतिक आखेराम कोटेवाले याही तीन हजार फौज घेऊन आम्हास सामील जाले हे वर्तमान कछेव्याचे फौजेस नेणव्यांस गेले. त्याही कूच आमचे दहशतीने कूच करून हडोतीचे प्रगण्यात येऊन धामधूम करून तमाम ठाणीं उठविली. आम्ही कूच दरकूच छ १ जमादिलावली गाठून आठ प्रहरपरयेंत कमरा बांधोन उभे राहिलो. त्यास छ २ जमादिलावली जुंझ च्यार प्रहर होऊन कछव्यांचे फौजेचा मोड जाला. त्याजकडील थोर थोर पटाईत कामास आले व काही जखमी. दोनकसें पलोन गेले. बाकी आवघे कतल केले. दोन हती तोफखाना व जेजाले वगैरे सरमजाम लुटून घेतला. ईश्वरे थोर येस दिल्हे. हिंदुस्थानात नकशा राहिला. राजश्री सुभेदार याचे डावें हाताचे मणगटावर गोळी चाटून गेली. ईश्वरे थोर खैर केली. कांहीं चिंता नाही. सरकारपागेत घोडीं व उंट मिळोन सेदीडसे आले आहेत. आम्ही डावे बाजूस होतो. सरकार चाकरी केली ते आपणास श्रीमंत राजश्री सुभेदार यानी लिहिले आहे त्यावरून कळो येईल. सिंद्याच्या निशाणास शब्द लागो दिल्हा नाही. सदैव पत्र पाठऊन संतोषवीत जावे. विशेष काये लिहिणे ? लोभ आसो दीजे हे विनंती.

¶*Khanaji Jadhao describes how he and Malharrao inflicted a crushing blow on the army of the Kachhawas led by Madhosing. Malharrao Subedar received a slight wound on his wrist.*

---

No. 95] [29-1-1757

पैाा छ १४ रजब

श्री

श्रीमंत राजश्री भाऊसाहेब स्वामीचे शेवेसी

विनंती. सेवक अंताजी माणकेस्वर कृतानेक साा नमस्कार विज्ञापना. सेवकाचे वर्तमान ताा माघ शुध ९ नवमी मुकाम नजीक बारापुले यथास्थित असे विषेष.

अटकेपलीकडून आबदाली दिलीस दाखल जाला. पातशाही चाकर तमाम त्याणी भेदले. वजीर येकलाच व आम्ही राहिलो. त्याजवरी वजिरासहि अवसान न पुरे तेव्हा तोहि जाऊन भेटला. त्यास कैद केले. त्याजवरी आम्हासी आबदालीच्या वजिरासी दोन लढाई जालियावरी आम्ही बुनगे पुढे घालून निघोन फरिदाबादेस दाहा कोस येऊन बुनगे मथुरेस रवाना करून माघारे सडे फौजनसी जाऊन बारापुल्यावरी उभे राहून त्याची फौज आली त्यासी लढाई घेऊन त्यास मोडून घातलियाचे तपसीलवार वर्तमान सार्येत आजी दाहा दिवसात दोन जोड्या कासीद तपसीलवार वर्तमान लिहून सेवेसी रवाना केले त्याजवरून सर्व वर्तमान स्वामीचे ध्यानास आलेच असेल. प्रस्तुतहि तपसीलवार पाच बंद वर्तमान सविस्तर श्रीमंत राजश्री नानासाहेबाचे पत्री लिहिले आहे त्याजवरून सर्व अर्थ स्वामीच्या ध्यानात येईल. सारांश वकिलाचें आचरणाचा अर्थ सेवकानी कोठवर ल्याहावें ? त्याचे अनुष्ठान सबल, यासी कोणाचाहि विलाज नाहीं. या दिवसात श्रीमंत राजश्री दादासाहिब व रा मल्हारजी होलकर यानी सनिध असावे म्हणजे शत्रूचे निर्मूल होऊन शत्रू येथील पैसा नेणार तो सर्व सरकारात लागेल येविसीं विनंतीपत्रे श्रीमंत राजश्री दादासाहेबास पाठविलीच आहेत. सारांश सेवकाचे श्रमसाहास कोणेप्रकारे आहेत हे स्वामीच्या ध्यानात यावे. सर्वानी तमाशाच पाहिला. सेवटपरियेंत पुढेहि तमाशाच पाहणार. परंतु स्वामीच्या पुण्यप्रतापेकरून सेवक सरकारच्या मुलकास उपसर्ग लागो देणार नाही. स्वामीकार्यावरी जीव हजीर आहे. फौजेस नेमणूक सालगुदस्ता सालमारी मिलोन येक रुपया नाही. तीन साल स्वारी मेहनत या प्रकारची. साहुकाराची कर्जे कोठवरी घेऊन खावी ? सर्व गोष्टीचा परिहार करणार स्वामी समर्थ आहेत. तूर्त आमचे जागिरीचा येवज राजश्री गोविंद बलाल यासी ताकीद करून देवणार स्वामी समर्थ आहेत म्हणजे कर्जदारास थोडेबहुत पाऊन पत राहील. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*Antaji Manakeshwar from Barapula reports the news of the descent of the Abdali upon Delhi and the writer's movements consequent to it.*

---

*No. 96*] [*30-1-1757*

पौ छ १४ रजब

**श्री**

**श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामीचे शेवेसी**

विनंती. सेवक अंताजी माणकेश्वर कृतानेक सां नमस्कार विज्ञापना. शेवकाचें वर्तमान ता माघ शुध १० मुकाम खिदराबाद नजीक इंद्रप्रस्थ

च्यार कोस स्वामीचे कृपेकरून वर्तमान येथास्थित असे विशेष. सविस्तर वर्तमान पेसजी लिहिले ते विदित जाले असेल * * (पुढील दोन तीन ओळी मजकूर फाटला आहे * * ) द्वाही फिरविली * * (खान) खानास वजारतीचा खिलत दिल्हा. * * * खा न जि * * या खानाचा पुत्र त्यास वकील मुतलख केले. याप्रमाणे करून किल्यात आणून पोहचाविलें. व गाजदीखान कदीम वजीर यांस कैदेंत ठेविले आहेत. सुरजमल जाट व नागरमल व नजीबखान रोहिले वगैरे सर्वांची अर्जी याप्रमाणेच होती कीं गाजुदीखान राजश्री मल्हारजी होलकर यांचा पुत्र व श्रीमंत राजश्री दादासाहेब याचा पगडीबंद भाऊ, याजला कायेम न करावें. सारी सलतनत[1] मराठियांच्या घरांत घातली आहे. याचें घर खाणून झाडा घेणे. यास सोडाल तरी मागती मराठियास जाऊन भेटून आमचा सत्यानाश करील. (पुढील सुमारें तीन ओळी मजकूर फाटला आहे.) सारांश चकत्याचा हक त्यांस नादरशहाप्रमाणे दिल्हा. वजीर मात्र मऱ्हाठियांचे आदावतीने दुसरा केला. पुढें पातशाही करावयास अबदाली राहात नाही यैसे दिसते. महिनाभर राहून पैसाटका जमा करून जाईल यैसा रंग दिसतो; परंतु जालें वर्तमान सेवेसीं लिहिले आहे. आम्ही श्रीमंत राजश्री दादासाहेबांस दो च्यार वेला लिहिलें आहे. यासमई स्वारी येऊन पोहचती तरी सर्व होते. अबदालीस आणखी महिना पंधरा दिवस येथें लागतील इतकियांत श्रीमंताची स्वारी आलीवरी जें चाहतील तें करितील. असो. पुढें होईल वर्तमान तें लिहून पाठऊन. प्रस्तुत आम्ही येथें नजीक राहावें उतम नाही. नाहक रात्रदिवस मुर्दई[2] दंगा करवितील याकरितां मथुरेस राहून जैसे होईल तैसे पाहून दिलीपासून पंचवीस तीस कोस राहून. विदित जालें पाहिजे. यापूर्वीचें वर्तमान तरी माघ शुध प्रतिपदेस नजीबखान रोहिले अबदालीस जाऊन मिळाले व दिलीतील सैदसलाबतखान व खानखाना व सेरजंग व बापूजी माहादेव वकील वगैरे जितके होते त्याणी मिलोन आजी दोन महिनें अबदालीस पत्रें पाठऊन आणविले. ते जाऊन भेटले. तेव्हां नवाब व पातशाहाची हिंमत उठली कीं आधी शत्रू भारी, त्यांत घरची फौज जाऊन भेटली. तेव्हां वजिरानी आपली स्वारी तयार करविली कीं, अबदाआलीस जाऊन भेटावें. आतां

१ दौलत. २ दंगेखोर.

त्यांस किल्यांत आणावें. झाडा शहरचा व किल्याचा द्यावा मग तो जे करील तो करो. तों आम्हास अगोधरच दोन दिवस सडे फौजेनिसी दिलीपासून पुढें वजिरानी रवाना केलें होतें. तेहि तिकडून आले. दिलीपासून साहा कोसावरी अबदालीच्या वजिराची व आमची लढाई जाली ते फारच जाली. आमची घोडीं माणसें फार पडलीं. आम्ही माघारे सरोन दोन कोसी राहिलो. त्याचा मुकाम दिलीपासून साहा कोसांवरी जाला. इतकियांत प्रात:काली गाजदीखान वजीर अबदालीस जाऊन भेटला. तमाम दिलीचे फितुरी अगोधरच जाऊन भेटिले होते. खानसामा व नागरमल व बालगोविंद सावकार वगैरे निमे लोक पलोन जाटाकडे गेले. आम्ही प्रात:कालीं घोड्यावर बसतांच पुढें अबदालीची फौज, मागें नजीबखान रोहिल्याची फौज. आम्हावरी चढाई केली. तेंसमई आम्हास निघोन किल्याखालें रेतींत आमच्या लस्करांत येताना मोठे अरिष्ट आम्हावरी पडत गेले. तेव्हाहि लढाई भारी पडली परंतु बुनगियांत येऊन हती कबिले बुनगे सर्व तयार करून पुढें घालून, पाठीवरी फौज येसा कजिया होत फरिदाबादपरियेंत आलो. मग त्यांचा लाग उठला. तेव्हांहि लढाई आम्हावरी भारीच पडली परंतु स्वामीच्या प्रतापेकरून लस्करचा सुतलीचा तोडा जाऊं न दिल्हा. फरिदाबादेस पावलो. खोज्याचे सराईहून तेहि फिरले. अबदाली ते दिवसीं शहराभोंवत राहिला. कांही फौज पटपटगंजावरी येमुनापार राहिली. कांहीं आमच्या तलावरी राहिली. वजीर गाजदीखान याजवळ चौकी बसविली आणि जागा जागा त्यांचे समागमी फोडून फोडून प्रथक प्रथक (पुढील दोन ओळी मजकूर फाटला आहे.) नजीबखान रोहिला येऊन किल्यातील पातशाही लोक झाडून काढून दिल्हे. पातशाहा पुत्रासमेत कबिलेदेखील पूर्वस्थल त्यांचे होते त्यांत नेऊन कारागृही घातले. तमाम पातशाही लोक किल्यांतून काढून दिल्हे. अबदालीनें आपला बंदोबस्त केला. बक्षी किल्यांत ठेऊन किल्याची सारी तयारी करविली. जवाहीरखाना, सिलेखाना, जामदारखाना वगैरे झाडून जप्ती केली. शहरांत द्वाही फिरविली. कुतबा पढले. झाडून बंदोबस्त केला आहे. सारांश गोष्टी अबदालीची फौज चालीस पनास हजार सारी आहे. दिलीस काही भारी नवतें. परंतु येथून खानखाना, बापू वकील, नजीबखान सैदसलाबतखान नागरमल पाचसात मिलोन त्याजकडे वकील पाठऊन भेद देऊन त्यास दरकूच साहा कोसावरी आणून वीस हजार स्वार येकदांच भेटीस गेला. तेव्हां खानसामा व नागरमल व बाहादरखान बलोच हे मोर्च्यास म्हणून गेले ते तिकडेच सुरजमलाकडे गेले. दामोदर माहादेव तिघे भाऊ व जलालुदीखान (पुढील एक किंवा दोन ओळ मजकूर फाटला आहे.)

म्हणून त्यास आणावयास निघाले. कबिले खजाना सर्व घेऊन गेले. येक बापू व त्रिंबकपंत दोघे सडे मात्र जब्रांत राहिले. तेहि जाऊन भेटिले. याप्रमाणे दिलीची अवस्था जाली. याउपरी येक आम्हीच फसलो. वजीर घाबिरा जाला. सारी फौज पाच हजार वजिराजवल राहिली. अवसान न पुरे मग जाऊन भेटिले. ते मात्रागमनी. त्याणी कैद केले. आम्ही फरिदाबादेस बुनगे आणून घालविलें. दुसरे दिवसीं बुनगियात दोन हजार फौज ठेऊन मथुरेस रवाना केलें. आम्ही फरिदाबादेहून बंदरपूरचे सराईस दिलीपासोन साहा कोसावरी सडे फौजेनिसी जाऊन मुकाम केला. दुसेर दिवसीं सरवरखान अबदालीच्या वजिराचा सरदार च्यार हजार फौजेनिसी बारापुलाअलीकडे तीन कोस आम्हावरी चालोन आला. आम्ही तयार जालो. येक प्रहर लढाई जाली. त्याजवल तोफखाना नवता. त्याचा मोड जाला. स्वामीच्या शेवकास येश आले. च्यारसें घोडे पाडाव आले. त्याणी आपलीच घोडी च्यारसें मारली. च्यार-पाचसे अबदालीचे हैमजात[1] रणात मारिले गेले. निशाणे नगारे घेतले. मोडून बारापुलापरियेंत घातले. त्याआलीकडे आम्हावरी आजितागायेत फौज त्यांची आली नाही. आजी बापूजी माहादेव याणी त्यास बीर[2] देऊन नजीबखान व अबदालीचे जाहानखान वीस हजार फौज आम्हावरी रवाना केली आहे. दोन कोस आल्यावरी आम्ही दाहा कोस टाला देऊन मागती सालेमाराकडे जाऊन येका रात्रीतून तीन जागा घोड्यावरी बसून फिरतो. स्वामी म्हणतील कीं पातशाही त्याणी घेतली असतां तुम्ही कां तेथें खराब होता व घोडी माणसें मारीत फिरता? तरी आम्ही येथून निघतांच अंतरवेद झाडून गेली. येक माणूस अबदालीचे दहशतीने राहात नाही. आम्ही थोडेच आहोत परंतु दोन लढाया मातबर जुजोन पांचसातसे माणूस त्याचे मारिलें. त्याजमुलें दहशत भारीच वागवितात. बापूजी माहादेव याणी स्वामीच्या नावाची अर्जी अबदालीस दिल्ही कीं लाख फौजेनिसी चाकरीस हजीर आहो व पातशाही मुलूक अंतरवेदीचा सोडून देतो. तमाम मवास मारून पेशकसी आणून खजानादाखल करितो येसी अर्जी दिल्ही. त्यावरून बापूस खिलत दिल्हा. मेहरबान जाले. शहर तमाम नागऊन दोन क्रोड रुपये तहसील करून वोला धरून पैका खजानियात देतो येसा तिघानी करार करून खिलत घेतले. येक राजा जुगलकिसोर वकील बंगाला, किसनचंद वकील पठाणाचा तिसरा बापू वकील परंतु शहरात येक माणूस मातबर कोणी

---

१ मोठेमोठे. २ भर.

राहिला नाही. शहर मातबर म्हणून घरोघर पटी करून चालीस पंनास लाख रुपये जमा जाले तरी न कले. वरकड काहीं नाही. वजिरास दोन क्रोड रुपये मागतात. त्याणी पंचवीस लाख कबूल केले आहेत. नाही तरी जीव हजीर आहे येसे साफ म्हणतात. खानखानास येक क्रोड रुपये मागतात तो कवडी देत नाही. अबदालीनी बापूजी माहादेव यांस पुसिलें कीं तुम्ही आपल्या खावंदाची अर्जी दिल्ही असतां राजा अंताजी माणकेस्वर आमचे फौजेसी लढाई कजाखी करीत कां फिरतो ? तेव्हा बापूनी सालजाब केला जे हा बाळाजीरायाचा चाकर नाही, वजिराचा चाकर आहे, त्याजवरी फौज पाठऊन तंबी करणे. तेव्हां नजीबखानास अबदालीनें बोलाऊन सांगितले कीं, वजीर कैदेत, पातशाहा कैदेत. किला माझा. तुम्ही सारे भेटला, कोणी पलाले असतां राजा अंताजी पंडित हें कां काम करितो ? नजीबखानाने जाब दिल्हा कीं हा त्यांच्या घरचा मातबर सरदार आहे, वजिराचा चाकर नाही. तेव्हां नजीबखानास आज्ञा जाली कीं अंताजीपंतास पत्रें तुम्ही पाठऊन त्याचा इरादा व मतलब काये आहे तें मनास आणणे. त्याजवरून नजीबखान रोहिले याचें पत्र बजिनस आले कीं तुमचा मतलब काये आहे ? भेटी वेणे. त्याचे उतर आम्ही पाठविले जे वजीर भेटावयास गेले ते फार सुख पावले. आम्ही तरी त्यांचे हमजात पाचसातसे मारिले आहेत व फौजबंद आहो. हिंदूचा परमद्वेषी; आम्ही भेटत नाहीं. परंतु मुदा हाच कीं श्रीमंत स्वामीचा अमल जेथवरी आहे त्या मुलुकास काडीइतका उपसर्ग न द्यावा, येक राऊत श्रीमंताच्या मुलुकात न पाठवावा हाच कौलकरार इमानप्रमाण करावें. आम्ही सरोन आपल्या मुलुकाच्या मेंड्यांवरीं[1] जाऊन. जरीकरितां येका खेड्यास उपद्रव लागला तरी आम्ही व समसेरबाहादर नारो शंकर व गोविंद बलाल याचे पुत्र वगैरे व सुरजमल जाट आम्ही येकत्र होऊन जे खिजमतगारी घडेल तें करून यैसा जाब वकील नजीबखानाकडे पाठविला. अबदालीने सांगितलें कीं मीं अटक उतरलियापासून दिलीपरियेंत येकाने तरवार वोढिली नाहीं. येथें अंताजीने मात्र येवढें काम केलें. तस्मात मराठे भारी. अतिशय मराठियांचा धाक वागवितो. परंतु बापूजी माहादेव यास आमचा उत्कर्ष न साहावे. तो नानाप्रकारे आम्हावरी प्रयोग करितो. सुरजमल आपल्या ठिकाणीच आहेत. नित्य येतो येसीच पत्रें पाठवितात. त्रिंबक मुकुंद सुभेदार यांस जाठाकडे पाठविलें. त्याणे आम्हासच बोलाविले. आपण येत नाही. पातशाही गेली आतां तेथे आपलें काये काम आहे ?

---

१ सीमेवर.

आपले जागा राखोन राहावे येसा जाब पाठविला. येका गावास मथुरेजवल मोर्चे लाऊन बसला आहे. समसेर बाहादर तरी नारो शंकरानी आजी दोन महिने फौजेसुधां आमच्या मुलुकात गोहद पछोरच्या गांवगनास मोर्चे लाऊन लुटून खंडणिया घेतात. दाहा पत्रें वजिराचीं व आमचीं गेली परंतु येत नाहीत. हे जालियावरी तीन पत्रें आजी दाहा रोजांत पाठविली कीं सडे यावे येथे शाह देऊन. परंतु ते समर्थ, नारो शंकर त्यांचे मंत्री. गोविंदपंताच्या पुत्रास व त्रिंबकराऊ धोंडोपंत यांस पत्रें पाठविली त्याणी लिहिलें कीं पैका देणे. तेव्हा आम्ही लिहिले कीं नालबंदी व रोजमरा आम्हीच देतो, येणे. परंतु येत नाहीत, अथवा अंतरवेदींत जमा होऊन मेंढ्यावरी येत नाहीत. तीन लढाया मिलोन दोनसे घोडे पडिले. दोनसे माणूस कामास आले. जखमी घोडे माणूस फार आहे. असो. किल्यांत शहरांत बंदोबस्त झाडून जाला. जे पलाले ते गेले. राहिले ते अबदालीचे कैदेत आहेत. जेवढें फितुरी तेवढे मात्र मोकले आहेत. रोहिले वगैरे याणी मोठा दगा केला. जरी सरकारची फौज चालीस हजार असती तरी यांस बुडऊन हिंदुस्थानची पातशाही स्वामीची होती. जरी हा ठरला तरी भारीच आहे. साल गुदस्ता मारवाडचे मोहिमेस नवे फौजेची दरोबस्त नेमणूक नाही व हालीं सालची दरोबस्त येका रुपयाची नेमणूक नाही. यैवज अंतरवेदीचा आमचे जागिरीचा गोविंद बलाल यांकडे इटावे सकुराबाद फफुंदेचा यैवज इजारियाप्रो होता तो यैवज येणे. त्यास त्यांची आमची भेट भाद्रपदमासीं जाली. पंतानी आपल्या पुत्रावरी चिठी करून दिल्ही कीं, दसरा करून यैवज देणे. देखील कबजे घेतली आणि गोविंदपंत देशास गेले. मागून पुत्रास चिठी पाठविली की, येक रुपया सरंजामाचा न देणे. श्रीमंतानी पैका आम्हापासून घेतला आणि अंताजीपंतास न देणे म्हणून सांगितला. त्याजवरून कवडी त्याणी दिल्ही नाही. फुकाचे भेटिले नाहीत. कागद पाठविले त्याचें उतर पाठविले कीं तुमचे आमचे नातें काये आहे? येक ग्वालेरीचा मख्ता येक लाख पस्तीस हजार. तो शागीर्दपेशास पाहिजेत. तेव्हा दरोबस्त सालाची फौज बारा हजार त्याच्या कबजास ठिकाणच नाही. स्वामी म्हणतील जाजती फौज का ठेविली तरी बजिनस जनकोजी सिंदे याच्या पत्रा * * * गेलो दिाची मनस * * * * * * येथे स्वरूप * * * * * * म्हणून ठेविली होतीच व जागा * * * करून माहाल नेमणूक करून सनदा घेतल्या. नेहमीच स्वामीच्या घरात जागा केली होती. परंतु त्यांच्याच घरास आग लागली. जागाहि अबदालीने मारून आपला दस्त केला यासी इलाज काय?

अंतरवेदीचा बंदोबस्त राहावा म्हणून पातशाही चाकरी करार करून येथेहि थोडी बहुत जागा करून घेतली होती. लाला बाल गोविंद या * * व सेट नगरसेट याणी थोरपणा करून आजीतागायेत कर्ज देऊन चालविलें. समजाविसी नालबंदीस ठिकाणा नाहीं. याउपरी रा। गोविंद बलाल यास उत्तम प्रकारें ताकीद करून अंतरवेदीचा आमच्या जागिरीचा यैवज तूर्त इजारियाप्रमाणे देवावा म्हणजे परभारे तेवढा तऱ्ही यैवज नगरसेट बाल गोविद यांस पावता करून पुढें स्वामीची भेटी जालियावरी फौजेचा हिसेब पाहून. मग फौजेची (पुढील चार पांच ओंली मजकुर फाटण्यांत गेला) मारवाडची मोहीम निक(डीने) केली. येंदा अंतरवेदीचा बहदा[1] उठला. कोणीच न राहात तेव्हां हेहि कबूल करून बहदा राखिला. पुढे अबदालीचा हंगामा जाला. आपल्या जिवापेक्षा जेथवरी होते तेथवरी चुकत नाही. या चाकरीचा मजुरा स्वामीच्या ध्यानात येऊन सेव-काचा मजुरा न जाला तरी आमचें दैव खोटें. सारांश सावकारानी पैका स्वामीच्या नावावरी पंधरा लाख रुपये चारिले. त्यास जागाहि केला होता. इश्वरे त्यास अपाये केला इलाज नाहीं. स्वामीच्या सरकारकामासाठीं हें डोईवरी घेतलें. परंतु स्वामीच्या वरकड सरदारानी रिकामेरानीं आमचा तमासाच पाहिला. परंतु येकानेहि उपराला केला नाहीं यावरून अपूर्व आहे. सारे चाकर मेहरवानीचे. आम्ही इतराजींचे चाकर ! परंतु आपल्या दैवें व्यावें. येथून आम्ही कागद पाच सात वेळा श्रीमंत राजश्री दादासाहेबांस व राजश्री मल्हारजी होलकर सुभेदार यांस लिहिलीच आहेत. सेवेसी विदित जाले पाहिजे. श्रीमंत मातुश्री सगुणाबाई श्रीप्रयागास माघस्नानास आली आहेत. त्यांचीं पत्रें आम्हास आलीं कीं माघस्नान करून मथुरेस यात्रा करून जेष्ट मासीं देशास जावयाचें आहे तरी तिकडील वर्तमान सुरक्षित असिले तरी व तुमचे विचारें यावें यैसें असिलें तरी उतर पाठवणें म्हणजे येऊं. त्यास पत्राचें उतर आम्ही पाठविले आहे कीं, तूर्त आबादालीची धामधूम फार आहे, हा प्रसंग उतम नाही. माघस्नान करून कालपीवरून देशास जावें, मथुरेस येणेस वाट उतम नाही यैसे लिहिलें आहे. स्वामीस विदित व्हावें म्हणऊन सेवेसी विनती लिहिली असे. सुरजमल जाठ नागर-मल खानखाना बापू वकील यानी सतंतर पनास लाख रुपये नेहमी निराली बरार्ती नजर करार आबदालीसी केली आहे की गाजदीखानास नेहमी आटकपार धरून

---

१ अमल.

न्यावे. हिदुस्थानात न ठेवावे. हिदुस्थानात राहिला तरी मराठे त्याचे साहित्य करितील आण ( पुढील दोन तीन ओळी फाटल्या ) पैसा घेतील याप्रो * * * मसलत पकी ठरली आहे हें विज्ञापना.

¶*In this lenghty document Antaji Manakeshwar traces the success of the Abdali to the treachery of Najib and other chiefs of the Delhi court who openly sided with him when he drew near the capital, and welcomed him. The Vazir Gaziuddin, a staunch adherent of the Marathas, surrendered to the invader and on the advice of the traitors was thrown into prison for his partiality towards the Marathas. Antaji later on bitterly complains against Bapuji Hingne, Govindpant Bundele, Naro Shankar and others for keeping themselves aloof when he requisitioned their help.*

---

*No. 97*] [*January 1757 ?*

श्री

सेवेसी विज्ञापना. स्वामीचें आज्ञापत्र आले कीं तुम्ही व राजश्री अंताजी माणकेस्वर येसे स्वार होऊन राजश्री नारो शंकर याजकडे वोडशे प्रांतास जाणे. त्यावरून सिधता करीत आहो. परंतु दीड महिना रोजमरा पाहिजे. निसबतीचे लोक देखील सोलासत्रासे राऊताचा भरणा आहे. रोजमऱ्याची बेगमी करून देणार स्वामी समर्थ आहेत सेवेसी श्रुत होये हे विज्ञाप्ति.

¶*Antaji Manakeshwar and some other Sardar informing Raghoba that they are moving towards Orcha according to instructions.*

---

*No. 98*] [*6-2-1757*

**श्रीशंकर**

**राजश्रियाविराजित राजमान्यविराजित राजश्री**
**विष्णुपंत दाजी स्वामीचे सेवेसी**

पोष्य लक्ष्मण आपाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती उपरी. येथील क्षेम तागाईत छ १६ माहे जमादिलाखर मुकाम मौजे पाडला परगणे गंगराड नजीक चेमेली, आपले कृपेंकरून येथास्थित असें विशेष. दिलीकडील वर्तमान तरी आबदालीनें तमाम शहरांतील हवेल्या खणोन मालमालियेत काढून नेली. तीन च्यार क्रोडी माल सांपडला. लेकाबरोबर देऊन आपले देशास रवाना केलान; आपण शहरांतून निघोन सालेमारबागाजवळ राहिला आहे. आमच्या फौजा

2296

पलवलेवर आहेत. आठां चौरोजांहीं त्याची याची गांड पडेल. बरीशी होणार आहे. खानखाना वजिरी करितो, गाजुदिखान त्याचे कैदेंत आहे. वरकड वर्तमान राजश्री भास्करपंती लिहिलें आहे त्याजवरून विदित होईल. आपण सत्वर यावें. मातुश्री ताईचीं पत्रें आलीं तीं पाठविलीं आहेत. बहुत काय लिहिणें कृपा लोभ कीजें हे विनंती.

हेच पत्रीं राजश्री अंताजीपंत व कृष्णाजीपंतास साष्टांग नमस्कार; लोभ करीत जावें हें विनंती.

वेदशास्त्रसंपन्न राजश्री शास्त्रीबावांस दोनी कर जोडून साष्टांग नमस्कार. कृपा केली पाहिजे हे विज्ञापना.

¶*Laxman Apaji writes how Delhi is being squeezed of its wealth by the Abdali. The Maratha army is shortly expected to attack him.*

---

*No. 99*] [*10-2-1757*

(पहिला बंद गहाळ.)

सेवेसी विज्ञापना. देशीहून कोणी सरदार येत नाही. येक अंताजीस मारून फरिदाबादेवरून काढिले म्हणजे मालवियात अमल तुमचा होईल. अंतरवेद वगैरे जागियाची कथा काये? याप्रा मसलत देऊन खासा अबदालीचा पुत्र व त्याचा वजीर पंनास हजार फौजेतील निवड करून आपले माणसें बा वाटाडें देऊन माघ शुध १४ चतुर्दसी बुधवारी फरिदाबादेवरी दिलीपासून * दाहा कोसावरी दोन प्रहरा दिवसा तीन * फौजा करून आले. ज्याप्रा लिहिले आहे * या प्रां बापूजी माहादेव याची आर्जीच बजिनस आबदालीस होती ती अर्जीच बजिनस मागून आबदालीने पाठविली (ती) आम्हाजवल आहे. दोप्रहरा तीन फौजाचा गराडा पडिला. निवावयास जागा नाही. आमची फौज पहिली जखमियाबा वगैरे बुनगियात फार होती. आम्हाबा साहा हजार फौज सात हजार मात्र होती. ते संकट जाणून दीढ प्रहर त्यांसी युध्य जाले. चौकडून या रीतीचा वर्षाव. जेथवरी लढाईचा आवर्त (?) लोकाचे सिपाईगिरीची शर्त होती तेथवर केली. ती मेहनत पत्री लिहिता काही सत्य वाटणार नाहीं. त्या समई सातसें आठसे घोडे गोलियाने तरवारानी ठारच त्याच ठिकाणी पडिले. सातसे आठसें लाहाण थोर येक हजार माणूस ठार ठिकाणीच पडिले. जोहर होऊन चुकले. त्यात स्वामीचे दरबारी तरवार मारिली. आसामी दोनसे वरकड लाहाण मोठे स्वार सिलेदार बारगीर मिलोन येक हजार माणूस ठार जाले.

येकाचा मुडदा काढावयास फुरसत नाहीं. च्यार घटिका दिवस राहे तोवरी घोरंदर याप्रा जाले. अबदालीकडील घोडे आमच्या करोलानी तीनसे च्यारसें तेथें मारिले. व सात आठसें पठाण त्याचाहि खासा रणास आला. मग निदान माहासंकट जाणून निघालो. दोन कोसपरियेत मागती पाठीवरी त्याच्या फौजा. हे झोंबी संध्याकालपरियेत आली. संध्याकाल जालियावर तेहि सरोन गेले. आम्ही सरोन माघारे राहिलो. त्यासमई दोनसे तीनसे घोडे आणिक त्याजकडे उ * व पाडून जखमी होऊन गेले. याप्रा जालियावरी बापूची आर्जीच आबदाली मोहरनसी पाठऊन दिल्ही. लस्करचा सत्यानास जाला तेव्हा चौथे दिवसी मथुरेस बुनागियात आलो. येथे येतांच सुरमजल जाट सडा पांचसे स्वारानसी आम्हास भेटीस आला. भेटी जाली. मागती त्यास बहुता प्रकारे भर दिल्हा कीं तुम्ही चला, तुम्ही आम्ही मागती जाऊन. त्यानें साफ सांगितले कीं इरानचा पातशाहा पनास हजार फौज घेऊन येऊन हिंदुस्थानची पातशाही घेतली. तेथे येकानी गोली वाजविली नाही. येक मेला नाही. माझी कथा काये? मजला साफ तिकडे येवत नाहीं. तुमचेंच कर्म की तुम्हीं येवढे कर्म केले. आमची प्राप्त नाही. व आबदालानेहि आश्चिर्य मानिले की वीस हजार फौज मराठे असिले तरी आपल्यात इशनास पाऊ देणार नाहीत. हिंदुस्थानची फौज तरी आबदालीचे फौजेपुढे शभरापुढे पांच हजार पलतात. ठरतां त्याच्या मुकाबिले स्वामीचे खानाजाद मात्र पहिलेहि दोन ती वेल व हाली या भारी सग्रामास ठरले त्यास आपूर्वक जाले ! हिंदुस्थानास जाले की पातशाही खावंद मराठे खरे ! आणीक याची फौज जमा जाली तरी हेच मात्र आबदालीस बुडवितील यैसा भरवसा पुरला. सुरजमलास आपल्या किल्यात गेला. आगरियापासून दिलीपर्येत वस्तीहि येक माणूस नाही. हे अवस्था जाली. ते आतां खासा दिलीत आहेत. पुत्र निवड आम्हावरी आली ती पुढे पलवल होडलपरियेत दिलीहून पंचवीस तीस कोसावरी आहेत. सुरजमलास पत्र पाठविले कीं मुलक सोडणे पैका देणे भेटीस येणे चाकरी करणे. त्याजवरून आम्हास सुरजमलान सांगितले कीं मजला भेटता पुरवत नाही, झुंजता पुरवत नाही. वकील पाठऊन जाबसालात पैकियाच्या बोलीचालीत पंधरा रोज गोवितो. लाख दोन लाख दरबारी खर्चहि करितो इतकियात तुमच्या फौजा आल्या तरी मीही चाकरीस हजर व पैका त्यास कवडी देणार नाहीं. तुम्हास पैका देईन. पंधरा दिवसा तुमची फौज न आली तरी मग मामलत करून पैका त्याजला देऊन याचीच चाकरी करून यैसे बोलून किल्यात गेला. आम्ही मात्र मथुरेस आहो. आम्हास त्याचे फौजेसहि आता पंचवीस कोस तफावत आहे. अंतरवेदीत त्याजकडील पाच राऊत उतरले नाहीत.

आम्ही इकडे लढाई घात * * त्याचे तोंड आम्हावरी व अगरियाच्या किल्यांत दस्त करावे हे आवई. तेहि इकडेच व सुरजमल मोठी आसामी पैकियाची तीहि इकडे याजकरितां अंतरवेद चुकोन सारा रोख इकडील आम्हाकडीलच जाला आहे व अंतरवेदीत जमीदारानी मात्र कोठे कोठे लबाडी केली असेल तरी न कले. अबदालीचे कुत्रे (नाही). बाळाजी गोविंद, धोंडो दत्तात्रय, त्रिंबकराऊ सिवदेव अंतरवेदीत दिलीपासून सतर कोसावरी आहेत व समसेर बहादर नारो शंकर यानी दोन मास आमच्या ग्वालेरीच्या मुलुकाची सत्यानास करून आतासें भदावरात चमलकांठी आहेत. सारांश गोष्टी आम्ही सर्वास दोन महिने लिहीत गेलो, व आजीं वीस बावीस रोज अलीकडे अबदाली दाखल जालियावरी सर्वास लिहीत गेलो परंतु सर्वानी आमची मशकरीच केली की अबदाली कोठील? उगेच आम्हास लटके लिहितात यैसें करून आम्हास सर्वानी घालविले. आमचे घरचे काम नवते. हिंदुस्थानची पातशाही सारी स्वामीची आहे. पातशाही राखावी. या पातशाहावरी येहसान करून आणिक जें याच्या घरात असेंल ते सर्व घेऊन यास राखावें म्हणून दाहा बारा हजार आपली मराठी असोन सर्वानी तमाशाच पाहिला. आमचे मात्र घर बुडविलें! तरी हा महिन्या पंधरा रोजा हिंदुस्थानचा झाडा घेऊन जाईल. आमचे हजारो मेले तो हक आमचा पातशाहीवरी जाला आहे. दिलीच्या पातशाहीसाठीं सगल्या हिंदुस्थानचे पाच माणुसे (मे)ले नाहीं. आमचे हजारो त्याच्या कामावर मेले. इतका सत्यानास जाला म्हणून चमल उतरून येत नाही. हिमत सोडीत नाही. श्रीमंत ये तोवरी त्याचे आसपास माराकुटी करीतच फिरतो. स्वामीनी दुसरा अर्थ चितात न आणावा. हे जालियावरी अबदाली व अलमगीर पातशाहा यांसी किलेयात सांगितले * तुझे पातशाहीत निमकहलाल मराठियानी केले. हजारो खासा हजारो घोडे माझे मारिले. थोडके असता हजारो घोडे हाजारो माणूस मेले. माझा मुकाबिला घेतला. तुमचे पातशाही राखतील तरी मराठेच राखतील. हिंदुस्थानी निमकहराम आहेत. उगेच न जुजता उठोन मजला भेटिले. मी आपले गरजेस सर्वासी गोड बोलालो परंतु याची संग्रह कामाची नाहीं. मग जितके पहिले फितुरांस मिलालें होते तिंतकियास आणून तोंडावरी थुंकला. पैजारा मारिल्या. सर्वावरी दांड केला. सर्वाच्या हवेलीस खणत्या लाविल्या. खानखाना वजीर केले होते त्यास येक क्रोड रुपये लाऊन कैद केले. हवेली खाणितात. नजीबखान रोहिले कैद केले. बापू वकील यांस तीस लाख रुपये (दंड) केला परंतु याने कबुलात लिहून देऊन पैका प्राथकाली भरितो यैसा करार करून रविवारी दिलीहून

पलाला, यैसी खबर आमची आताच आली व बापूचे कारकून लोक त्या पलातील आताच आले. गाजदीखानाच्या हवेली खणून येक घोडीचे जवाहीर मोहरा मिलोन निघाले. दोन घोडीची भरती अवदालीची जाली. वरकड खणित्या लाऊन सर्व माणसाचे माणूस कैदेत आहे. मुख्ये या कजियात आमचें वाईट होणियात काही राहिलें नाहीं. पुढे ही वाचलो तरी हा कजिया वारिलियावरी सर्व येथास्थित जालियाउपरी खावंदास जे विनंती करणें बापू वकीलाचीं व आपले सरदारी(ची) ती करून. खावंदाच्या चितांस न आली तरीं भगवे करून श्रीस जाऊन बसून !! दुसरा विचार काये आहे? सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*Antaji Manakeshwar describes to the Peshwa the severe action he fought against the Abdali's forces at Faridabad. He says it is his bold stand against the invader that has saved the Maratha provinces in the North and enhanced Maratha prestige.*

---

*No. 100*] [*February 1757*

[पहिले दोन बंद नाहींत.]

३

सेवेसी विज्ञापना. गोविंद बलालाच्या पुत्रासमागमे धोंडोपंत त्र्यंबकराऊ व ते मिलोन पाच हजार आहेत. त्यास बहुत लिहिले परंतु न आले. सेवटी त्यानी नालबदी रोजमरा मागितला तो मी आपल्या जिवावरी कबूल केला परतु न आले. सर्वांनी तमाशाच सेवटपरियेंत पाहिला. विलाज नाही. समसेर बहादूर नारो शंकर व अंतरवेदीचे आले आसते तरी याचे हाल करितो. फौज लाख म्हणत होते, निदान पनास हजार हरकारे यानी खरी सांगितली. परंतु करार फौज तीस पस्तीस हजार. जाजती नाही. जरीकरिता स्वामी वीस हजार फौजनसी पावतील तरी आम्ही हारोल होऊन यासी लुटितो. दोन क्रोडीची स्वारी होईल. स्वामीबा समसेरबावा नारोपत अंतरवेदकर सर्व झक मारून येतील, गुता नाहीं. याहून स्वारी कोणती आहे? दीढ क्रोड रुो यानी कबूल केले ते शहर पातशाहा खानखाना वगैरे सर्व पटी करून त्यास देणार तेच स्वामीचे पदरीं पडतील. पातशाहीवरी येईसा[१]न होईल. गाजदीखान तुमचा पगडीबदल भाऊ म्हणौन त्यास धरून आटकपार नेतात त्याचा सूड घेतलासा होईल व आबदाली बुडेल. त्याचा खजिना हाती लागेल. पुन्हा आटक कोणी उतरणार

---

१ कृपा.

नाहीं. तूर्त सुरजमलासी घासाघास न करावी. हे काम करून दिली व दिलीचा तोफखाना आपण येक होऊन मग पुढे सुरजमलासी बोलू. तूर्त हेच कलागत वाढऊन कामाची नाही. छ ६ जमादिलोवल माघ शुध ८ मागती आबदालीनी जुना पातशाहा आलमगीर[1] बाहेर काढिला, त्यासच तख्ती बसविलें व खानखानास वजिरी दिल्ही. सुज्यातदौलास मीरबक्षीची खिलत पाठविली. सर्व मागती येका गाजदीखाना आम्हा निराले करून येक जाले. दीढ क्रोड रुपये याजला जाठ सुज्यातदोला व खानखाना शहर सर्वानी मिलोन यास देऊन याची रवानगी करावी, महमदशाहा पातशाहाची कन्या आबदालीस द्यावी, आवरंगजेबाची कन्या आबदालीच्या पुत्रास द्यावी हा ठराव जाला आहे. आबदाली आपला करून त्यास पैका कन्या देऊन वाटे लाऊन गाजदीखान मऱ्हाटियाचा लेक भाऊ त्यास नेहमी अटकपार करून केदारेस कैदेत ठेवावा. खानखाना जाठ सुज्यातदौला येक करून मराठियासी जोर धरावा. सुरजमलास स्वामींचे भये आतिशये व इकडे गाजदीखानाचे. स्वामी आलियावरी गाजदीखान पातशाही तोफखाना घेऊ स्वामीस सामील होऊन जाटाचे नेसनाबूद करणार. खानाखानाचा पैसा हवेली खाणून स्वामीस द्यावा आपण घ्यावा यैसे मसलत नित्य करितां हे जाठ खानखाना सुज्यातदौला यास गुरू बापूजी माहादेव होऊन त्यानी उभे केले कीं गाजदीखान कलीचा कांटा ठिकाणी आबदालीस आणून लाऊन जाट दिली सुज्यातदौला येक करावे. फुटीमुले मारले जाल यैसे बापूजीबावानी केले. गाजदीखान नेहमी धरून नेतात. हे जोड करणार इताकियात आम्ही सुरजमलहि नादी लाविले आहेत हेहि राखिले. सुरजमल जाठ यानी आडीच महिने मुरसानियांसी मोरचे लाविले तेथे आनयासे गुतले. आम्ही त्याचे घरात बुनगे मथुरेस ठेविले आहे. आम्ही सुभेदारास त्यास नादी लावावयास त्याजपासी ठेविले आहे. तुझी सरकारची मामलत सर्व करून देतो यैसे बोलून गोविला व आबदाली आहे तोवर सुरजमलाची प्राज्ञा नाही कीं दिलीकडे येईल. याजपासी पैका बहुत आहे. हिंदूचा परम द्वेसी, यासी कदापि सोडणार नाही. याजकरिता जिवे मारिला तरी हा निघत नाही. मथुरेपासी भावाबदाची जागा मुरसाने आहे त्यास अडीच महिने लागला. आणीक पधरा रोज लागतील. सुज्यातदौलास मीरबकसीचा व तोफखानियाचा खिलत पाठविला. त्यास येक महिना यावयास पाहिजे. दोन

---

१ अलमगीर २ रा.

पारडी भारी. जाट व सुज्यातदोला हे आपल्या जागा गुतले आहेत. येसे करिता आबदाली कदाचित स्वामीच्या येणिया आगोधर कूच करून गेला तरी पिछा करावयासी म्हणून दिलीस यावे. मधे जैनगरचे कामास न आटकावे. जाटाचे कामास न आटकावे. आबदालीवरी जातो येसे म्हणून दिलीस यावें. जरीकरितां जवल असिले तरी पिछा करून लुटून. दूर गेला तरी दिलीस गाजदीखानाची वारसा करून खानखानापासून वजिरीची नजर घेऊन गाजदीखानास धरून दिल्हे त्याची गुन्हेगारी घेऊन. आवदालीचे हफ्ते तीन करार दिढा क्रोडीचे आहेत. येक पनास रोखच घेतले, दुसरा कर्नालावरी द्यावा, तिसरा लाहोरावरी द्यावा. ते दोन हफ्ते सरकारांत घेऊन मागती दिली. आम्ही येक होऊन सारा तोफखाना याचा काढून घेऊन यास पातशाहासहि समागमे घेऊन म्हणजे जाट सहज वेगला सुज्यातदौला वेगला जाला. येकास येक मिल्ल पावणार नाही. पैका देतील. रोहिलियाने क्रोडी रुपयाचा मुल्क खाऊन काही न द्यावे. नजीबखान पनासा लाखाचा गाजदीखानाचा मुल्क खाऊन फितुरास मिलोन गाजदीखानाचे घर बुडऊन बाधून दिल्हा तो मुलूक दिलीभोवताचा आहे. हा अभिश्राप त्याजवरी देऊन हस्तगत करून. परंतु वकील आम्हांस दगा देऊन स्वामीस भुरले घालून मसलत सेवटास जाऊ देतील येसा भरवसा नाही. वकिलाकडे पैसा सरकारचा वसूल जाला तो कडाकुरडा गोविंदपंताचा पैसा. हे सरकारकिफायेत बहुत आहे. श्रीमती आम्हांस पुणियाहून हा मार लिहिला होता त्यास वकिलाच्या अनुष्टा(ना) पुढे कोणाचे काही चालणार नाही. च्यार सो खर्च करून सर्व वारापाणी करितील हा भरवसा आहे; परतु सुचला आर्थ लिहिला. जर हे स्वारीची मसलत सेवकावरी च्यार महिने दिल्ही तरी स्वारी चौ महिन्याची मातबर अकारून दाखऊन. तीन वरसे आम्हास जाली. मग आम्ही आज्ञा घेऊन जावे. पुढे स्वामी खावद आहेत. च्यार महिने दुसरियास न पुसावे. मी सांगेन तेच ध्यानास आणावे; नाही तरी आम्ही लाहाण चाकर. स्वामी खावद चितास येईल ते करावे; परंतु स्वार येंदाची फसेल, फौज थोडी हा आर्थ चिता न आणावा, व सुभेदार आपण मिलोन वीस हजार फौजनसी तऱ्ही असतील. ग्वालेरी प्राती समसेर बहादूर नारो शकर आहेत. अतरवेदीत बालाजी गोविद धोडोपत त्रिबकराऊ आहेत. रिकामेच आहेत. यासी बोलाऊ पाठवावे व आम्ही या शेहास गुतलो. येथे पहिलेहि अंतरवेदच्या मुलुकासाठी छावणीस राहून दिलीस आलो. आतां तूर्त येथे आम्ही राहून अतरवेद राखून आबदालीवरी शह देऊन आहो. दिलीवालियावरी आहो ते कामाचे आहो व पहिली सनदी फौज

आहे ती गैरसनदी फौज ठेविली पाच सात हजार, त्याची जागा वजिरापासी करून घेतली. पैसा त्याजवळ नाही म्हणून त्या यैवजास जागा लाऊन घेतली. येक मास दिलीस होतो. भेटी गोस्टी बोलीचालीखाली येक मास गेला. सनद-पत्र तयार जाली तो हे आरिस्ट जाले. वकिलाची आमची दिलीत येक मास भेट नाहीं. आमचा जाबसाल पातशाहा वजिरासी त्याचे विद्येमाने नाही. आलाहिदा जाबसाल आहे हे परम दुख त्यास. आम्हा नाना प्रकारे प्रयोग तरी केले, मोरेकरी तर घातले, गिला रात्रीदिवस जेथवरी करणे तेथवरी केला, परतु गाजदीखान वजिराची आमची क्रिया होती त्याने आम्हासी जिवे प्राण ठेविले होते. ईस्वर त्याचे याप्राा केले. सर्वांनी मिलोन त्याचे घर बुडविले की हा मराठियाचे तिली आला हे बरे नाही; आसो तों दुसरा पातशाच होता. पातशा-हाचे रुबरू सनदपत्र सर्व करून दिल्ही. आता खानखाना बापू वगैरे सर्व येक. ते आम्हास गाजदीखाहून अधिक वैरीं समजतात. याजकरितां स्वामीपासी लबाड्या मनमाने सारिखिया करितील; नाही तरी मी सनदा पायाशुध करून घेतले ते स्वामीनी घेऊन बारा हजार फौजेचे तीस लाख रुपये सरकारातून दिल्हे आणि वकिलाचेच यैकिले तरी आमचा दुरागृह नाही. मजसारखा कमाऊ चाकर स्वामीस मिलणार नाही. कोणी आजीतागाई(त) मजसारिखी परराज्यात आंगेजणीची चाकरीहि केली नाही व च्यार खेडी निराली कोठे मेलविली नाहीत. त्याजवरी मोठी कृपा त्याज मान भीड फार. आमचे दैवच यैसे आहे. आसो; सुचला माार लिहिला आहे. इतके करून सर्व सोडून यावयाची आज्ञा जालीच तरी पत्र येईल त्याच क्षेणी स्वार होऊन येऊन. चाकर लोकांस उजूर नाही. गोविंद बलाल यानी सरंजामाची कवडी दिल्ही (नाही.) साहुकाराचा पैका कोठवरी खावा? याची फिकीर स्वामीस आसावी. आम्ही जिवापेक्षां आंगीजणी करून जेथवरी द्रिष्टी चालल तेथवरी तरतूद बांधितो; परंतु खावंदाच्या चितास न ये तरी विलाज काये? मुख्य जैनगर प्रांती सटवोजी राजाले यानी कजिया केला. तेथे प्रथम न गुंतावे, जाटाकडे न गुंतावे तरी स्वारी साधोन सारी कामे होतील; नाही तरी स्वारी चांगली होणार नाही. गुदस्ता कर्नाटकात स्वारी फसली; आता कोणी बुधी चोरील तरी आम्ही गरीब. विलाज काये? सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*Antaji Manakeshwar to Raghunathrao : reports the activities of the Abdali at Delhi and discusses the course of action the latter should determine upon to check them before it is too late.*

No. 101] [February 1757

श्री

पुर्वणी जिमत माहाराज राजश्री पंडित प्रधान
नाना धर्मधुरंधर स्वामीचे सेवेसी

(अ)बदाली जाला. पातशाहा व वजीर नात्रास ठेविला आहे. याचा इतबार नाहीं. चाहील तेव्हां दूर करील. दिल्लीचा मूळ करार येमुनेचा. मुरादाबाद, सुहारनपुर व संभल व बरेली व शाहाजाहापुर व लखनऊचे हदेपरियेंत तो रोहिले व पठाण तें तों अबदालीचेच जाणावें. अंबेर व जोधपुरचे राजे तों आवदालीचे चाकर म्हणवितात व त्यांहींच यास बोलाविलें कीं आम्हास मऱ्हाठियाचे हातें सोडवा. तुमची चाकरी करीत जाऊं. त्यांच्यानें आवदालीस भांडवत नाहीं. येक जाट मात्र आहे. परंतु त्यासहि येकल्याच्यानें काये होईल? पैकाहि देऊन सलुक करून मुल्लक रक्षील. जरी कोण्ही त्याचा पाठराखा होईल तरी भांडेलहि परंतु त्यास माहाराष्ट्राचें भये आहे. अबदाली जरी हे मारून काढतील तरी कोण जाणें आमचीं काये करितील? उंदड त्याचें समाधानहि केलें. त्यानंतर आतां जरूर जाणून तोहि रफीक[१] आहे. सारांश कीं अबदाली मारून व हरप्रकारें उछेद करावा, तोंवरी कोणी निद्रा सुखरूप न करावी. इतकाच अर्थ आहे. यांत सर्व आलें. आम्ही लोक सातां पिढियाचे दिल्लीचे पातशाहाचे चाकर होतों तदनंतर माहाराजाचेच आश्रित व पदरचें आहोंत याचा विस्तार किती लिहावा? आज्ञापत्रहि पावलें होतें कीं वरचेवरी वर्तमान आम्हास लिहीत जाणें. व राजश्री रघुनाथराऊजी दादा व मल्हारराऊ वगैरेंस जे लिहावयाचें ते लिहीत जाणें. त्यावरून कार्यात आहोंत. वरचेवरी ज्यास जें लिहावयाचें तें लिहीत आहों. परंतु माहाराजांही येक पत्र राजश्री दादास येविषयीं येक पत्र पाठविलें पाहिजे. येद्यपि मजवरी कृपा करून पत्रोतर पाठवितातो तथापि माहाराजाचें लिहिलियानें विशेष आहे. हें विनंती.

¶*Letter of Raja Keshav Rao, the first part of which is unfortunately missing, reports that the Northern potentates—both Muslims and Rajputs—have sent in their allegiance to the Abdali.*

---

No. 102] [5-3-1757

श्रीदत्तात्रेय

श्रीमंत राजेश्री पंतप्रधान ताा राजेश्री भाऊ स्वामी

सेवक देवराव मेघशाम साा नमस्कार विनंती उपरी. क्षेम ताा छ १४ माहे जमादिलाखर मुाा झांसी स्वामीचे कृपावलोकनेकडून सेवकाचे वर्तमान

१ स्नेही, दोस्त.

यथास्थित असे. कृपा करून सरकारचे जासुदासमागमें आज्ञापत्र सादर केले ते सिरसां वदून सनाथ जालो. हस्ताक्षरी यात्रा उतम प्रकारें केली म्हणून आज्ञा. तरी सेवकाच्याने यात्रा कोठे होती? हा सर्व प्रकार स्वामींच्या कृपेचा. मात्र यात्रेचें सर्व श्वामींचे पदरी पडले हे खरें. स्वामीचे प्रतापें त्रिस्थ(ल) यात्रा होऊन कासीवास आठ महिने उतम प्रकारें करून प्रयागास मावस्नानास्तव आलों. दाहा बारा रोज मोगलाने हसीलासाठी करासाठी परम श्रमी केले. माणूस तो दो तीरीहून बाहेर जाऊ न पावेसें केलें. नवी यात्रा देशाची व पुण्याची राजेश्री मोरो बल्लाळ व राजेश्री बज्याबा कऱ्हाडची व वाईची यात्रा विश्वनाथ वैद्य करमाळ्याची यात्रा नागपुरची यात्रा चिन्मयेनंदन ऐसी सात हजार जमा जाली. यांसही हासील मागूं लागला. तेव्हां सर्वांनी सेवकास मध्यस्ती सांगितली. मग नवाब महमदकुलीखानास मातुश्रीचे देवडीवरी आणून वस्त्रें व घोडा येक कडी दोन ऐसी सरकारांतून इनायेत जालीं. मग आमचे डेरियास आला. आम्हीही वस्त्रें घोड येक दिल्ही. दोनचार वस्त्रें देसची मागितली तेहि दिधले. कुली यात्रेची परवानगी कासीची यात्रा हजार माघश्नानास आली होती ते कासीस सुरक्षित जावी व दक्षणची सासात हजार त्याचा हाशील प्रयागापासून कासीस पावेतों सोडविला. भिकाजी नाईक मऱ्हाटे, रामाजी मल्हार चंदावरकर, सखोबा नाईक यासी देशास वाटे लाविले. हासील न घेविला, सोडविला. मातुश्रीचे यात्रेस कोणास कांही(न) म्हणावे, माणसे येतील ते येऊ द्यावी, जातील ते जाऊ द्या, ऐसे त्याचे दस्तक आम्ही आपले डेरियांत करून घेऊन. त्याचा दिवाण यासी आपले डेऱ्याजवळ उतरलें. मोगल बोलला कीं माझी लक्षा रुपयांची प्राप्त बसविली. आम्ही त्यास सांगितले, सर्व श्रीमंताचे स्नेहावरी नजर देऊन सोडणें. माघश्नानास यात्रा पनास सहस्र व गोसावी पंनास सहस्र होते. हे श्रय सर्व स्वामीचे प्रतापाचें. त्यांत अब्दालीची गडबड खातरेस न आणिली. मोगलही श्वामीशरण हगाम्यांत आणला. गोसावियाचेथें राजेश्री बाजी जाऊन ताकीद केली होती. माघश्नानाचे सेवटीं उगीच निंबोण्यासी (?) गिरीसी कजिया जाला. मधें पुरीनी आपले मठातून बाण सोडले. शमवीत असतां कलह वाहडला. गिरीपुरीसीं युधास प्रारंभ जाला. ते दिवसीं यात्रा कुली लुटली जावी, तेथें श्वामिपुण्य. पुढें आम्ही यात्रा सोडून फौजसुद्धां यात्रेस धारसा दिल्हा. यात्रे पुढें जाऊन उभे राहून युध्य किल्याचे तों(डे) पडलें. गिरीपुरी भाडले. पांचसें गोसावी ठार पडले. पुरी पळाले. गिरीची फते जाली. आम्हास मोठे संकट

पडले. वेणीतीरी आंम्ही येके तोडे; किला जायास जागा कोठें नवती. * * (वेळे)स श्वामिचे पुण्य आडवें येऊन आपेश न येतां कुशल जालें. सेवेसी श्रुत होय हे विज्ञाप्ति.

¶*Devrao Meghsham Lapate from Jhanshi describes his pilgrimage to the Peshwa and Bhausaheb. The troubles of the pilgrims, the exaction of taxes, the quarrels of the rival sects of Gosawis and other matters are well described. This Devrao was a confidential adviser of Raja Shahu and was, it seems, at this time deputed to accompany Sagunabai in her pilgrimage to Benares.*

---

*No. 103*] [*5-3-1757*

## श्रीदत्तात्रेय

### पुरवणी उभयतां साहेबांचे सेवेसी

विनंती उपरी. गोसावियाचे युध्य जालियावरी आम्हीं त्यास सांगून मोगला-हातीं पाठविले की, तुम्ही कूच करून जाणें. दुसरे दिवसी ते कूच करून गेले. मग आम्ही गंगेपार जाऊन येक दोन रोज राहून कासीची यात्रा कुली देसची यात्रा केली राजश्री मोरोबा व राजश्री बजाबा कुली फुकट उतरून देऊन सिवलाल नसेकची मोगल बा[1] देऊन कासीस यात्रा पावली. भिकोजी नाईक वगैरे(या)त्रा देशास वाटे लावली. ते दिवसीं सेवकाचे देवार्चन गडी पोहून आणीत होता. देवांसहित देवार्चन भागीरथीवास देवासहित जाला. मो(टा) खेद जाला. आतां सर्व देवार्चन आमचे श्वामींस कल्पून. चिरंजीव बापूची मुंजी वेणीतीरी करून कूच करून मजल दरमजल झासीस येऊन पावलों. येथं मातुश्री माहेरास्तव (?) पांच सात रोज राहणार. त्यांवरी मजल दरमजल येऊन पाये पाहतों. शुज्या-येतदौलाचा आब्दालीचा पूर्वीपासून रुणानबंध नाहीं. यास्तव लखनऊस फौज जमा करून प्रयागचे महाकुलीखानास[2] बोलाऊन नेले आहे. आपले तयारीत आहे. परतु आबदालीचे धाके गर्भगळित जाले आहेत. प्रयाग करोन मातुश्रीचे कुचाचे समई वस्त्रें पाठविली. आम्ही सर्वमंडळीसहित किल्यांत गेलों होतों. जो वट चाळीस वरशें कपाट उघडलें नवतें ते श्नेहेकडून श्वामींचे प्रतापेकडून किली आणऊन कपाट उघडून वटाचे दर्शण केलें. मोठा लाभ हाच मेळविला. वाटेस कोचेंत[3] राजश्री दामोदरपंत सहकुटुंब दिलीहून पळून

---

१ रास्ते ?  २ महमद पाहिजे.  ३ जालोनेजवळ बुंदेलखंड कालपीचे अलीकडे.

सहकुटुंब आले आहेत. त्याचे बंधु बापूजीपंत दिलींत आहेत. त्यांस आब्दालीचे भेटीस किल्यांत बोलाऊन मागें त्याचे घर खणती लाऊन (लु)टलें. पुरुशोतमपंत देवराव त्याचे बंधु, समशेर बाहादर याचे कटकांत आगऱ्यावरी आहेत. आम्ही जाऊन भेटी घेतली. दामोदरपंत वेडे जाले आहेत. शरीरीं कंपवात, देहभान नाहीं, ऐसी आवस्था त्यांची पाहिली. समशेर बहादर व राजश्री नारोपंत कबिले बुणगे झाशीस ठेवून आगऱ्यावरी गेले आहे. पुढेंही जाणार. राजश्री अंताजी माणकेश्वरासी आब्दालीचे फौजेसी युध्य जाले. सरदार बहुत पडले. परतु सावरून मथुरेस येऊन तेथून पुढे जयनगराकडे जाणार आहेत. पुन्हा जमा जाले आहे. राजश्री अंताजीपंती फौज थोडी असतां ऐकतों कीं शर्त केली. आजुणही दिलीभोवतेच आहेत. राजश्री दादासाहेब व मल्हारबा इंदुरास आले म्हणून वार्ता असे. बहुत काये लिहिणें लोभ असों दिल्हा पाहिजे हे विज्ञापना.

¶*Devrao Meghasham describes the pilgrimage he made in the company of Sagunabai Peshwa, and mentions details of the proceedings of the Abdali at Delhi and the attitude of Shuja-ud-dowla towards him.*

---

*No. 104*] [*5-3-1757*

## श्रीदत्तात्रेय

### पुरवणी श्रीमंत राजश्री उभयेता साहेबांचे सेवेसी

विनंती उपरी. आबदालीचे वर्तमान तरी दिलींत किल्यांत आहे. खानखानाचे मायेपासून तीन करोड रुपये घेतले. व खानखानास वेगलच तानून क्रोड रुपये घेतले. वजिरापासून पंनासा लक्षाचें जवाहीर व पंनास लक्ष रुो नख्त घेऊन कैदेंत ठेविलें आहेत व खानखानाहि कैदेंत आहे. आबदालीनें आपला पुत्र ज्याहनखान व दाहा सहश्र फौज व बुणगें अवघे लाहोरास वाटे लाऊन आपण सडा होऊन दिलींत आहे. कुल शहरास सांप्रत खणत्या लावल्या आहेत. पांच रुपयेपावेतों माणसापासून निघाले ते घेऊन खजान्यांत दाखल करितो. कुली शहरांत व बाहेर फौज उतरली आहे. शहरांत जो ज्यांच्या घरीं राहिला तो त्याचेंच घर समजून वर्तणूक करितो. माणसें बहुत मारलीं गेलीं, व स्त्रिया बहुत नगरांत भ्रष्टल्या. कितेकानी प्राण दिल्हे व कितेकानीं जळप्रवाह केला. जितक्या बादशाहजाद्या होत्या तितक्यांस आपले लेकांस विवाह करून दिल्या. जितक्या पातशाहाच्या बाइका व शाहजाद्यांच्या बाइका होत्या त्या आपल्या घरांत निका पढून घातल्या. जेथवरी चांगली बाइको हिंदूची होती तेथवर लोकानी बाटविल्या व आपलाल्या घरांत घातल्या. कोण्ही म्हणतात कीं आपल्या

देशास जाईल. कोण्ही म्हणतात अंतरवेदींत उतरेल. त्यासहि भय स्वामींच्या प्रतापाचें बहुत आहे. आपल्याहि फौजा लाहणथोर भोंवताले कोण्हीं जवळ, कोण्ही अगरियांत, कोण्ही मथुरेस, व कोण्ही सकुराबादेस यैस्या उस्यांपांइंता आहेत. श्रीमंत राजश्री दादासाहेब व राजश्री मल्हारबा इंदुरीहून पुढें चालिल्यावरी त्यांचे सलाबतीनें दिली सोडून जाईल असें दिसतें. स्वामीच्या पुण्येप्रताप तेज्यापुढें हा जाईल असें दिसतें. याहीवरी स्वामीच्या प्रतापें पराभव पावेल यांत संदेह नाहीं. याउपरी आम्हांसहि जे दिवसीं स्वामींचे पाये द्रिष्टीस पडतील * * * तो सुदिन सोनियाचा होईल. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

*¶Devrao Meghsham Lapate after describing the horrors inflicted by the Abdali on Delhi and the hardships endured by the Emperor's family gives his surmise as to the future plans of the Abdali.*

---

*No. 105*] [ पौ *12-3-1757*

पौ छ २१ जमादिलाखर

श्री

पुरवणी श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामीचे शेवेसी

विज्ञापना. पत्रे लिहून लखोटा जालियावरी माणसे रवाना जालियावरीचे वर्तमान. आबदाली खासा दिलीस दाखल जाले. तमाम शहराभोवत्या फौजा आहेत. आम्ही त्यांची आतांच एक चौकी दोन हजार फौजची बुडविली. तीन कोस आम्ही शहरापासून होतो. तेथे चालोन आले. मागती पाठीवरी दोन कोस घेऊन मग वेढले. परंतु दोन हजार झाडून बुडविले. त्यात दोन प्रहरा सारे फौजेची शर्त वेचली. निसत्व फौज जाली, तेव्हां हजार बारासे मारिले. हजार घोडे सापडले. वरकड त्यानी घोडी मारि(ली) वरकड जखमी गेले. परंतु दोन हजार बुडवावयासी सारे फौजेस जीवेप्राणे मेहनत करावी लागली. मग सरून साहा कोसावरी जाऊन आताच उतरलो. पातशाहा पुत्रासमेत बुरजामधें चिणले. वजीर व खानखाना त्याचा मामा यासी आबदालीने आपल्याजवल ठेविले आहेत. दोन क्रोड रुपये वजिरास लाविले व येक क्रोड खानखानास लाविले. शहरास दोन क्रोड लाविले आहेत. शहरात पनास लाख मिलता कठीण. वजीर खानखानाने साफ सांगितले की आमचे घरचा झाडा घेणे नाहीं तरी जाटावरी चालणे, पाच क्रोड रुपये देवितो. याप्रा जाबसाल होऊन किल्यात दाखल जाले. कुतबा पढले. द्वाही शहरात फिरविली. नजीबखान

रोहिले यासी कारभार शहरचा वगैरे सोपला आहे. त्याजवरी फार मेहरवानी आहे. याप्राा जाले. बापू वकील यानी स्वामीची आर्जी दिल्ही कीं बालाजी-रायाचा वकील मी आहे. ते लाख फौजनिसी चाकरीस येतात. तमाम मुलुख पातशाही सोडून देतात. याप्राा स्वामीच्या नावाची व सिकीयाची आर्जी दिल्ही. त्याचे दुसरे दिवसी हे फौज दोन हजार पठाण बुडविले. तेव्हा बापूस सांगून पाठविले की हा गनीम कोण आहे? बापूने सांगितले हे वजिरांचा चाकर आहे. त्याजवरी जा(हा)नखान दाहा हजार फौजनिसी पाठऊन धरून आणा. किल्याच्या दरवाजियासी चौकीवरी पारसनीस आहे त्यास पनास देऊन दिवसाचे दिवस वर्तमान आम्हास लिहित असतो. बहुधा सुरजमल सारा मुलुक सोडून थोर जागे मात्र बलावील. नाही तरी नजीबखानाचे हते पैका देईल ते पाहावे. जरी करिता श्रीमंत राजश्री दादासाहेब सरदार लौकर पावत नाहीत तरी दोन महिनियात जाट राजे याची मामलत जाली आणि सारे येकवट जाले तरी परम कठीण पडेल. आता सत्वर येते तरी जाट राजे वगैरे राहिले ते सामील होऊन यासी काढून दिलीहून देतील. सर्वांनी राजियानी व जाटानी आमच्या लोकानी तमासाच पाहिला कीं काये होते. परंतु दिलीचे फाटक होते तोवर सर्वास बरे होते. आता फाटक तुटले. धरणीकंप जाला. आता काही उतम नाहीं. तथापि आताहि समसेरबाहादर नारोपंत गोविंदपंताचे पुत्र वगैरे जमा होते तरी ते दाहा हजार आम्ही दाहा हजार वीस हजार येक जालियास जाट आजी सिध आहे. जाट आम्ही बोलावलियावरी जिल्हा जाटाचा आम्ही राखू. परंतु सर्वाच आम्ही करावे मग परत करावी तरी आम्ही येथून निघता याचे राहाणेच कठीण आहे. अंतरवेदीत जाणे त्याचे जाले तऱ्ही बरे. सर्वांनी तमाशाच पाहावा तरी सारा तमाशाच होईल. हे कोणाच्या ध्यानात येत नाही. जरीकरिता सुरजमल पैका देऊन त्याचा चाकर होत नाही तरी आम्ही त्यास मिळून येक मास थांबाथाब श्रीमंत व सरदार ये तोवरी करितो. जरीकरिता जाट धर न धरीच, मिलाला तरी मग आमची जड कोठवरी? थारा कैसा धरावा? तेव्हा मग निवावेसेच होईल. आमचे सरदार आहेत त्याच्या मते हे दिलीस गेले यानी आबदाली फते येक-ल्यानीच घ्यावी तर लाखों फौजा तीन पातशाहात जिंतून हिंदुस्थानची पातशाही घेतली. धरणीकंप जाला. दोनसे दोनसे कोसावरी वीस हजार फौजचे धणी सुज्यातदौला जाट, माधोसिंग, बिजेसिंग वगैरे यासी कंप सुटला. आम्ही तरी दिलीभोवते आजी चार दिवस मारामार करीत आहो. जे आम्ही केले व करितो त्याचे चौथा वाटा आमचा येकच सरदार येऊन करिता तरी फारच होती. ती

हिमत सर्वांची कळून चुकली. स्वामीस मात्र बहुताचा भरवसा, परंतु येका पासूनही औघड काम घडले नाही व पुढेही घडणे दूरच आहे. हे येक रा मल्हारजी होळकर व राजश्री दताजी सिंदे यांचीच आहेत. वरकडास दूर आहे. त्यांचा शागिर्द सेवक आपल्या जीवापेक्षा सिध आहे. सारांश जरीकरिता श्रीमत फौजा सरदार सत्वर येत नाहीत तरी हिंदुस्थानचा सरकारच्या मुलुकाची फजिती होईल आणि सारे येकवट जालियावरी फार भारी पडेल. फार करून आम्ही राजे व जाट यांसी सलुख राखोन महिना पंधरा दिवस फुटोन देत नाहीं, परंतु दिवसगत जालिया उतम नाही. बहुत काय लिहिणे हे विज्ञापना.

¶*Antaji Manakeshwar to the Peshwa, giving news of the doings of the Abdali at Delhi.*

---

*No. 106]* *[13-3-1757*

[ वरील मजकूर फाटला. ]

(म)नास संतोष जाहला. पत्री लि * * * * * च्या प्रयेत्नात * * बहुत दिवस बै * * * त्यास छ १७ जमादिलावली किला हस्तगत जाहला. हे संतोषाचे वृत साहेबास कलावे म्हणौन पत्रीं लिहिलेवरून परम हरशोत्करष चितास जाहला. आपण येशस्वी दिग्विजयी प्रतापी पराक्रमीच आहा. याचप्रमाणें तुम्हासी श्रीभवानीशंकर येश सदोदित प्राप्त करील. इरान पठाण लाहोर मुलतान आदिकरून अमल करीत दिलीनजीक पाच कोसावरी येऊन सालेमारबागात उतरला. दिलीवाला अर्कात[1] आहे. किला खाली करून देणे किंवा युधासी उभे राहाणे म्हणतात. दिलीवालेत काही युधाचा व्होष राहिला नाही. हिंदुस्थानचे रजपूत तिकडील संधानात आहेत म्हणौन तपसिले लिहिले ते श्रवण जाहले. ही गोस्टी आपण समजेसांत आणिलें नसालच. दुसरी गोष्टी राजश्री रघुनाथपंत तिकडे मोहिंमेस गेले आहेत. कोणप्रसंग कसा हे काही कलत नाही. आपण कर्नाटकांत बहुत दिवस न गुंतता या रानी येऊन मातबर फौज पंत मारनिलेच्या उपरालेस रवाना करून पाठऊन द्यावी. कदाचित इरानी पठाण रजपुताची गोस्टी यैकून वक्रता चितांत आणील तरी त्याच्याहि येशाच्यां संभावितेस आपणच पात्र आहेत. ईस्वर आपल्यासच येशकीर्ति देईल; परंतु उपायास व्यवधान नसावे यास्तव हे पत्र लिहिलं आसे. साहेबाच्या चितात आपल्यास दरशन अविलंबेकरून द्यावे; आणि तुमचे विजय

---

१ बाले किला.

आलंकार आवलोकन करावे हेच सर्वात्मना आहे. येविसींचा आर्थ राजश्री शेषो नारायेण यासी आज्ञा केली आहे त्यावरून कळेल. जाणिजे रा छ २२ माहे जमादिलाखर बहुत लिहिणे तरी आपण सूज्ञ आसां.

लेखन
सीमा.

¶*The writer exhorts the addressee to return from the Karnatak at once and to proceed to the North to give succour to Raghunathrao in fighting against the Pathans.*

---

*No. 107]* *[16-3-1757*

पौ चैत्र शुध पंचमी

## श्रीपांडुरंग

श्रीमंत राजश्री भाऊ
स्वामीचे सेवेसी

पोष्य रामराव नीलकंठ कृतानेक सास्टांग नमस्कार विनंती. येथील कुशल तागायत फाल्गुण वद्य ११ पावेतों यथास्थित जाणोन स्वकीय कुशल लेहावयास आज्ञा केली पाहिजे विशेष. इकडील हिंदुस्थान प्रांतीचें वर्तमान पठाणाचे सावकारी नवा रोजाचे छेडे आगरे जयपुरचे आले. पेशर्जी वर्तमान आपणास लिहिलें होतें कीं मावारा गेला. * * * * दोन मजलीपलीकडे जाऊन द्रव्य मार्गस्त केलें आणि तेथोन परतंला ते मथुरा येऊन मारली. प्रहरपर्यंत कतलाम केला. येणेप्रमाणें माहा आनर्थ जाला. जाटाचे फौजेने सिकस्त खाऊन किलेदाखल जाला. राजश्री शमशेरबहाद्दर व नारो शंकर आंताजी माणकेश्वर आगऱ्यावर आहेत. श्रीमंत राजश्री दादासाहेब व मलारजीबावा रामपुऱ्याच्या राणांत आहेत. फौज जमा जाली नाहीं. याप्रमाणें वर्तमान सावकाऱ्यांत आलें तें सेवेसीं लेखन केले असे. इकडील लोक वसवास फार करितात. पुन्हां वर्तमान आलियावर वरचेवर लिहीत जाऊं. आपणांकडील विस्तारें वृत्त सदैव लेखन करीत असावें. सेवेसीं श्रृत होय हे विज्ञापना.

¶*Ramrao Nilkanth writes news from the North to the Bhausaheb: "Raghunathrao and Malharrao are at Rampura and Samsher Bahadur, Naro Shanker and Antaji Manakeshwar are at Agra."*

2311

No. 108] [28-3-1757

श्री

सेवेसी विज्ञापना. ताा छ ७ रजबूपावतों वर्तमान यथास्थित असे विशेष. शहरींहून चैत्र शुध द्वितीयेचें पत्र कृष्णाजी भैरव थथे याचे चैत्र शुध शष्टीस पुण्यास आलें. त्यांत मजकूर, दिलीमधें पठाणानें अमिराच्या वगैरे मातबर लोकांच्या हवेल्या खटल्या. त्याजमधें पंचवीस कोटी धन प्राप्त जाले. यासिवाय जवाहीर सांपडलें. त्यास पठाणानें आपल्या लेकाबराबर दहा हजार फौज देऊन द्रव्य व उत्तम हस्ती व घोडे वगैरे जिनस व बुणगे सर्व लाहोरास रवाना केलें. आपण निघोन जाटावर येतों हा दबाव घातला आहे. दिलीपासून बारा कोस फरिदाबाद आहे तेथें येऊन कतलाम[1] केले. मुलकांत दबाव घातला आहे. त्या प्रांती पल सुटला. मुल्क उज्याड होतो. मथुरेस लोक होते ते सर्व पलाले. आगऱ्यातील लोक तेही पलतात. गनीम वीस हजारपावेतों जवलच आहेत व जाटाची फौज पंधरा हजार आहे. परंतु यांच्यानें कांहीं होत नाहीं. पठाणापासी वीस हजार फौज आहे व दिलींत पंचवीस हजार फौज चाकर ठेविली. श्रीमंत राजश्री दादासाहेब व मल्हारजी होलकर जयनगरानजीक तिसा कोसावर जाऊन पोहचले असें वर्तमान लिहिलें होते त्यावरून सेवेसी लिहिले असे. दुसरा मजकूर रघुनाथ नाईक नवाले याचें पत्र नासिकाहून पुण्यास आलें. त्यांत मजकूर कीं वकिलानी पठाणाची बदनजर पाहिली याजकरितां दिलीतून रात्रीस पलोन आगऱ्यास आले याप्रमाणे लिहिलें होतें. विदित जालें पाहिजे. सेवेसी श्रुत होय, हे विज्ञापना.

¶*This letter refers to the rich spoils which Ahmadshah Abdali secured when he plundered Delhi during his third invasion.*

---

No. 109] [March 1757

श्री

पुा[2] श्रीमंत राजश्री पंतप्रधान
स्वामीचे शेवेसी

विज्ञापना. आज्ञापत्री आज्ञा, बालाजी गोविंद याचे आज्ञेप्रा वर्तणूक करणे. तरी प्रस्तु(त) आबदालीचे लढाईत आहो; यातून जगलो तरी देशी येऊन; देशी

---

१ सर्रास कत्तल. २ पत्र अंताजी माणकेश्वराचें.

आलियाउपरी सरदारी करणेचे कपाली आसली तरी बालाजी गोविंदाच्या आज्ञेप्रा वर्तणूक करून. सन इसनेत दिलीत गेलो, पातशाहानी साहेबतैनात माही-मरातीब दिल्हे. स्वामीस पुसिले त्याची उतरे स्वामीनी दाहा वेला लिहिली की, नौबतीस या सरंजामास दाहा हजार फौज आसावी, त्याची जागीर मेलवावी म्हणजे तुमची सरदारी कायेम, यैसी दाहा पत्रे मजपासी आहेत. त्याजवरी पातशाही खालसे इटावे, फर्फुंद, शुकुराबाद, कालिंज पातशाही ते नाना प्रकारे छेद करून जागीर करून घेतली. मागती श्रीमंत रा। दादासाहेबी कृपा करून आम्हास सरकारचे सिकियानसी जागीर दिल्ही, त्याप्रा। पुणियात स्वामीनी कृपालु होऊन सनदा दिल्ह्या. आम्ही आपली खुशीने गोविंद बलाल कमाविसदार केला, त्याची फले आम्हास याप्रा। प्राप्त जाहाली. आसो. श्रीमंत रा। दादासाहेबी व स्वामीनी मजला दाहा वेल वचन दिल्हे आहे जे तुम्ही जितका जागा आपल्यास परभारे मेलऊन आणाल तो तुमचा तुम्हास द्यावा. आमच्या पदरास झट मात्र न आणावें. त्याजवरून थोडे बहुत मेलविले. आपणहि दोन वर्षे कृपा करून चालविले. पुढे वीस हजार फौजेची जागा मेलऊन वीस हजार फौजनसी चाकरी करावी, लोकासारखे सरकारचा खालसा मुलूक जागीर न मागावा यैसे उमेद; त्यास आम्हास हा नतिजा, यैसे हरामखोर चाकर आम्ही! येवढी इतराजीच तरी आमचेच काये मरते? त्यास दीड महिना आबदालीस लढाई करितो. हजारो घोडे माणूस कामास आले. शंभर कागद ज्यास पाठविले त्यानी शंभर पनासा कोसावरी आसावे, इकडे तोंड न करावे, त्याजवरी मेहरवानी!! आम्ही मरावे, येवढे ढाल डोईवरी घ्यावे तेथे प्राप्त सुलाची पोली होईल त्याजला खावद दुसरा, यैसेच आपले कपाल निवडले त्यास स्वामीस दोश काये? सेवेसी श्रुत होये हे विनंती.

¶*Antaji Manakeshwar remonstrates with the Peshwa upon having confiscated his jagir in the Doab granted to him by the Emperor for his meritorious services.*

---

*No. 110]* *[March-April 1757*

*2*

सेवेसी विज्ञापना. सेवकाचा दुराग्रह की गढ्या न घ्याव्या तरी तेहि नाही. तूर्त अबदालीच्या पिछाडीस च्यार रोजचालोन हलका जाला. रोहिले फुटतील, वरकड फुटतील तरी फतेच होईल. नाही तरी तो लाहोरास जाईल. आपण त्याचे मागे मागे करनालपर्यंत गेलियाने हिंदुस्थानास कीर्ति होईल. पुढे अखेरसाल दोन महिनियाने आले. मग जैपूरच्या रानात छावणी करून

मुलूक जप्त केला तरी चिंता काये? केवल गडियास लागावे तेव्हां मास पक्ष येथेच गेला. ते अबदालीसाठी धावोन आला ऐसे लोकास दिसणार नाही. रोहिले जाट वगैरे याजवरी इभरत राहणार नाही. सुचला अर्थ लिहिला आहे. रागास न यावे. आपल्या चितास येईल त्याप्रा। कर्तव्य ते करावे. सेवक लोकांनी सुचली गोष्टी ती विनंती करीत असावी. करणे न करणे खावंदाचा येख्तार. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*Antaji Manakeshwar counsels Raghoba not to linger in Rajputana but boldly to start in pursuit of the Abdali if Maratha prestige is to be maintained.*

---

*No. 111*] [*5-4-1757 ?*

श्री

विनंती सेवक अंताजी माणकेस्वर कृतानेक सां। नमस्कार विज्ञापना येसीजे. स्वामीचे आज्ञापत्र शंकराजी राम याजबा। आले. तेथे आज्ञा की हुजूर येणे. येसियासी सेवकास आज्ञेखेरीज दुसरा विचार नये. परंतु सरकारचे हतीं २ दोन त्यास आजार बहुत जाला. तलावरून सुटत नाहीत. मातबर हती टाकिता येत नाही. उपाये बहुत केले. येका दो दिवसा थोडीसी फुरसत होताच सेवेसी शनिवारी दाखल होतो. अबदाली खासा वृंदावनावरी होता. नजीबखान मथुरेवरी. जाहानखान आगरियात. सरवरखान ढवलपुरीं. ते सर्वत्र येकत्र मथुरेस जाले. तेथून दिलीस दरकूच गेले. पाच लाख रुपये सुरजमलानी अबदालीस नजर कबूल केली. दोन लाख रुपये मुतसदियास. रुपये येकूण सात लाख रुपये करार जाटानी जुगुलकिसोर याचे विद्यमाने करार केले. त्यांची बशर्त दिलीस जावे तेव्हा निमे द्यावे. दिलीहून पुढील मजलीवरी निमे याप्रा। करार करून जुगुलकिसोर व येक येलंची[1] ठेऊन घेतला. कवडी देईल येसे तो नाही; परंतु याप्रा। ठराव जाला. अगरियाचा किलेदार भांडला. रयतपुरे च्यार मारिले. साहुकारांनी पाच लाख करार केला. वसूल दिलीस गेलियावरी देऊन यैसा करार केला. गाजदीखान आगरियांस किला खाली करावयांसी आला होता. जानहखान आगरियातून मथुरेस आला तेव्हा गाजदीखान अंतरवेदीत गेला. अबदालीची गाट तोडिलीसी जाली. पुढे फरकाबादेस जाईल कीं मधे राहील न कले. दिलीस च्यार जोडीं रवाना केले तेथे आम्हाकडील वकील अबदालीच्या लस्कारात इरानचा त्याचा आतविसी आम्हाकडे वरीसभर चाकर आहे. तो तेथे

---

१ वकील.

आहे. दिलीहून कूच जालियाची खबर येताच सेवेसी पावती होईल. याउपरी खावंदाची मर्जी असली तरी दिलीच्या रोखे थोडे थोडे चलावे. तोहीं अनायासें दिलीहूनही जाईल. स्वामीची सलाबत भारी पडली म्हणून त्याने माघारें घेतले. स्वामीची मर्जी दिलीकडे चलावयाची असली तरी रस्ता कामाचा नाहीं. ज्या मार्गे अबदाली आला गेला त्या मार्गे दोन सेर दाणें व वैरण मिलणार नाही. उजवे हाते टाकून चारा दाणा पाहून चालावें. अबदालीपासून हमेशा जाहन-खानाची फौज लाहोरा ता। पंधरा कोस हमेशा पुढे चालत असे. पुढील चौकसी करून नित्य बातनी ल्याहावी याप्रा। सेवकास आज्ञा जाली तरी पुढे पंधरा कोस ज्या रोखे आज्ञा होईल त्या रोखे चालोन पुढील मजली मजलीची चौकसी करून सेवेसी पाठऊन. अबदालीचा पुत्र खजिना घेऊन लाहोरास जात होता त्यामार्गी आला जांट याने आडवा जाला तो माघारा सरून गडमुक्तेस्वराकडे आला. बहुधा येकच होतील. सेवकाचे विचारें जेनगर प्रांती गढियांस लागावे हे तूर्त नाही. तूर्त त्याच्या शहांस मार्गे असावे येसे आहे. त्यास स्वामी खावंद आहेत. जे खावंदाची मर्जी असेल तें सेवकाचीं संतोश. विनंती रा। शंकराजी राम करितील त्याची आज्ञा करावयास स्वामी समर्थ आहेत. याउपरी जैसी आज्ञा येईल ते सेवकास प्रमाण. बातमीस जागा जागा पनास कासीद आहेत. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*Antaji Manakeshwar reports the movements of Ahmedshah's forces to Raghoba and asks him to start immediately in pursuit.*

---

*No. 112*] [*5-4-1757*

पौ छ १९ रजब

**श्री**

**श्रीमंत राजश्री दादासाहेब**
**स्वामीचे शेवेसी**

विनंती सेवक आंताजी माणकेस्वर कृतानेक सा। नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल ता। चैत्र वद्य १ प्रतिपदा सेवकाचे वर्तमान येथास्थित असे विषष. स्वामीचे आज्ञापत्र आले तेथे आज्ञा की आबदालीची बातनीची चौकसी करून बातमी वरचेवरी लिहीत जाणे. त्याजवरून बातमीची चौकसी उतम प्रकारे केली आहे. नेहमी आबदालीच्या लस्करास वकील इरानचा भला माणूस मातबर चाकर आम्हाजवल आज आठ महिने (आहे) * * * नेहमीच त्याच्या लस्करास * * * * (जा ?) टाचे घरी डाककारकून नेहमी

(बसविला आहे). आगरियात व रोहिल्याचे वरी नेहमी कारकून आहेत. पनास जोडी कासीद नेहमीच आहेत ते सर्व जागीजागा आहेतच. प्रस्तुत आबदालीचा जाहनखान सरदार आगरियावरी होता. काही लोक ढवळपुरी होते ते मथुरेस आले. मथुरा वृंदावनावरी खासा व रोहिले होते ते सर्वत्र एकत्र होऊन कूच करून दिलीस गेले. पुढे दिलीस राहातील किंवा जातील याजकरिता च्यार जोडी कासीद दिलीस वकिलाकडे आमच्या आम्ही रवाना केले आहेत * * * * * * * * * * * * * आहे. येका दोन रोजा फुरसत जालियास आम्ही सेवेसी येतो. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Abdali's march back to Delhi from Muttra and Brindaban is reported by Antaji to Raghoba.*

---

*No. 113*] [*6-4-1757*

(वरील भाग फाटलेला आहे.)

विनंती. सेवक अंताजी माणकेस्वर कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. सेवकाचे वर्तमान ताा चैत्र वद्य द्वितीया सौम्यवासर मुकाम मल्हारण स्वामीचे कृपेकरून येथास्थित असे विशेष. येक दोन पत्रे स्वामीची आली तेथे आज्ञा कीं कूच करून हुजूर येणे. त्यावर पत्रदर्शनी यावें परंतु दोन हतीस आजार बहुत जाला. औषध उपाये बहुत केला. त्यामुळे दोन मुकाम जाले. काली मंगळवारी कूच केले. आजी मुकाम मजकुरास आलो. शुक्रवारी सेवेसी दाखले होतो वि[फाटले]

¶*Antaji Manakeshwar is repairing to the presence of Raghoba.*

---

*No. 114*] [*Date of receipt 20-4-1757*

पैा छ १ शाबान

**श्रीगजानन**

**श्रीमंत राजश्री बापूसाहेब**

**स्वामीचे शेवेसी**

सेवक राघो लक्ष्मण कृतानेक सांा नमस्कार विनंती विज्ञापना येसीजे. पहिल्या पत्रावरून वर्तमान ध्यानास येईल व आम्हांसमागमें श्रीमंताचे पत्र नवाबास होते तेथे माार लिाा होता कीं सरदारांचा व तुमच्या वडिलाचा कौलकरार आहे तोच आमचा आहे. त्याजवरून नवाबानी आम्हांस पुसिलें कीं आमच्या चितांत श्रीमंत रघुनाथरावजीसी कौलकरार करावयाचे आहे. तुम्हांसमागमें बेलभंडार पाठविला असेल तर आम्हांस देणें व आम्ही आपली नानरोटी रावजीस देतों.

त्यास आम्हांस कांहीं श्रीमंताची आज्ञा शफतप्रमाण करणें म्हणोन नवती. बेल-भंडाराची गोष्ट आम्ही आपल्या मतें कैसी करावी ? हे ध्यानास आणून नवाबांसी उतर केले कीं आम्हांस श्रीमंताची आज्ञा आहे कीं जे गोष्टीत नवाबाची खातरजमा होईल ते करणें. परंतु श्रीमंताच्या व आपल्या भेटीस बहुत दिवस लागत नाहींत. हे गोष्ट रुबरूच[१] जाली तर बहुतच उतम आहे. दुतर्फा खातरजमा आहे. त्याच्या चितांत की शफतप्रमाण भेटीपूर्वीच करावें. आमच्याहि चितांत होते कीं ये गोष्टींत उतमच आहे. कांही आपलें नासत नाहीं. याचा निग्रहच पाहिला तर शफतप्रमाण करावे. आपले ममतेत याजला ओढावें. इतकियांत नवाबास कोण्ही सांगितले कीं तुम्हीं श्रीमंतासी नवा शफत करितां येणेकडून राजश्री सुभेदारांस विशम वाटेल. जर हेच गोष्ट करणे आहे तर सुभेदाराच्या विद्यमाने करावी. याजवरून तूर्त हे गोष्ट राहिली. आम्हीं श्रीमंतासहि लिहिलें आहे कीं आज्ञा होईल तर शफत (प्रमाण) करून घेऊन. त्यास सांप्रत स्वामींचे आगमन * टीहि होतील हे गोष्ट स्वामींनीच करून द्यावी. दुसरे स्वामीकडे आम्हास पाठवीत होते. तेथे हाच विक्षेप घालणारानी घातला कीं केवल श्रीमंताकडेच जाबसाल लागला तर सुभेदारास वाईट वाटेल. वास्तव भवानीदासास पाठविले असे कीं जाबसाल करणे तो त्याच्या विच्यारें करावा. त्यास आम्हीं स्वामींचे येथें असतां परभारा जाबसाल होऊ लागलियावर स्वामीचे तर्फेने असलियाचा वकर[२] काय ? तर हे गोष्ट स्वामीचे हांतीच आहे. जे ग्रहस्त स्वामीपासीं जाबसालास येतील त्याजला सांगावें कीं तुम्हीं आलांत आणि आमचा वकील काय म्हणोन नाही आला ? हे गोष्ट कार्याची नाहीं. नवाब रुबरू आमच्या वकिलास सांगतील आणि वकील येऊन आम्हांस सांगतील तेव्हांच आमची खातरजमा आहे दोन च्यार दिवस आधिकआगले ये गोष्टीकरिता जाबसालामुळें लागतील परंतु स्वामीचे आम्हीं येथें आहोंत हे पुरते ध्यानास येईल. गंगातीरपावेतों स्वारी येऊ द्यावी. तेथून हे गोष्ट जाल्याविना आलीकडे उतरावयाची तजवीज न केली तर सहजच आम्हांस पाठवितील. याजला अद्याप सरकारची कैद कांहींच ठाऊक नाहीं. ज्यांस जाणतात त्यासच जाणतात. आम्ही विनंती केली ते आपणाकरितां केली नाहीं. सरकारचे कैदेकरितां केलीं असे. स्वामी सर्वज्ञ आहेत. ध्यानास येईल तें करावे. स्वामीपासून पत्रे नवाबास येतील तें आम्हांकडेच पाठवीत जावी. हें पत्र वाचून ध्यांनातच

---

१ समक्ष.　　　　२ प्रतिष्ठा.

आशये ठेवावा. आम्हास अद्याप नवाबानी खर्चास येक पैसा दिल्हा नाहीं. तर चिंता काय आहे ? जाबसाल आमचे हाती असल्याने सर्व होईल. सर्वाविशई स्वामित्व स्वामीचें आहे. वरकडाच्या मनसुब्याने काय होते ? नवाबांसी शफत प्रमाण करणें आहे तर नवाबास येक पत्र ल्याहावें कीं आम्हीं वकिलांस सांगितलेंच होतें कीं जे गोष्टीत नवाबाची खातरजमा होये ते गोष्टीचा शफतप्रमाण करणें. करार हाच कीं पूर्वीं तुमच्या वडिलाचा व सरदारांचा कौलकरार आहे तो आम्हास प्रमाण. तेणेप्रा तुम्हीं व आम्हीं चालावें व पुढें नवा मनसबा जो होईल तेथे तुमच्या व आमच्या विचारें ठहरेल तैसें करीत जावें. येविशई आम्ही श्रीमंतास विनंतीपत्र लिहिलें आहे. श्रीमंताचे पत्र येविशई स्वामीस येईल. नवाबानी स्वामीस पत्र लिहिविलें आहे ते तयार जालियावर सेवेसी पाठवितों. व गाजुदीखानाकडील सलुखाचे वर्तमान पुरते कळलें म्हणजे लिहून पाठवितों. शेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*Ragho Laxman reports talks with Nawab Shuja-ud-dowla. "The Nawab", he says, "is anxious for a close alliance directly with you but is advised that such an act would incense Holkar". The writer requests Bapu to see to it that he is not ignored.*

---

*No. 115*] [*23-4-1757*

**श्री**

**श्रीमंत राजश्री सखारामपंत बापू स्वामीचे सेवेसी**

पो गोपाळराव बापूजी सां नमस्कार विनंती. येथील वर्तमान ताा छ ४ साबान मुकाम कसबे सिवली प्रांत आंतरवेद येथास्तित आसे विशेष. इकडील सविस्तर वर्तमान श्रीमंताचे पत्रावरून निवेदन होईल. सारांष आंतरवेदीतील आमल उठला. राा बाळाजी गोविंद यावर शह पुर्ता दिल्हा. त्यानी आम्ही येक व्हावे तरी आम्हाकडेहि फौज रवाना केली. ते भारी. आमचे सामान थोडके. तथापि खावंदाचे प्रतापे येक वेळ गांठी घालितो. खासा स्वारी अथवा फौज या प्रांते आल्याविना या जाग्याची स्तित राहत नाही. गाजदीखान व पठाण यानी येसमई आगापिछा ध्यानास आणिला नाही. याचे पारपत्य जाल्याखेरीज आमल राहत नाहीं. विदित जाले पाहिजे. बहुत काये लिहिणे. कृपा लोभ असो दीजे हे विनंती.

¶*Sakharam Bapu is informed that Ghaziuddin and the Rohillas have captured Maratha posts in the Doab.*

No. 116] [23-4-1757

श्री

पुरवणी श्रीमंत राजश्री पंतप्रधान यांप्रति

वासुदेव दीक्षित अनेक आसीर्वाद उपरी. येथील क्षेम वेशाख शुध ९ मंदवार जाणऊन स्वकीये लेखन केले पाहिजे विशेष. दिलीकडील वर्तमान नवाब सलाबतजंग यांचा वकील नागरमल याजकडून अठरा दिवसांनी जोडी कासदांची अवरंगाबादेस आली ती त्यांजकडे पुढें गेली, त्याचे वर्तमान वलजी मिर्धा कासदांचा याणे जबानी सांगितलें कीं पठाणाचा लेक खजाना घेऊन जात होता त्यास वाटेमध्यें दिलीपलाकडे शंभरा कोसावर सीनद म्हणोन जागा तेथील आला जाट व नानकपंथी सीख असे एकत्र होऊन बळ बांधोन पठाणाचे लेकास आडवे होऊन मारून घेतला. खजाना अवघा घेतला. मावेरकोट म्हणून जागा लाहोरचे सुभ्याची होती, तेथे गाठी घातली, त्याजला मारिलें, खजाना घेतला, फौज लुटली, हें वर्तमान या पठाणास कळतां हा तिकडे चालिला. तेव्हां सुरजमल जाट फौजबंदी करून पठाणामागें लागला आहे. गाजदीखान दोघा शहाजादियास घेऊन वेगळा होऊन राहिला. या प्रकारचें वर्तमान मिरध्यानें सांगितलें. आपणांस कळावें म्हणून लिहिले असे. बहुत काय लिहिणे हें आशीर्वाद.

¶*News-letter from Vasudeo Dikshit to the Peshwa reporting the defeat and death of the son of the Abdali near Sirhind.*

---

No. 117] [30-4-1757

श्रीकृष्णोजयति

श्रीमंत माहाराज राजश्री पंडितप्रधान बालाजीराव स्वामीचे सेवेसी

शुभचिंतक स्नेहांकित राजा केशवराऊ कृतानेक नमस्कार विनंती उपरी. येथील क्षेम ताा छ ११ माहे साबान मुकाम झांसी जाणून स्वकुशललेखनआज्ञा केली पाहिजे विशेष. काली छ १० साबानी सविस्तर वर्तमानाचें पत्र पाठविले आहे. औरंगाबादेहून चिरंजीव राऊ मुकुंदराऊ सेवेसी रा केलियावरी पावलेच असेल. वरचेवरी लिहावयास अंतर पडत नाहीं. सांप्रती अबदाली पठाण दिलीहून सरहिंद लाहोरचे मार्गे गेला. परंतु जाता जाता जे जे मार्गी हरगात्र कसबे येताती ते मारून कतल करून लुटून जातो. पैका व घोडा व उंट व बईल हती पार सोडीत नाही. गरमीकरितां त्याचे लोक बहुत मरताती व

आजारी होताती व याचे मुलकातही कोण्ही दुंदी झाला म्हणून जातो असे म्हणताती. मागती परतून येणार हेही म्हणताती. व दिलीत नजीबखान जो वजीराचा पूर्वी चाकर होता व सहारनपुरचा मुल्क त्यास दिधला व फौजदारी दिधली त्याने जागिरा लोकाच्या जबत[1] करून सर्व मुलक आपले खाले खाले घेऊन अबदाली येतांच त्यास भेटून त्याजपासून मीरबक्षीगिरी दिलीच्या पातशाहाची करून घेतली. पंधरा वीस हजार त्याजपासी आहे. तो दिलीत आहे. पातशाह त्याजआधीन आहे. पातशाहापासी फौज नाही. नावास मात्र आहे व इकडील मुलकास आबदाली प्रसन होऊन, विजारत खानखानास दिधली होती, ते मागती बाहाल करून दोन्ही पातशाहजादे दिलीचे पातशाहाचे लेक त्याजबा देऊन अंतरवेदाकडे पाठविले होते तो तिकडेच आहे. अहमदखान बंगश फरुखाबादचा त्यास भेटला व अलीमादाचे लेक व हाफीज अहमद त्याजकडे रुजू झाले. सुजाउदौला नाजीम अवध प्रयागहि जवाबस्वाल त्यासी करितो परंतु भेटत नाहीं. त्याचा जाबसाल राऊ मल्हार होलकराकडे आहे. असो. सर्व पठाणास अबदालीची हिमायेत[2] जाली. वजीरहि प्रस्तुत त्यामधेच मिलाला. याजकरिता अंतरवेदीतून ठाणी महाराष्ट्राची लुटली व लुटत जाताती. हे वर्तमान आम्ही वरचावरी श्रीमंत रघुनाथराऊ दादा व मल्हारराऊ यांस वरचावरी लिहितो. त्याचे उतर आम्हास आले की जयेपुराकडील काम करून मग दिलीस जाऊ. पाहावे कधी येताती. रोहिले जयेपुराकडील कामकाज जालियावरी आगरियाकडे येत तरी आगरियाजवल येमुना उतरतील म्हणजे अंतरवेदचा अमल आपला राहील. पाहावे काये करिताती. दिलीकडे गेले तरी नजीबखानाचे पारपत्य जालियावाचून दिलीचे काम काही होणार नाही. सारांश जोवरी अबदाली जोवरी परतून (न) ये तोंवरीच इकडील काम जे होणे ते करावे व हे पठाण रोहिले मोडावे. तो जरी आला व हे व ते येक जालियावरी मग मोठ सामान व मोठी फौज पाहिजे. माहाराजास तेथून आणिखी इतकीच फौज व सरंजाम पाठविलियावाचून मुकाबिला चांगला अबदालीचा घेवणार नाही. पठाण व रोहिले सर्व येक जाले तरी फार श्रम देतील. अगोधरी पारपत्य करावे. आजी झासीत वर्तमान आइकिले व लिहीलीही आली की राहीन (?) नामे पठाण गया प्रांती आहे त्याने गया मारली. असे जालिया वारणासीस उपद्रव संभवित आहे. कोणता मुल्क आहे जेथे पठाण नाहीत ? संपूर्ण दक्षणेपासून गुजरात मालवा व पूर्व संपूर्ण

---

१ जप्त          २ आश्रय, आधार.

पठाणानें भरली आहे! इश्वर न करो याचे राज्य हो. परम हिंदूचे द्वेशी आहेत. लाहोर मुलतान काबूल मुलतान तरी पठाणाचा मुलकच आहे. याचे जमावाबाा तुरानी व इरानी मोगल नाहीत व आमची महाराष्ट्राचीहि सेना नाही. दुसरे ज्या सेनेत जे पठाण आहेत ते आपले पठाणाकडेच जाणावे. त्याजपासून काम होईल हे न जाणावे. याजकरिता याचे पारपत्य सत्वरच केले पाहिजे, हेच सलाह आहे. माहाराज प्रतापी आहेत. सर्व होईल. परंतु आम्ही सुचावणी केलीच पाहिजे व महाराजाहि येकिलीहि पाहिजे हे विनंती.

¶*This is an important letter from Raja Keshav Rao to the Peshwa wherein the writer explains the serious situation in the North and discusses the measures the Peshwa should take to avert the danger. " The Abdali brought about revolutionary changes at Delhi. Najibkhan, the Rohilla chief who invited him to Delhi has been appointed commander-in-chief (Mir Bakshi). Gazi-ud-din has been placated by being reinstated in his former position of Vazir and has been despatched into the Doab to rid the province of the Maratha intruders. Raghoba and Malharrao are lingering uselessly at Jaipur. Only a well-equipped powerful force can cope with the situation."*

---

*No. 118]* *[April 1757*

श्री

सेवेसी विज्ञापना. दिलीकडील वर्तमान सिवराम नाईक भिडे शहरीहून पुण्यांस लिहिलें आलें की पठाणानी दिलीतील अमीर व रयत कुल लुटली. पैका दाहा क्रोडपावेतों घेतला. उतम बायका लोकांच्या व अमिरांच्या वेऊन लाहोरास रवाना केल्या. दिलीहून कूच करून फरिदाबादेवर आले. तेथे कतलाम[1] करून, तेथून कूच करून बालमगडावर आले. जाटांचे गावांस मोर्चे लाविले आहेत. आगरे व मथुरा अगदी पलाली. राजश्री समसेर बहादर व नारो शंकर व जाट व अंताजी माणकेश्वर येकत्र होऊन पठाणावर जाणार. श्रीमंत राजश्री दादासाहेब व मल्हारजी होलकर उदेपुराकडे आहेत. याप्रोा शहरास वर्तमान आलें. आढललें वर्तमान सेवेसी विदित व्हावें म्हणून लिहिलें असे. सेवसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*A letter giving the purport of a news-letter of Shivram Naik Bhide describing the horrid ravages perpetrated by the Pathan armies in the North. The letter also reports a possible counter-attack to be led by Samsher Bahadur, Naro Shankar, the Jats and Antaji Manakeshwar.*

---

१ सर्रास कत्तल.

+
९

सेवेसी विज्ञापना. सारांश गोष्टी मारवाडची मोहीम करून दुसाला चाकरी झाली. माहागाईने बुडालो. देशास येऊन कर्जाचा परिहार करावा तों पातशाहा वजीर अंतरवेदीत निघोन आले. सरदार कोणी नाहीं. यासमई डोईवरी घेऊन पातशाहा वजिरासी सलूख करून चाकरीस त्याच्या जाऊन त्यास माघारे दिलीस नेले. पुढे आबदालीची मोहीम प्राप्त जाली. त्यासमई चुकलो नाही. थोडाबहुत खर्च करार करून त्यास च्यार खेडी लाऊन घेऊन सनदपत्र घेतली. पुढे आमीन पाठवावे तो आबदाली येऊन सर्व विल्हेस लागला. समागमे फौज गणती आकरा साडे आकरा हजार बोली लोकांची जाजती फार त्यास यैवज आंतरवेदीची आमची जागीर इटावे शुकुराबाद फफुद त्याची कमाविसी गोविंद बल्लाळ याजकडे दोन वर्षे आमच्याच पथकास तेथील येवज पावला. येंदा (?) भाद्रपदमासी गोविंदपंत भेटले. पुत्रावरी चिठिया येवजाच्या इजारियाप्रा करून देऊन आपण देशास गेले. त्या चिठीवरी साहुकाराचा पैका घेऊन काम चालविले. तो गोविंदपंताचें पत्र त्याच्या पुत्रास व आम्हास आले की श्रीमंतानी तुम्हाकडील येवज मना करून सरकारात घेतला, तुमचा तालुका वारिला येसी सारी हरामखोरी आम्हावरीच आली. येक वरसात येका रुपयाची नेमणूक नाही. तीन साला मुलुकगिरी मेहनत याप्रकारची. नेमणूक येका रुपयाची नाहीं. वरकड चाकरानी मोठिया चाकरिया आंगेजणीच्या फार करून सरकारात मुलूक मेलऊन घातला. याजमुले त्याजवरी कृपा, त्याची बहुमान व इतबार, त्यास पैकियाची नेमणुक वरचेवरी. आमचे पदरीची चाकरीची कांहीच आगेजणी नाही. मेलविली च्यार खेडी ती स्वामीनी कृपालु होऊन दिल्ही. त्याचे लगाम येकाचे हाती, घोडे येकाचे हाती. तोहि यैवज मना केला तेव्हा आमचे कपाल खोटे. आम्ही उदंड मेहनत केली. उदंड खेडी मेलविली. तऱ्ही आमचे कपाल याचप्रकारे. बाल गोविंद व सेट मिलोन स्वामीच्या नावावरी कर्जे हा काल देतात. त्यांचा निर्गम न जाला तरी आमचा प्राण सावकाराजवल हजीर आहे. आता कृपालु होऊन रा। गोविंद बलाळ यास ताकीद होऊन आमचा जागिरीचा येवज आम्हाकडे देवावा म्हणजे थोडा बहुत भरवसा साहुकारास पुरेल. गोविंद बलाळाकडील येवज न देविला तेव्हा जागीर दूर जालीसी जाली येसीच असेल तरी ल्याहावे. आम्ही देखिली वाट आपली करून मग कर्जदार सरदारी स्वामीची आहे. स्वामी चौकसी करून सर्व करितीलच. सेवेसी.

+ पहिले चार बंद गहाळ.

2322

सेवेसी विज्ञापना. श्रीमंत मातुश्री सगुणाबाई प्रयागास आली. आम्हास मथुरेस यावयाविसी लिहिले; तो हा प्रसंग. आम्ही साफ लिहीले की न येणे, काल्पीवरून जाणे. माझी निसरसांड न करिता माझी अंतरवेदीत जागीर बाहल राखोन पस्ट गोविंद बलालास ताकीद होऊन इजारियाप्रा॥ येवज माझा मजला देविला पाहिजे. म्हणजे जुने फौजची बेगमी होईल. नवी फौजेची सिबंदी भारी जाली तरी त्यांचा ठिकाणा ज्या पातशाहीत बुडालो त्याचे नीट जालियावरी त्याजपासूनच लाऊन घेईन. पूर्वी स्वामीचे वचन होते जे तुम्हास पातशाहाने माहीमरातीब व साहेबनौबत दिल्ही म्हणता त्यास जागीर मेलवणे. ते प्रमाण करून मेलविली. स्वामीनी कृपालु होऊन ते जागीर साहेबनौबत माहीमरातीब व जागीर दिल्ही. त्याजवरी आता बारा हजार फौज परवानगीखेरीज ठेऊन पातशाही लढाईस सामील जालो. तरी याच्याच गला पडून याची जागाही थोडी बहुत करून घेईन. अंगावरी पडणार नाही. परभारे सरदारी वाढऊन, मातबर फौज ठेऊन, मातबर चाकरी करून, फौजेस जागा मेलवावी तीहि सेवकाकडे नसावी याप्रा॥ सेवकाचे कपालाचा इनसाफ जाला तरी सारीच उमेद वारिली. रा॥ मल्हारजीबावा व दताजीबावा आम्हास साहेबप्रा॥ आम्हास परंतु आमच्या प्रतीचे चाकर सेवकाप्रा॥ आणीक करितील आणि परभारे आपले सरदारीस चार खेडी मेलऊन आपले सरदारीचे बोझे खावंदावरी न टाकीत तरी मग काये पाहिजे? माझाच द्वेश सारा मुल्क कां करितो? माझी उमेद सर्वथा न मोडावी. आंतर-वेदीच्या माझ्या माहालाची सनद ताजी मजकडे पाठऊन द्यावी तरी दाहा हजार फौजनसी चाकरी करून तितका येवज मेलऊन घेऊन. मी निराश्रित गरीब चाकर, माझा कोण आहे? माझी आबरू न घ्यावी. नाउमेद मजला नाहक न करावे याची विनंती कोठवरी सेवेसी लिहून? दुसरे या पंधरा दिवसात श्रीमंत व मल्हारबा येतात तरी आबदाली बुडऊन हाच आबदालीचा पैका व दिलीचा पैका श्रीमंतास प्राप्त होतो. जाट सुज्यातदौला सर्व पादाक्रांत होऊन लाहोरचा सुभा दरोबस्त सरकारचा होतो. परंतु पंधरा दिवसात न आले तरी हे सारे बलावले तरी अनर्थ आहे. भारी पडेल. सेवेसी श्रुत होय.

¶*An incomplete letter in which Antaji Manakeshwar protests against the unfair treatment meted out to him in confiscating the revenue of the divisions assigned to him. He further on requests Raghunathrao to ride forth towards Delhi without the least delay to be in time to intercept the Abdali's homeward march.*

2323

No. 120] [11-5-1757

श्री

श्रीमंत राजश्री साहेब

अर्जदास्त अर्जदार बंदेगी बंदेकमीन कमतरीन बंदेगाह खेमा मिरधे रामराम विनंती विज्ञापना. येथील क्षेम तागायत वैशाख वध्य ८ सोम्यवासरे द्वितीय प्रहर साहेबाचे नेकनजरेकरूं खानाजादाच वृत्त येथास्थित असे. विनंती सांप्रत येथील वर्तमान तरी शहरचा व किल्याची सावधानीं तरतूद फार करितात. शहराबाहेर चौ हजारा स्वारानसीं त्रिवर्ग बक्षी पालीप्रमाणे रात्रंदिवस चौकीस उभे राहतात. काली मंगलवारीं प्रहर दिवसा सांगानेरास दारुगोळी सा गाडे भरून पाठविले, तेथे दलेलसिंग राजावत आहेत. तेथील बंदोबस्त फार आहे. येथील मरजी बिघाडाची दिसते. तमाम पटाईत ठाकर सरदार लोक याजला प्रथक प्रथक श्रीजी बोलाऊन त्याची खातरजमा करून बेलभंडार करून घेतात. सेकावतानी येथ कृत्रिमेकरून निशानें पठापटीची सुभेदारजीच्या निशानाप्रमाणे केली आहे. आनेक प्रकारे रांगाडे उपाये करितात. दुसरे दिल्लीकडील वर्तमान तरी गाजुदीखान व शाहाजादा वजीर फरोकाबादेवर दहा पंधरा हजारा फौजेनसी आहे. गाजुदीखानानें आपल्याकडील वकील सुजावतदवले याजकडे पाठविला होता. त्यास त्याजकडील राजबारगीर गोसावी याचा चेला दहा हजार फौजेनसी दाऊगंजावर पडला आहे. त्यानें याजकडील वकील फिरविला. मागाहून सुजावतदवलाहि येणार. नवलगंजावर त्याचा मुक्काम आहे. पुढें सत्वर येणार. त्याचा व गाजुदीखानाचा बिघाड परिछिन्न जाला. कुतुबखान रोहिला लडाईत मेला म्हणून वर्तमान आले. त्याजवरून साहेबाचे शेवेशी लिहिले होत. सांप्रत वर्तमान आले कीं मोड जालियावर जीव घेऊन येमुना उतरून पार पलोन गेला. शेवेशी श्रुत होय. राजेश्री बापूजी महादेव वकील भरथपुरीहून कूच करून दिल्लीस गेले. तेथ पोहचलियाचे वर्तमान आहे. बहुत काय लिहिणे हे अर्जदास्त.

¶*News letter to the Peshwa reporting that the Rajputs of (Jaipur ?) are determined to make a stand against Holkar and are busy preparing for the action. The report further says that a clash is likely to occur between Ghazi-ud-din and Shuja-ud-daula.*

2324

No. 121] [13-5-1757

श्री

श्रीमंत राजश्री साहेब

॥ऽ अर्जदास्त अर्जदार बंदेगी बंदेकमीन कमतरीन बंदेगाह खेमा मिरधे रामराम विनंती विज्ञापना. येथील क्षेम ता। वैशाख वद्य १० भृगुवासर प्राथकाळ साहेबाचे नेकनजरेकरून खानाजादाचे वृत येथास्थित असे. विनंती. सांप्रत येथील वर्तमान तरी शहरचा किल्याचा बंदोबस्त फार करितात. सेकावत काली गुरुवारी बाहेरील डेरे उपडोन शहरात येऊन राहिले. वरक(ड)हि आपले जागा सावधाने तरतूद फार करितात. दिलीकडील वर्तमान तरी गैव्हर[१] शाहजादा दिलीहून छ २० साबानी कूच करून तालकटोरियासी डेरियात दाखल जाला. पुढेहि मजल दरमजल जयेपुराकडे येणार म्हणून वर्तमान तथ्य आहे. येथील मरजी परिछिन लढाई करावयाची आहे. साहेबाचे सेवेसी श्रुत होय. काली गुरुवारी राजे दरसाये मुसाहेब अवगड वगैरे किल्याचा बंदोबस्त करावयासी गेले होते. कळावे बहुत काय लिहिणे अर्जदास्त[२].

¶*It is not clear to whom the letter is addressed. Ali Gohar is reported to have marched out of Delhi and to be going towards Jaipur.*

---

No. 122] [28-5-1757

श्रीगजानन

श्रीमंत राजश्री बापूसाहेब
स्वामीचे सेवेसी

सेवक राघो लक्ष्मण कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती. येथील कुशल तागाईत छ ९ रमजान मुकाम दर लष्कर नवाब सुज्यायेतदौले स्वामीच्या कृपावलोकनेकरून येथास्थित असें. स्वानंदलेखन करावयास आज्ञा केली पाहिजे विशेष. येथील वर्तमान तपशीलवार श्रीमंतांचें पत्रीं लिहिलें आहे त्याजवरून श्रुत होईल. सांप्रत त्रिंबकदासाची छ २३ साबानची अर्जी नवाबास आली कीं राजश्री बापूसाहेब व राजश्री तात्या पंचवीस हजार फौज घेऊन अंतरवेदींत येतात, याजवरून नवाब बहुत संतोष जाले कीं माझे कुमकेस आले. नवाब सर्वस्वे स्वामीचा म्हणवितो, दुसरी गोष्ट कांहीं जाणत नाहीं. नवाबांनीं आपलें पत्र खलिता श्रीमंतास दिल्हा आहे तोहि सेवेसी पाठविला असें. शफतप्रमाणचा मजकूर

---

१ अलीगौहर ? २ बातमीपत्र औरंगाबादचें.

सर्व श्रीमंतांचे पत्रीं लिहिला असें. जैशी आज्ञा येईल त्याप्रमाणें वर्तणूक करून कदाचित स्वामीचें आगमन सत्वर या प्रांतें होतें तर बहुतच उत्तमच आहे. नवाब तर दो चौ रोजा मेंदीघाटावर दाखल होतात. नवाबाजवळ फौज सांप्रत हजार दाहा आहे, व जागां जागां आयोध्यां वगैरेस फौज दाहा हजार आहे. तोफखाना हजार बाराशें जरब लहान थोर आहे; परंतु समागमें तूर्त दोनशें जरब लहान मोठी आहे; आणिक तोफखाना आणविला आहे तो येईल तेव्हां खरा. सख्य स्वामीशीं करावें हा त्याचा पूर्ण मनोदय आहे. आपण या प्रांतांत सत्वर येतात तर बहुत उत्तम आहे. पठाणावर शह मातवर पडतो, नवाबहि मार्गप्रतीक्षा करीतच आहे. बहुत काय लिहिणें सेवेसी श्रुत होय हें विज्ञापना.

¶*Ragho Laxman to Sakharam Bapu to say that Shuja welcomes the timely assistance of the Marathas in his encounter with the Rohillas.*

---

*No. 123*] [*28-5-1757*

**श्रीगजानन**

**श्रीमंत राजश्री दादासाहेब स्वामीचे सेवेसी**

विनंती सेवक राघो लक्ष्मण कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती विज्ञापना ऐसी-जें. सेवकाचें वर्तमान तागाईत छ ९ रमजान मुकाम अकबरपूर प्रांत लखनऊ स्वामीच्या कृपावलोकनेंकरून येथास्थित असें विशेष. नवाब सुज्यायेतदौले त्याची भेट वैशाख वद्य ९ नवमीस घेतली. स्वामीचें पत्र नवाबांस प्रविष्ट केलें. आज्ञेप्रमाणें जबानी वर्तमान निवेदन केलें. त्यास नवाब सर्व प्रकारें सलुखांत आहे. स्वामीच्या भेटीची व स्नेहाची फारशी इच्छा करितात, त्यांचा मनोदय कीं सरदारांसी स्नेह वडिलापासून आहे तोच स्नेह राउजीसी आहे; परंतु नवीन रावजींसी स्नेह व्हावा आणि शफतप्रमाण जालें म्हणजे खातरजमा जाली. कोणे गोष्टीचा मल राणार नाहीं. दोन च्यार वेळ बोलिलें कीं तुम्हांसमागमें बेलभंडार पाठविला असेल तर आम्हांस देणें. आम्ही आपली नानरोटी रावजीस देतों ते यांजला प्रविष्ट करणें. त्यास आम्ही व खूबचंद बोलिलों कीं आम्हास खावदाची आज्ञा आहे कीं जें गोष्टींत नवाबाची खातरजमा होय तें तुम्ही करणें. आम्ही ये गोष्टीस हजरच आहोंत, परंतु श्रीमंतांची व तुमची भेट सत्वरींच होईल. रुबुरुच हे गोष्ट जाली तर बहुत उत्तम. आम्हास शफतप्रमाण करणें म्हणोन आज्ञा नव्हती याजकरितां टाळाटाळ केली. नवाबाचा मनोदय तर फारसा आहे. स्वामीची आज्ञा आली पाहिजे म्हणोन थेणेंप्रमाणें ठहराव केला असें. नवाबांनीं आपलें पत्र खलिता स्वामीस दिल्हा आहे तो सेवेसी पाठविला असे,

प्रविष्ट होईल. त्यांत अलाहिदी चिठ्ठी आहे. त्यांत आमचे जबानीवर लिहिलें असें त्याचा मजकूर हाच कीं भेटीअंतीं शफतप्रमाण कराल तर उत्तम; अथवा भेटीपूर्वींच वकिलाकडून कराल तर उत्तम. यावर स्वामीची आज्ञा जैशी येईल तेणेंप्रमाणें वर्तणूक करून. येविषयीं पूर्वपत्रीं विनंती लिहिली आहे. जैशी आज्ञा येईल तैशी वर्तणूक करून. शेवेसी श्रुत होय हें विज्ञापना.

¶*Ragho Laxman reports to Raghoba his conversations with Shuja-ud-daula.*

---

*No. 124]* *[25-8-1757*

पो छ ३० जिल्हेज

**श्रीमंत राजश्री दादासाहेब स्वामीचे सेवेसी**

विनंती. सेवक गोपाळराव गणेश कृतानेक सां नमस्कार विनंती. येथील कुशल ताा छ ९ माहे जिल्हेज स्वामीचे कृपादृि(ष्टी) करून मुकाम जाजमऊ यथास्थित असो विज्ञापना. स्वामीचे आज्ञापत्र आजुरदार कासीदजोडीसमागमें रेवाडी नजीकचे मुकामीहून आले ते पावले. लिहिले वर्तमान कळो आले. पत्री आज्ञा कीं नवाब सुजातडौलास प्रस्तुत घेऊन न येणे. जाबसालाखाली गोंवणे. तो दिलीवरी आल्यानंतर आज्ञा करू त्याप्रमाणें करणे. त्यास आम्ही पूर्वी च्यार दिवस जाले, जोडी सेवेसी पाठविली आहे, त्याजसमागमें वर्तमान लिहिले आहे. नवाब सुजातडौला आम्ही लखनऊस गेलियानंतर आपल्याकडे यावयासी सिधच जाला असे. पुढे अलीबेगखान याणे यावे. मागाहून मारनिलेने यावे, हा विचार ठराऊन आम्ही पुढे आलो. अलीबेगखान लखनऊहून कूच करून मोहनेस आला आहे. दो चव रोजानी जाजमऊस गंगा उतराव(या)सी येईल. तदोतर त्याजलाहि सांगणे ते सांगोन नवाबास लेहूं. विचारें करून राहिला तरी उत्तमच आहे. कदाचित आलाच तरी त्याजला घेऊन येऊं. प्राा सिंगरार राजश्री सखारामपंत बापूनीं आम्हास सांगितलें त्याप्रमाणें नवाबाजवळ सनद करून घेतली. एक निशानी खोजे तमकीनखानाची होणे राहिली आहे. त्याचा हात घोड्यावरून पडला यास्तव मोडला होता. ते सनद मागाहून येईल; आणि प्राामजकूरचा बंदोबस्त करून श्रीक्षेत्रचा मजकूर केला; परंतु प्रस्तुत स्थळ हस्तगत होत नाही. स्वामीची व नवाबाची भेटी जालियावरी भिडेने होऊन येईल अथवा जोरानें होईल. आम्ही प्रस्तुत जाजमऊस असो. मागें गर्दीमुळें नव्या दाहावीस गढ्या बद(ल)ल्या होत्या त्याचे पारपत्य करणे जरूर असे. एक मास लागेल. दसरा येथे करून पतकसुधा सेवेसी येतो. रसदीच्या ऐवजाविसी आज्ञा केली त्यास ते तजविजींत असो. सालगुदस्ताचे आफतीमुळें

2327

सरकारात फाजील आसे. त्यासिवाय राजश्री अंताजी माणकेश्वर यांजला लक्ष रुपये दिल्हे आहेत तेहि सालमजकुरी पडतील. पथकास नालबंदी द्यावयाची आहे तेहि जिकडे आज्ञा होईल तिकडे घेतली जाईल. स्वामीस हिशेबच लिहिला तरी रागास येतील यास्तव भरणियाची तजवीज करून हुंडी पाठवितों; आणि मीहि सेवेसी मागाहून सत्वरीच येतो. बुंदेलखंडांत आमानसिंग व हिंदुपत उभयेता भावासी कटाक्ष मागेच जाला. त्यास आमानसिंग कामास आला. हिंदुपत राज्य करितो. अमानसिंगाचा दुसरा भाऊ खेतसिंग तिसरा भाऊ होता, मारनिले जिवंत असतां त्यास राज्य दिले होते. त्याणे आम्हाकडे वकील पाठविला की तुम्ही फौज सुधा येऊन आमची मदत करून आम्हास राजी बसवणे आणि मुलूक निमे तुम्ही सरकारात घेणे, निमे आम्हास देणे. त्यास हे कार्य केलियानें मुलूख हस्तगत होतो. आज्ञा जालियानंतर हे कार्य करून. दीड हजार फौज आम्हाजवळ आहे. तेथून दोन हजार फौज येईल तरी उत्तम आहे. नाही तरी आम्हास आज्ञा करावी. फौज ठेऊन कार्यभाग करून सेवसी येऊं. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना+.

¶*Gopal Ganesh Barve communicates to Raghunathrao that Shuja refuses to part with the holy places. He also refers to the succession affair in Bundelkhand where Khetsing is seeking Maratha help to secure for himself his father's kingdom.*

---

*No. 125*] [*3-6-1757*

पौ छ १९ रमजान

## श्रीशंकर

**श्रीमंत राजश्री बापू स्वामीचे**
**शेवेसीं**

सेवक धोंडो दत्तात्रय कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती. येथील क्षेम ताा छ १९ माहे रमजान मुकाम मेणपुरी प्रांत अंतरवेद स्वामीचे कृपादृष्टीकरून जाणून स्वकीये कुशललेखन करावया आज्ञा केली पाहिजे विशेष. स्वामीनी पत्र पाठविले ते पावोन लिहिले वर्तमान कळले. या प्रांतीचे वर्तमान तरी गाजदीखान व पठाण सर्व फर्काबादेस आहेत. आपण लिहिले की आगऱ्याचे रोखें यावे. त्यास स्वामीची स्वारी यमुना उतरलियावर आम्हीं येऊन दाखल होऊ. इकडील

---

\+ गोपाळराव गणेश बर्वे, दादासाहेबाचा मेहुणा व सरदार याचें पत्र.

सविस्तर वर्तमान राजश्री बाळाजी गोविंद यांणी लिहिले आहे त्याजवरून सेवेसी विदित होईल. भेट होईल तो सुदिन आहे. बहुत काये लिहिणे कृपा लोभ करीत असिले पाहिजें हे विनंती.

¶*Dhondo Dattatraya communicates to Sakharam Bapu the whereabouts of Ghazi-ud-din and the Rohillas and promises to join the addressee after he crosses the Jumna.*

---

*No. 126*] [*9-6-1757*

**श्रीगजानन**

**श्रीमंत राजश्री दादासाहेब स्वामीचे सेवेसी**

विनंती सेवक रावो लक्ष्मण कृतानेक साष्टांत नमस्कार विनंती विज्ञापना ऐसीजें. येथील सेवकाचें वर्तमान तागाईत छ २१ माहे रमजानपावेतों स्वामीच्या कृपावलोकनेंकरून यथास्थित असें विशेष. स्वामीनी कृपा करून आज्ञापत्र पाठविलें तें मस्तकीं वंदिलें. पत्रीं आज्ञा केली कीं अंतरवेदींत पठाण व गाजुदिखान मिळून यांनीं अमलांत खलेल केलें. सबब राजश्री सखारामपंत बापू व राजश्री विठल शिवदेव व राजश्री अंताजी माणकेश्वर व राजश्री गंगाधर येशवंत पंचवीस हजार फौज देऊन पाठविले असेत हे बंदोबस्त करितील, व नवाब सुज्यायेतदौले बहादर यांनींही सामील व्हावें, भेटी व्हाव्या, कितेक कार्यें कर्तव्यें आहेत ते करावींत. ये विषयीं नवाबासहि पत्र स्वामीचें आलें तें नवाबास प्रविष्ट केलें. त्याचें उत्तर खलिता पत्र सेवेसी पाठविला असें; प्रविष्ट होईल. येथील वर्तमान तर नवाब गाजुदीखान व शहाजादे गंभीर नदीवर कुल रोहले पठाण जमा करून आहेत, व नवाब सुज्यायेतदौले गरा नदीवर कसबे सांडी येथें आहेत. यांची त्यांची तफावत आठा कोसाची आहे. युद्धाचा प्रसंग आहे. सांप्रतकालें सादुल्लाखान व दुंदेखान रोहले यांनीं नवाब सुज्यायेतदौले यांजकडे सलुखाचा पैगाम करून नवाबाचा साला सालारजंग याजला घेऊन गेले आहेत. रोज तीन जाले. सलूख कोणें प्रकारें होतो हें अद्याप कळत नाहीं. आम्हांस तर म्हणतात कीं तुमच्या फौजा येत तोंपावेतो आम्ही कालवंचना करितो. अंतरयामी सख्य करीत असतील तर न कळें. परंतु सलुखावर घातलें आहे. पाहावें काय होईल. गाजुदीखान बहुत प्रपंची आहे. आपल्या फौजा पेरोजाबादेसी कुहाबाद येथें आल्या म्हणोन ऐकतों. राजश्री बापूकडेहि पत्रें पाठविली आहेत. जर गाजुदीखानाचें पारपत्य करणें आहे तर तूर्त नवाबावर उपकार ठेऊन याजला सामील करून शत्रूचें पारपत्य करावें. नवाब गोष्टी तर बहुत सख्यतेच्या सांगतात. गाजुदीखानाशीं सख्य व्हावें ऐसें नाहीं. परंतु शाहाजाद्याच्या निमित्येंकरून सख्य होईल तर न कळें. यांचा विश्वासहि नाहीं.

सुज्यायेतदौले याजपाशीं फौज हजार पंधरा सोळा जमा जाली. तोफखाना जरब तीन च्यारशें आहे. गाजुदीखानाजवळहि फौज बारा चौदा हजार आहे. याउपरी वर्तमान होईल तें शेवेसी लिहून पाठवीन. श्रुत होय हें विज्ञापना.

*¶Ragho Laxman reports the movements of Ghazi-ud-din and Shuja to Raghoba. He warns the addressee against relying too much on Shuja's alliance.*

---

*No. 127]* *[9-6-1757*

पोा छ १ शौवल

**श्रीगजानन**

**श्रीमंत राजश्री बापूसाहेब स्वामीचे सेवेसी**

सेवक राघो लक्ष्मण कृतानेक सां नमस्कार विनंती. येथील कुशल ताा छ २१ रमैजान स्वामीच्या कृपावलोकनेंकरून येथास्थित असे विशेष. येथील वर्तमान नवाब सुज्यायेतदौले बहादर याजपासी फौज हजार पंधरा सोळा जमा जाली. तोफखाना जरब तीनसें च्यारसें आहे. गरानदीवर काा सांडी येथें मुकाम करून आहेत व गाजुदीखान व शाहाजादें गंभीर नदीवर रोहले पठाण फौज हजार बारा चौदा जमा करून आहेत. तोफखानाहि से पनास जरब आहे. याचा त्यांचा हर्षामर्ष आहे. श्रीमंत राजश्री दादासाहेबाचें पत्र नवाबास आलें होतें कीं अंतरवेदींत पठाण गाजुदीखान यानीं अमलांत खलल केलें. सबब राजश्री सखारामपंत बापू व राजश्री गंगाधरपंत व राजश्री विठल सिवदेऊ व राजश्री अंताजी माणकेश्वर यांजला पंचेवीस हजार फौज देऊन पाठविलें असे, हे बंदोबस्त करीतील. तुम्हींहि सामील व्हावें. शत्रूचें पारपत्य करून पुढें जे जे कार्य कर्तव्य आहेत ते करावी, भेटी व्हाव्या, यैसें पत्र नवाबास लिाा होते व येणेंप्राा आम्हांसहि आज्ञापत्र होतें. त्यास नवाबानी(हि) श्रीमंतास उतर लिाा कीं मजला तूर्त पार उतरावयाची फुरसत नाहीं. तूर्त लढाई रुबेकार[1] आहे. आणि नवाबानी स्वामीसहि पत्र लिहिविलें आहे कीं तुम्ही सत्वर अम्हांस सामील व्हावें. शत्रूचे पारपत्य करून गंगा उतरावयासी मेंदीवाटास यांवे. येथे नावा तयार आहेत. परंतु पत्र तयार जाले नाहीं. दरबार बहुत सुस्त. कोणे गोष्टीचा बंदोबस्त उतम दिसोन येत नाहीं. गाजुदीखानाचा व याचा तफावत आठा कोसाचा आहे. दुसरें सादुलाखान व

---

१ सन्मुख, जवळ ठेपलेली.

दुदेखान रोहेले यानीं नवाबाकडे सलुखाचा पैगाम करून नवाबाचा शालक सालारजंग याजला आपल्यापासीं घेऊन गेले आहेत. काल हफ्ज रहमत रोहला याची व सालारजंगाची भेट होणार होती. पाहावे सळूख कैसा होतो. नवाब तर बोलतात कीं मजला गाजुदीखानांसी सळूख करणें नाहीं. तुमच्या फौजा येतात तोंपावेतों कालवंचना करितों. आणि आंतरयामी सल्लख करतील तर न कळे. तूर्त सलुखावर घातले आसे. याचा विश्वासहि पुरत नाहीं. गाजुदीखान प्रपंची आहे. युक्ति प्रयुक्तीस चुकणार नाहीं. जर त्याचें पारपत्य करणे जरूरच आहे तर कनोजेपावेतों स्वामीनी यांवे. याजलाही पुरतें कलेल. हे आले म्हणजे सलूख याचा होतो न होतो कलल. शत्रूचें पारपत्य करणें तर तूर्त याजवरच उपकार ठेवावा कीं आम्ही तुम्हाकर्ता जलद आलो. याजला सामील करून शत्रूचें पारपत्य (अपूर्ण).

¶*In the absence of a large Maratha force in the North, the Vazir with the Rohillas as his allies recaptured the Maratha outposts in the Doab and rendered Maratha rule null and void. In 1757 Raghunathrao went north at the head of a powerful army and the first thing he had to attend was the re-establishment of the Maratha posts. Vithal Sivdeo and Sakharam Bapu therefore crossed into the Doab and Shuja, the Nawab of Oudh, was requested to join forces in the campaign against the Vazir. Shuja, the reporter writes, being himself threatened by the Rohillas is prevented from coming to the assistance of Vithal Sivdeo. He is however prepared to refuse an understanding with the Vazir and hold on stubbornly, provided the Maratha force detached under Vithal Sivdeo arrives in time.*

---

*No. 128]* *[9-6-1757?*

**श्री**

**श्रीमंत राजश्री दादासाहेब स्वामीचे शेवेसी**

विनंती सेवक राघो लक्ष्मण कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना ऐसीजे. ताजा कलम: छ ९ रमजानीं नवाब गाजुदिखानाकडून वकील जसवंतराऊ कायेस्थ नवाब सुज्यायेतदौले याजकडे आला. रात्रौ मुलाजमत जाली. दोन च्यार घटका खलबत जालें, व हफ्जरहमत रोहले याजकडूनहि वकील आला आहे. सल्लख करून येकत्र व्हावें हा मनोदय गाजुदिखानाचा आहे. रोहलेहि याच पैगामांत आहेत. पाहावें होतां काय होईल. आम्हांशी नवाब बोलिले, मजला

गाजुदिखानासी सलूख करणें नाहीं. याहिवर न कळे. नवाबाचे घरीं कारभारी माणूस मातबर येख्तियारी कोण्ही नाहीं, जें करणें तें आपणच करावें; आणि आपण तर विषयासक्त! दरबार बहुतकरून करीतच नाहींत. जाबसाल लोकांचा उगवत नाहीं. फौज दाहा हजार आहे, परंतु आराम तलबी तोफखाना आहे. दोनशें तीनशे जरब लाहाण मोठी आहे, परंतु लोकांचा दुमाहा चौमाहा चढला आहे. पैसा त्याजला मिळत नाहीं. कदाचित लढाईचा प्रसंग जाला तर लोक खामखा झुंझतीलसें दिसत नाहीं, व गाजुदीखानापाशीं फौज मातबर नाहीं, की यांसी प्रसंग करावा. त्याजला बळ पठाण व रोहिल्याचें आहे. त्यांनीं चित्तावर धरिलें तर यांजला भारी आहे. याजकरितां शशपंज[1] नवाब आहे. जातीनें मात्र शिपाई बेश परंतु वर्तमान ये रीतीचे आहे. स्वामीची स्वारी या प्रांतें जालिया उभयतांस दबाव आहे. त्यांत सुज्यायेतदौला तर सख्यत्वाविशी इछितो, व आफजरहमत रोहला नवाब गाजुदिखानास भेटावयास गेला म्हणोन वर्तमान आहे; व सुज्यायेतदौलाच्या मुलकांत जमीदारा बहुत भारी, अद्यापि लढाईचा प्रसंग नाहीं तोंच जागांजागांचे आमील उठऊन दिल्हे. मुलकाचा बंदोबस्त यथास्थित नाहीं. सेवेसी श्रुत होय हें विज्ञापना.

*¶Ragho Laxman reports that Shuja is holding negotiations with the Vazir, while assuring the writer of his friendship for the Marathas. The writer further adds, "Shuja is licentious in his habits and will be useless as an ally."*

---

*No. 129]* *[13-6-1757*

पौा छ २ शौवाल

**श्री**

**श्रीमंत राजश्री बापू स्वामीजीचे सेवेसी**

सेवक नारो केशव कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती विज्ञापना. येथील कुशल ताा छ २९ रमजानपरियेंत मुकाम आवले आपले कृपेकडून सुखरूप जाणून स्वकीयानंदलेखनाज्ञा केली पाा विशष. सांभालपत्रें पाठविलीं ती उतम समई पाऊन परम आनंद जाहला. यानंतर इकडील हलचे वर्तमान तर वजीर शाहाजादे बमें फौज रोहिले मोतुल(?) फरकाबादेवर आहेत. सुज्यातदवला कूच करून बिलगराऊ म्हणून गाव आहेत तेथे आला. पुढे हरोलीस गोसांवियासी रुकसत केले. गोसावी याची फौज साठीपालीवर आहे. याचे फौजेस व गोसावी-

---

१ संकट.

यासी पाचा कोसाचा तफावत आहेत. रोहिल्यांची कही गेली होती. तिने काही ठानवेली(?) केली. त्याजवरून गोसावियाचे फौजेसी याचे कहीची काही जगझड. मागती याची कही मुरडोन आपले फौजेत आली. गोसांवी याची फौज आपले जागा कायेम राहिली. त्याजवरून सुज्यातदवलाकडून येक भला माणूस जाबसालानिमित्य आला आहे. जाबसाल होऊन भेटी होणार येसा मनसुबा आहे. पुढे काय होईल ते पाहावे. परंतु सारांश हेच की रोहिल्यानी आपालियासी करारात आंतर केले. येवज वगैरे कितेक प्रोा सालसी न राखिली. त्यास येवज घेणे तो काये? परंतु याचे सर्व प्रकारे सिष्टकृत्य करून करोडोची मामलत सोडविलियाने आपणहि स्वार होऊन हाफिजीकडेस गेलो. तेथील जे वर्तमान होईल ते सेवेसी लिहीत जाऊं. बहुत काय लिहिणे? कृपा निरंतर असो दीजे हे विनंती.

¶*Naro Keshav reports the movements of the Vazir and Shuja-ud-daula.*

---

*No. 130*] *[19-6-1757*

पो. छ ३ शौवाल

## श्रीगजानन

### श्रीमंत राजश्री दादा स्वामीचे सेवेसी

विनंती. शेवक राघो लक्ष्मण कृतानेक सां नमस्कार विनंती. येथील शेवकाचें वर्तमान ताा छ १ शवाल मुाा काा सांडी दरलस्कर नवाब सुज्यायेतदौले बाहादर माहाराजांच्या कृपावलोकनेकरून येथास्थित असे विशेष. येथील वर्तमान नवाब मुकाम मजकुरीं मुकाम करून आहेत व शाहाजादे नवाब गाज़ुदीखान व रोहेले व अहमदखान पठाण गंभीर नदीवर येथून आठ दाहा कोसावर मुकाम करून आहेत. लढाई दरपेश[१] होत. परंतु आज आठ नव रोज जाले कीं सादुलाखांन रोहेले व दुंदेखान यानी नवाबाकडे सलुखाचा पैगाम करून नवाबाचा साला सालारजंग याजला घेऊन गेले. सालारजंग रोहल्याच्या लस्करांत पांच रोज होते. सलुखाच्या गोष्टी परस्परें जाल्या. परंतु सिध्धांत ठहरत नाहीं. सांप्रत सालारजंग व सादुलाखानाकडील दिवाण मोहानारायण व हाजी आहमद पीरजादा यैसे आले ते येथेंच आहेत. रदबदल करीतच आहेत. गाज़ुदीखानाच्या चितांत कीं दाहा वीस लक्ष रुपये घेऊन याजला समागमें द्यावें. हे गोष्ट यांजला अनुकूल पडत नाहीं. हे म्हणतात कीं गाज़ुदी-

---

१ जवळ ठेपलेली.

खानांसी तर मी सलूख करीत नाही. शाहाजाद्यानी येथें यावें. मजला कलेल तैसा मी आदब बज्यावीन. प्रगट तर येणेंप्राा बोलतात. अंतस्थ कांही रदबदल असेल तर न कले. दुसरें सादुलाखान व दुंदेखान रोहेले व सरदारखान यांसी व नवाब सुज्यायेतदौले यांसी पगडीबदल भाईचारा जाला, शफत प्रमाण जालें कीं जर सलूख जाला तर आम्हीं गाजुदीखानापासीं आहोंत, नाहीं तर आम्हीं उभयेतांसही सामील होणार नाहीत. याउपर न कले काये करतील. हफज रहमत रोहेले याजवळ जमाव फौज भारी आहे. तोही सलूख मानीत नाहीं. फौज गाजुदीखानाकडे रोहेले पठाण सुधां स्वारप्यादा हजार तीस चालीस आहे व नवाब सुज्यायेतदौलापासी स्वार प्यादा हजार पंचवीस आहे व तोफखाना जर(ब) लाहाण मोठी सातसें आठसें येणेंप्राा असे व (अपूर्ण)

¶*Ragho Laxman writes to Raghunathrao news from the camp of Shuja-ud-daula. It seems that the Vazir Ghazi-ud-din with the Rohillas as his allies led an expedition against Shuja-ud-daula. After some stray fighting the Rohilla chiefs tried to patch up an understanding between the two but Shuja is holding out.*

---

*No. 131]* *[20-6-1757*

पो छ ४ शौवाल

**श्री**

**श्रीमंत राजश्री सखारामपंत बापू स्वामीचे सेवेसी**

पोष्य त्रिबकराव सिवदेव कृतानेक नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल ताा छ २ माहे शौवाल मुाा भोईगाव येथास्थित जाणोन स्वकीय कुशललेखनाज्ञा केली पाहिजे विशेष. आपण पत्र पाठविले ते पावोन लिहिले वृत अवगत जाहाले. यानंतर या प्रांतीचे वर्तमान पठाणाचे दंग्यामुलें फरकाबादवाला पठाण व गाजुदीखान याणी बहुतेक ठाणी घेतली होती ते आपले आगमनाचा उत्कर्ष पाहून ठाणी तों सोडिली. तेथे सरकारची ठाणी बसली. बाकी किरकोली कांहीं ठाणी जमीदाराकडे राहिली आहेत व मामलतहि थोडीबहुत चुकणे आहे तेहि आपले प्रतापेकरून कार्य सत्वरच उरकून येईल. गाजुदीखान व सुज्यातदौला यांचे (ज़ुंज) लागले आहे. त्यास यास पाचा कोसाचे आंतर आहे. यैशास आपले फौजेसुधा आगमन जाहाले असतां फरकाबादवाले व गाजुदीखानाचे पारपत्य होऊन येश आपणास येतच आहे. वरकड आमचे खासगत वर्तमान राजश्री शंकराजीपंत सेवेसी आलेच आहेत, सर्व कचेंपकें वृत सांयंत आपणास निवेदन करितील

त्यावरून सविस्तर आपणास विदित होईल. येंदा लोकावर मेहनत भारी पडली असतां नालबंदी समजाविसी व रवानगी यास अद्यापि ठिकाण नाही. त्यामुले लोक बहुत हैरान करितात तो आर्थ पत्रीं कोठवर ल्याहावा? बरें ये गोष्टीची कालजी आपणासच आहे. शंकराजीपंत सेवेसी विनंती करितील ते मान्य करून साहित्य करणे आपलेंच हाती आहे. येविसीचा भरवसा आपला धरला आहे. आपण फरकाबादेच्यासुमारें आल्यानंतर आम्हासहि आज्ञा होईल तरी दर्शनास येऊं. समक्ष काही चाकरी घडोन आल्यास उतम आहे. बहुत काये लिहिणे कृपा केली पाहिजे हे विनंती.

¶"*On getting news of your advance upon Delhi," writes Trimbak Sivdeo to Sakharam Bapu, "the Rohillas evacuated our posts in the Doab. They now threaten Shuja-ud-daula."*

---

*No. 132*] [*25-6-1757*

## श्रीशंकर

**श्रीमंत राजश्री नाना**

**स्वामीचे सेवेसी**

पोष्य त्रिंबक मुकुंद साष्टांग नमस्कार विनंती उपरी. येथील क्षेम तागायत आशाढ सुध ८ शेनवार संध्याकालपावेतों मुकाम लस्कर नवाब वजिरासनिध नजीक फेरोखाबाद श्रीगंगातीरीं आसों. स्वामीची आज्ञे घेऊन स्वार जालो ते दरकूच वजिरापासी दाखल जालो. येताच लडाई महकूब केली. वजिरानी आपल्या व श्रीमंताच्या लिहिल्याप्रमाणें कूच तेच क्षेनी केले. सुजायेतदौलानी मामलाहि केला होता. तेहि यानी घेतला नाहीं. सर्व आपल्यावर व श्रीमंतावर टाकले. हें वर्तमान सर्व तपसीलवार गुरुवारीं दो प्रहरां पत्रें स्वामीकडे रवाना केलीं आहेत. श्रीमंत राजश्री बापूनी व तात्यानी आपण आज्ञा केली होती. लाख गोष्टीची गोष्ट केली. लडाई होणें न पावे. आज्ञेप्रमाणें लडाई राहविली. सुजायेतडौला तुमचे पाडाव आहे. फौज भारी याची फार होती. शाहाजादे वजीर व आहमदखान पठाण व रोहिले यैसे व जगहजखान यैसे फौज तीस चालीस हजार जमा जाली होती. त्याचें पारपत्य करते परंतु मर्जी श्रीमंताची, सबब राहिले. वजिरानी व शाहजादे व अहमदखान व सर्व रोहिले म्हणाले कीं आम्हीं फजित जालों. करोड रुपयांची मामलत राहिली. आम्ही जाब दिधला कीं सर्व श्रीमंताची भेटी जालिया सर्व तुमचे मुदे कबूल करितों. चिंता नाही. वजिरानीं श्रीमंताचा आपला हुकूम कोन्ही चाकर न मानी यैसा माणून कूच केलें. स्वामीसिवाय दुसरें जाणत नाहीं.

याचा इस्तार पहिले लिहिलाच आहे. मुख लढाई टाळून दि * ली. दुसरे गजहजखान कूच करून गेला होता. परंतु मागती त्यानें भले माणूस दरमीन घातले आहे. तो भितो कीं मी कैसा पार पडेन ? मऱ्हाटे वाटेस लुटतील हें वर्तमान त्यास आहे. वजिराचे वचनावर आम्ही लिहिलें आहे. येथें घडीघडीचें वर्तमान जैसे आहे काये तें सेवेसीं ल्याहावें. रागास न यावें. खबरदारी कामाची आहे. जें जें वजिरानीं सांगितलें तें सेवेसीं लिहिलें. वजीर बहुत स्वामीसी येकनिस्ट आहे. आपण श्रीमंत राजश्री बापूस व तात्या स्वामीस सांगणें जे श्रीमंत तात्यांनीं मजला सांगितलें त्याप्रमाणे म्या चाकरी केली. श्रीमंत राजश्री गंगाधरपंत तात्यासी माझे बाबे विनंती करणें कीं आम्ही काही दुसरे जाणत नाहीं. चाकरी मात्र जाणतो. येतेवेळेस मजला श्रीमंत राजश्री तात्यानी सांगितले होते की, खबरदार, लढाई होऊ न देणे. तेप्रमाणे वर्तन त्याचे केले. लढाई वाचविली. आजी शेनवारी शाहाजादे वजीर गंगा उतरोन फरोखाबादेस गेले. आम्ही पारच आहे. लस्कर उतरून देऊ तेव्हा आम्ही उतरोन येऊन. जगहजखानाचे बातमीत राहावे. त्यानेहि आवाई खाली आहे. आपणास जैसे सुचेल तैस त्याचे पारपत्य जाले तर बरच आहे. नाही, दुरोन पळोन गेलाच तर इलाज नाही. मुख नजीबखानाचे पारपत्याकारणे वजीरहि आपणासी येतात. नबाव अहमद न येतात. आम्हास वजीर घडीघडी सला पुसतात. जैसे सुचते तेणेप्रमाने उतर निरोतर करितो. येथे दलेलसिंग राजे नागरमलाकडील ग्रहस्त मातबर वजिरापासी तेच आहेत. आम्ही सर्वासी मिळोन आहो. जोवर येकवेळ वजिराची तुमची श्रीमंताची भेटी जाली म्हणजे लक्ष काम जाले. हे काम मोठे आहे. श्रीमंत राजश्री बापूची व श्रीमंत राजश्री तात्या मर्जी नाजूक आहे. आपण त्याची निशा करावी कीं तो माझा चाकर की तुमचा चाकर. दुसरे चितात न आणा. सर्व यश श्रीमंता व तुम्हासी येईल. फौजा वजिराची व अहमदखान व शाहजादे आले तर ते चांगलीच आहे. राजे नागरमलाकडून दलेलसिंगास ल्याहावे की त्रिंबकपंत श्रीमंतानी व राजे अंताजीपंती पाठविले आहे. दुसरे चितात न आणावे. बहुत काय लिहावे हे विनंती. चिरंजीव राजश्री तात्याबास व दाजीबास आशीर्वाद.

¶*Trimbak Mukund explains how he averted an encounter between the Pathans and the Rohillas. He also writes about the awe that the Marathas had inspired in the hearts of the enemy.*

2336

No. 133] [25-6-1757

श्री

विनंती उपरी. राजे नागरमलाची डांक बसली आहे. तेथें कागद द्यावा म्हणजे आम्हांस पावेल. दो रोजांत डांकेचा जाब येथें येतो. डांके बराबर पत्राचें उत्तर पाठवीत जावें. सुजायेतदौलाकडे राजश्री जिवाजीपंतास पाठवावें तर सरदाराची पत्र श्रीमंत राजश्री सुभेदाराचें पत्र श्रीमंत राजश्री तात्यापासून घेऊन पाठवावें. कांहीं याद बाबत पैका आला तर सरकारचें काम होईल. श्रीमंत राजश्री बापूसाहेबास विनंती करून पत्र देतील तर रो( हि ?)ल्यासही ताकीद द्यावी. राजश्री राघोपंत कांहीं लस्करांत आले नाहींत. त्यांजला पत्रें पाठविलीं आहेत. रो(हि)ल्यास पत्रें ताकीद घेतली पाहिजे. दोन वरसें ब्राम्हण तेथें असोन पैका देत नाहींत. असो. ताकीदपत्र दिधलें तर घेऊन पाठवावें. हफ़ज रहिमतखानास पत्र ल्याहावें. आमची त्याची भेटी आजी होणार. जाली मजकूर कादर वाडी (?) सुधा करून. परंतु राजश्री राघोपंत आसते तर बरें होतें. ते वाकीफ होते. त्यानी आपणां लिहिलेंच असेल. बहुत काय लिहिणे हे विनंती.

¶*The writer gives directions for carrying on smoothly correspondence and communications.*

---

No. 134] [28-6-1757

पौ छ १४ सवाल

श्री

श्रीमंत राजश्री बापू स्वामीजींचे सेवेसी

सेवक नारो केशव कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती विज्ञापना यैसीजे. येथील क्षेम ताा छ १० सवाल मुाा बरेली कुशलरूप जाणून स्वकीयानंद लेखनाज्ञा केली पाहिजे विशेष. इकडील वर्तमान तर वजिराचा सुज्यातदौलाचा सला रोहिल्याचे विद्येमाने होऊन वजीर शाहजादेसहित फरोखाबादेनजीक वालतेगाऊचे घाटीं गंगा उतरतात. दौचोहू रोजी झाडून फौजासहवर्तमान पार होतील. तेथून दरकूच आपले आज्ञेप्रों इंद्रप्रस्थास चालतात. मार्गी आपली वजिराची भेटीहि होईल. रोहिले आम्हास म्हणाले की, तुम्ही बरेलीस जाणे. आम्हीहि मागांहून दोचौहू रोजी येऊन पोहचतो. तेथे आलियावर यैवजाची वाट करणें ते करून. यैशास, बापूसाहेब, रोहिल्यावर पुरता दबाव पडलियाखेरीज यैवज येत नाही. आम्ही सेवक लोक तगादा सख्त करितो. यैवजाचा निकाल होईल तेथवर

करातच आहों. स्वामी संनिध आहेत. यांनीहि सांप्रतकाले वजिरास आपण तिकडेस बोलाऊन घेतलें. त्याजवरोन वसवास मानिला असे. आपले तेजप्रतापे यैवजहि देतील. परंतु बाजदबरसाद रोहिल्यांचे सिष्टकृत्य जरूर करणे पडेल. रोहिले ठिकाणी लागलियास सर्व बंदोबस्त हिंदुस्तानचा सहजातच होईल. रोहिल्यांस मनसबा पडला आहे कीं, वजीर व दक्षिणी येकत्र जाले. सुज्यात-दौलासी तऱ्ही सामील करोन घ्यावें, की त्याची आपली सरद मुलकाची येक आहे. आम्ही तुटलियावर तुमचा टिकाव होणे मुसकील आहे. यैसे सुज्यातदौलास भासऊन येकचित करोन घ्यावे, यैसा मनोदये यांचा. परंतु सुज्यातदौला यांचा इतबार धरीत नाही. प्रस्तुत तो या भानगडींत सुज्यातदौलासी व रोहिल्यासी चितसुध नाहीं. परंतु आपणहि सुज्यातदौलाकडेस आनुसंधान करावे की रोहिल्यांसी आइक्यता न होये. मी सेवक पदरचा असे. विशेष काये लिहिणे, कृपा लोभ असो दीजे, हे विज्ञाप्ति.

*¶Naro Keshao reports to Sakharam Bapu that a treaty has been arranged between the Vazir and Shuja-ud-daula. He warns the addressee about the Rohillas and remarks that unless they are put down at an early date they would prove a great obstacle to Maratha supremacy in the north.*

---

*No. 135]* *[June 1757*

श्री

पुा २. श्रीमंत राजश्री दादासाहेब स्वामींचे शेवेसी विज्ञापना. नवाबाच्या चितांत होतें की मऱ्हाटी फौज बोलाऊंन शत्रूचें पारपत्य करावें. स्वामीनी राजश्री सखारामपंत बापूसमागमें राजश्री गंगाधरपंत तात्या व राजश्री विठल सिवदेव व राजश्री अंताजी माणकेश्वर पंचेवीस हजार फौज अंतरवेदींत फरोखाबादवाल्याच्या पारपत्यास पाठविले, तेहि अंतरवेदींत आले. नवाबानी आम्हांस सांगितलें कीं, तुंम्ही त्याजला पत्रें लिहून फौज बोलावणें. त्यावरून यथून पत्रे राजश्री बापूस व राजश्री तात्यास लिहिलीं कीं, नवाब मार्गप्रतीक्षा करितात. स्वामींचें पत्र नवाबास आलेच होतें कीं आम्ही च्यार सरदार पंचेवीस हजार फौज आंतरवेदींत पाठविले आहेत. तुंम्हीहि सामील होऊन शत्रूचें पारपत्य करावें. त्याजवरून नवाबानी राजश्री बापूस व राजश्री तात्यास पत्रें लिहिलीं कीं तुंम्हीं सत्वरे येणें. तुंम्ही व आम्ही मिळोंन शत्रू पराभवाते पावऊंन. येणेंप्राा पत्रे गेलीच आहेत व साप्रत आजहि आणिक पत्रें उभयेतांस पाठविलीं की जलद मेंदीच्या घाटावर गंगा उतरावयास येणें. तेथून कनोज नजीक आहे. दो घाटावर मिळोंन फौज

उतरल. आमच्या पत्राचे उतर राजश्री बापूनी व राजश्री तात्यानी लिा कीं आंम्ही आठा दाहा मजलीवर. आम्हांस यावयास पांच सात रोज पाहिजेत. कदाचित आंम्ही येऊंन पोहचों तोंपावेतों लढाई होऊन चुकली अथवा सलूक जाला तर आंम्ही येऊंन काये करावें ? याजकरितां नवाबास विचारून आम्हांस बोलावीतच आसतील तर आठच्यार दिवस रदबदलमुळें लांबणीखालें घालावें. तोपावेतों आंम्ही येऊंन पोहचतों. यावरून नवाबास विचारिले कीं तुंम्ही फौज बोलाविली आणि मधें सलूख केला तर त्यानी येऊंन काये करावें ? तेव्हा नवाब बोलिले मजला प्रथम तुमचा पुरता भरवसा येत नाहीं. जर तुमचा भरवसा पुरता आहे तर मजला सलूख करणें नाहीं. मी तुमची वाट पाहातों. नवाबानी आपले तर्फेने त्रिंबकदासाचा भाचा भवानीदास राजश्री बापूकडे व राजश्री तात्याकडे पाठविला आहे. त्याजला जाऊंन सा रोज जाले. तो बापूपासी पंताच्या मुलकांत पावला आसेल. बहुतेक फौज पंताच्या मुलकातून कूच करून इकडे येत आसतील. नवाबानीहि लिहिलें कीं तुंम्ही पोहचतां तोंपावेतों रदबदलीवर घालितों. तुंम्ही आलियावर तुमच्या विचारें कर्तव्य ते करूंन. शफतप्रमाण करावा म्हणोन नवाबाच्या चितांत बहुत हेत आहे. तर बापूची भेट जालियावर बापूच्या विचारें होणें तर होईल. आपल्या फौजा यावयास आणिक आठ रोज पाहिजेत ये रीतीचें वर्तमान आहे. राजश्री बापूजी माहादेव वकील दिलीस गेले. त्यांजकडून वकील पनासा स्वारानसीं नवाबाकडे आला आहे म्हणोन रो नरसिंग हरकारे सांगत होते. येका दों रोजां त्याची मुलाजमत होईल व पातशाहाचा फर्मान नवाबास आला कीं आंम्ही शाहजाद्यास लिहिलें व गाजुदिखानास लिहिलें आहे, तुम्हासी कजिया करणार नाहींत व [अपूर्ण]

¶*A news-letter to Raghunathrao pertaining to the succour which the Nawab Shuja asks from the Marathas in order to defeat the Rohillas and the Vazir. The Marathas—Sakharam Bapu and others—promise the help asked for but on the definite undertaking that the Nawab would start no negotiations with the enemy, which the Nawab gives.*

---

*No. 136*] [*June 1757*

**श्री**

साहेबाचे शेवेसी. मानाजी पायेगुडे, सयाजी बोरगे साा दंडवत विज्ञापना. राजश्री सुभेदार व राा विठलराऊ व बलोचे याचे मोर्चें येमुना किनारेयाने काशमीर दरवाज्याकडे कायेम जाहाले. फारच नेटबाजीने मोर्चें जातात. आम्हास काबल

दरवाज्यास मोर्चेबंदी करावयासी रा सुभेदारांनी सांगितले त्यावरून काबल दरवाज्यास जाऊन मोगलपुरियाचे मोगल आवदे सामील करून आज घेतले. परंतु मोगल म्हणतात आपली जमेत बरकंदाज वगैरे बहुत आहेत त्यास तूर्त काही पोटास पाहिजे म्हणजे च्यार हजार माणूस तयार होऊन तुमचे पुढे काम कारिगार करितो. याखेरीज आपणास सामान येणेप्रो पाहिजे. तोफ समेत सामान दोन तीन व जेजाला वीस व गाडदी दोनसे व बेलदार पंचवीस व बाणदार पांच व बाणाच्या कैच्या याप्रो सरजाम आम्हास मोगलांनी सांगितला आहे. याजकरिता शेवेसी लिहिले आहे. या सरंजामाविना मोर्चेबंदी काईम होणार नाही हे ध्यानास आणून सरजाम प्रात:काली आम्हाकडे आल्याने कार्यावर पडेल. मोगलाचे मनोदये रक्षणार्थ तूर्त च्यार हजार रुपये दिल्याने उपयोगी फारच आहे. सारांश या आंगेच दिली जेरजतीस लवकर येईल ऐसे दिसते परतु तरतुदेस ढील कामास नये हे विज्ञापना.

आमचे लस्कर जिनसीजवल आहे. येथून मोर्चेबदीस काबल दरवाज्यास अगर लाहूर दरवाज्यास दीड कोस लावण आहे. यास्तव आमची फौज मोर्चेबदीस गेल्याने येथून कूच करून समीप जाणे लागेल. याची आज्ञा काय ते करावी. मोगलपुऱ्यांतील मोर्चेबदीस बल पडिल्यास उपयोगी आहे. रा समशेर बहादर व गाजदीखान यासहि हिकडे पाठवावयाची तरतूद केल्याने उतम आहे. इकडील बदोबस्त पाहावयास शाहाणा माणूस पाठविल्याने साहेबाची खातरदास्त होईल. शेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*Manaji Paygude describes how batteries were mounted and kept ready for an attack at the several gates of Delhi.*

---

*No. 137*] [*11-7-1757*

**श्री**

श्रीमंत राजश्री बापू
स्वामीचे सेवेसी.

पोष्य जनार्दन राम कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती. येथील कुशल तागायत छ २३ सवाल सोमवार मुकाम नजीक परगणे शाहाना स्वामीचे कृपेंकरून सुखरूप असों विशेष. ठाणे शाहाना व नरसिजा जखेरा खानपूर ही स्थलें हस्तगत जाहाली. गड मुक्तेश्वरास फौज पाठविली आहे. तेंहि ठाणें खालीं जाहलेयांचे वर्तमान आलें म्हणजे सेवेसीं लिहून पाठऊं. वरकड इकडील वर्तमान सविस्तर राजश्री धोंडोपंत सेवेसीं पाठविले आहेत हे निवेदन करितील

त्यावरून कलेल. पंत मशारनिले अर्ज करावयाबद्दल पाठविले आहेत. स्वामींनी कृपा करून शाहाना नरसाणा जखेरा गडमुक्तेश्वर येथील जप्ती सांगोन सनद करून देविणार स्वाम असेत. सेवेसीं बहुत काय लिहिणें ? च्यार परगणियाचे देहाये झाडे जमाबंदी तनखा कानगो चौधरी याचे रुजुवातीनें लिहून आकार करून मागाहून पाठवितों. रोहिल्याचे अमलदारानीं चौधरी कानगो धरून वेऊन गेले, यामुळें तूर्त कागदपत्राचा शोध लागत नाहीं. दोन दिवस थीरथार जाहला म्हणजे अवघेच रुजू होतील. सारांश, मेहेरबानगी करून जप्ती आम्हांकडे सांगावी. यांत आपण खावंद आहेत. बहुत काय लिहिणें ? शाहाना परगणियांत दोन तिन जागे पठाणाचे आहेत. गढ्या मातबर आहेत. पठाण बखेडेखोर आहेत. याचें पारपत्य येथास्थित जाले म्हणजे परगणियाची रयेत बेवसवास राहील. सरकारचे सिलकेचा दाणादुणा पांच सात हजार रुपयांचा ठाण्यांत आहे. याजकरितां दोन तोफा आठ दाहा दिवसाचे अवकाशानें पाठवाव्या म्हणजे तिनी जागे वेऊन गढ्या पाडून टाकितों. सेवेसीं विदित असावें हे विज्ञापना.

¶*Janardan Ram informs Sakharam Bapu of his exertions to restore order in the Doab.*

---

*No. 138*] [*Date of receipt 13-7-1757*

पौ छ २९ सवाल

**श्रीशंकर**

**राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री**
**सखाराम भगवंत स्वामी गोसावी यांसी.**

पोष्य रघुनाथ बाजीराव नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये लिहिणे विशेष. तुम्ही दोन च्यार वेळा लिहिले कीं सुज्यातदौला याचे मदतीस जावे लागेल; आणि तो म्हणतो कीं मी तुम्हास रुपया देणार नाहीं. ऐसियासी रुपये न घेतां त्याचे मदतीस जावे यात सरकारची किफायत कोणती ? तरी तुम्ही राजश्री गंगाधर यशवंत याचे भिडेने रुपये न घेतां मदतीस न जाणे. मारनिलेची भीड सरकारच्या काय कामाची ? जिकडे रुपया मिळेल तिकडे जावे व मुलूख मेळवावा व जप्ती मुलुकाची करावी. हरतऱ्हेने रुपया मेळवावा यात तुमचेहि स्वरूप आहे आणि सरकारचीहि किफायत आहे. येथेहि राजश्री मल्हारजी होळकर याचे भिडेनेच काम दिरंगाखाली आलें. आणि जयनगरची मामलत वगैरे कितेक कामे होतात त्यात तफावत पडती. तरी तुम्ही येकंदर

कोणाची भीड न धरिता हरतजविजीने रुपया मेळवावा. जिकडे रुपया मिळेल तिकडे मदतीस जावे यात सरकारची किफायत आहे व तुमचे स्वरूपायोग्य आहे. तरी सारांश गोष्ट हेच कीं फौज खुशाल राखावी आणि कांहीं रुपये व लूक मिळेल तो अर्थ करावा. पुणियापासून रुपये मेळवावयास निघालो ते अद्यापि कांहींच फळास येत नाहीं हें अपूर्व आहे. तुम्हास पुढें पाठवावयाचे कारण हेच कीं मुलूकजप्ती करून अमल बसवावा, रुपये मेळवावे. कोणाचे मदतीस पाठविले नाही. काही विशेष काम नाही. यात्रेस पाठविले नाही. तीर्थास पाठविले नाही. एक कांहीं मेळवावें यास्तव पाठविले ते तो कांहीं होत नाही, हेच अपूर्व आहे. पत्र लिहिले याजवरून दिर्के[१] न होणे. पुढें तजवीज कोणती योजली, काय विचार तो लिहिणे. आम्ही जयनगरची मामलत जसी तसी विल्हे लावितो. बहुत काय लिहिणे हे विनंती.

¶*Raghunathrao writes to his Diwan Sakharam Bapu that he does not favour the alliance with Shuja unless it is adequately recompensed. He admonishes the addressee for his dilatoriness and has the same complaint against Holkar whose influence he is too weak minded to shake off.*

---

*No. 139*] [*18-7-1757*

**श्रीशंकर**

**श्रीमंत राजश्री बापूसाहेब**
**स्वामीचे सेवेसी**

विनंती सेवक त्रिंबक मुकुंद कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती. सेवकाचें वर्तमान तागायत श्रावण सुध २ सोमवार मुकाम लस्कर नवाब वजीर जाणऊन सेवकाचीं पत्रें जे आजिपावेतो लिहिलीं ते राजश्री आताजीपंत नानासच लिहीत गेला. त्याची उत्तरें आली कीं, जे तुम्हीं पत्रें लिहिता ते श्रीमंतास दाखवितों. हालीं यैकिलें कीं, ते मेरटेकडे गेले आहेत. त्यास आम्ही आजी सोमवारी मुकाम खारेज[२] केला. उदईक मंगळवारीं सिकदार (?) नवाब वजीर व अहमदखानसुद्धां घेऊन सेवेसीं दाखल होतील. भेटीनंतर सविस्तर वर्तमान नवाब वजीर आहमदखान निवेदन करतील. सेवकहि विनंती करील. कृपा सेवकावर असावी हे विज्ञापना. मिति श्रावण सुध २ सोमवार प्राथकाल.

¶*Trimbak Mukund informs Bapu that the Vazir and Ahmedkhan Bangash are coming to pay their homage.*

---

१ कष्टी. २ बाहेर ?

*No. 140*] [*Date of receipt 28-7-1757*

पो छ ११ जिल्काद.

श्री

स्वामीचे सेवेसी विनंती सेवक रामराऊ नारायेण कृतानेक विज्ञापना. स्वामीची आज्ञा घेऊन स्वार जालो ते श्रीगोद्यास येऊन श्रीमंत राजश्री जनकोजीबावाची व पाटीलबावाची भेट घेऊन माहाराजाचे आज्ञेनरुप उभयेतास विनंती केली. त्यावरून तिन्ही कामे कबूल केली आहेत. खर्चाचा ताळा मात्र पडला म्हणजे कारकून समागमे घेऊन सेवेसी येतो. येथे केवल स्वामीचे अज्ञा प्रमाण. दुसरे काही जाणत नाहीत. अविलंबेच तिन्ही कामें घेऊन सेवेसी येतो. दर्शनाअंती सर्व विदित केले जाईल. सो श्रुत होये हे विज्ञाति.

स्वामीचे सेवेसी पाटीलबावानी विनंती पत्र लिहिले आहे त्यावरून शृत होईल हे विनती.

¶*Ramrau Narayan informs the Peshwa that the Sindias readily agreed to the Peshwa's desire.*

---

*No. 141*] [*31-7-1757*

श्री

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
जनार्दनपंत स्वामी गोसावी

पोष्य सखाराम भगवंत नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीये कुशल लिहीत जाणे विशेष. तुम्ही पत्र पाठविले ते पावले. गढीचे काम मातबर, त्यास फौज भारी पाहिजे, म्हणोन विस्तारे लिहिले ते अवगत जाले. ऐशास येथून रा। माणिकराव व निबाजी खटके व विठल आबदेव गेलेच आहेत; व हली राजश्री रेणकोजी अणाजी फौज सुधां रवाना केले आहेत. येऊन पोहचतील. व तुम्हीहि तेथे स्वार व प्यादे नवे ठेविलेच आहेत. आणखी लागतील तरी विचार पाहून ठेवणेच जाले ठेवावे. गढीचे काम फते जालियावरी सिबंदीस ऐवजहि तेथे निघेलच आणि आपणहि तो अजमास पाहून जे करणे ते करीतच असतील व करतील हे निशाच आहे. तेथील तेथेंच सिबंदीचा ऐवज तुम्ही विचारे काढालच. वरकड कामकाजाचा मजकूर तरी तुम्हावरी काम भारीच पडले

आहे; व सरकारी काम निष्ठेनें करितां, चाकरीस चुकत नाहीं हे सविस्तर वर्तमान येथून श्रीमंतासहि लिहिले आहे. तुमचे चाकरीचा मजराच होईल. शिबं(दी) आणखी ठेवणेच, तरी ठेऊन सर काम करून घ्यावें. पुढें त्याचे ऐवजाचा मजकूर काय आहे? तुम्ही तेथंच सर्व कर (पुढें मजकूर नाहीं).

¶*Sakharam Bapu to Janardan Ram giving orders about the Sarangpur affair.*

---

*No. 142*] [*31-7-1757*

**श्री**

**राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री**
**मुरारपंत स्वामीचे सेवेसीं**

पोष्य जनार्दन राम सां नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल ता। श्रावण वा। प्रतिपदा रविवार जाणोन स्वकीये कुशल लिहीत गेले पाहिजे विशेष. येथील वर्तमान तरी तुम्हापासून निरोप घेऊन आलो ते श्रावण सुध चतुर्दशीस येथे सारंगपुराजवळ येऊन राहिलों. गावांतील किल्यात रोहिल होते. फौजेच्या दहशतीनें निघोन गावाबाहेर गोसावियाचा किला आहे, तेथे किला बलाऊन लढाईस उभे राहिले आहेत. त्यास लढाईचा प्रसंग आला आहे तरी तुम्हापासी स्वार व प्यादे सामान काय असेल ते घेऊन येथें सामील व्हावें. सरकारचे काम येऊन उभे राहिले आहे. हे काम विल्हेस लागले म्हणजे अवघेच उत्तम; नाही तर विचार जो आहे तो सर्व तुम्हास कलतच आहे. तर पत्र पाहताच आधी स्वार होऊन सरकारी कामास रुजू व्हावे. श्रीमंताकडून निंबाजी खटके व माणिकराव फौज सुधां इकडे येत आहेत; त्यांचे वर्तमान काय, ते कोठे आहेत, कोणत्या मार्गे इकडे येणार, त्याचा शोध करून त्यास पत्र लिहून त्याची बातमी राखोन त्यांसी पत्रे लिहून त्यांजला जलदीनें आम्हांकडे पाठऊन देणे. तुम्ही आपल्याकडील सामान जें तयार होईल तितके करून लौकर येथे यावें. निंबाजी खटके व माणिकराव इकडे रवाना कले म्हणोन श्रीमंत वारंवार लिहितात; परंतु ते अद्याप कोठे आहेत हे कळत नाहीं. तर त्याचा शोध आधी आधी करणे. अनमान कराल तर श्रीमंताची शफत तुम्हास असे. बहुत काय लिहिणे हे विनंती.

¶*Janardan Ram to Murarpant requisitioning help to resist the Rohillas of Sarangpur.*

No. 143] [29-9-1758

श्रीशंकर

श्रीमंत राजश्री दादासाहेब
स्वामीचे सेवेसी

विनंती सेवक अंताजी माणकेश्वर कृतानेक सां नमस्कार विज्ञापना. ता भाद्रपद वद्य १३ पावेतो स्वामीचे कृपेकरून सेवकाचे वर्तमान येथास्थित असे विशेष. दंडा राजपुरी व जंजिरा याचे फर्मानाकरितां आज्ञापत्र सादर जालें तें पावलें. त्यास येथून येक दोन रोजीं दिलीस जातो. तेथें गेलियावर आज्ञेप्रमाणे फर्मान तयार करून सेवसी पाठवीन. पूर्वी आज्ञापत्रें हुजूरची आलीच होती त्याचे विस्मरण सेवकास नव्हतेच. तो दुसरे आज्ञापत्र आले. त्यास पहिले आज्ञापत्र जनकोजी सिंदे यांच्या लस्करी पावलें. दुसरे आज्ञापत्र जैनगरीं पावलें. त्यास येथून दिलीस गेलियावर फर्मान दंडाराजपुरी आपली वतनाची जागा तेथील फर्मान व जंजिऱ्याच्या किलेदारास परवाना की किला राजश्री बाळाजीराव प्रधान यास देविला आसे तरी पत्रदर्शनी किला खाली करून देणे म्हणोन माझे जेथवर ज्ञान चालेल तेथवर दिलीस जाताच दुसरे दिवसी फर्मानास काम चाली लाऊन फर्मान तयार करून मुजरद कासिदाची जोडीसमागमे माफजतीने सेवेसी प्रविष्ट करीन. परंतु स्वामीने तेथून मसोदे करून पाठवावे. कोण कोण कागद कैसे पाहिजेत तितके मसोदे पाठवावे. त्याप्रो दुसरे फर्मान तयार करून पाठवीन. जोपावेतो मसोदे येत तोंपावेतो फर्मानाचा खोळंबा करीत नाहीं. फर्मान तो करून येथाज्ञानें पाठवितोंच. परंतु दुसरेहि फर्मान मसोदे येतील त्याप्रो करून सेवेसी पाठवीन. जे कागदपत्र दो महिन्यानी तयार होणार ते सेवक पंधरा रोजात तयार करून सेवेसी पाठवीन. या कार्यास कदापि अंतर होणार नाही. रा जनकोजी सिंदे याजला एक ताकीदपत्र आमच्या कागदांत घालून पाठवावे कीं कीं पाछाहा वजीर यांचा हिसा निमे करारमदार आम्ही केला आहे. त्याप्रो कागदपत्र अंताजी माणकेश्वर याजपासी शिक्यानसी करार केलेच आहेत त्याप्रो तुम्ही त्यासी वर्तणे. फौज त्याची जिकडे तुम्ही चाकरी सांगाल तिकडे करितील त्याचा हिसा अंताजी माणकेश्वर याचे विद्यमाणे देत जाणे. त्यास अंतर सर्वथा न करणे. तुमच्या बुधीस कोणी भ्रंश करील अथवा आदिनाबेग संदीपबेग यास लिहील ते सर्वथा न यैकणे म्हणोन सेवकाच्या लखोट्यांत येक पत्र अगत्यरूप विनंती लिा त्याप्रमाणे पाठवणार स्वाम समर्थ आहेत. स्वामी काम सांगोन गेले आहेत ते बज्याऊन सेवकास अणिले पाहिजे. त्याचा परिणाम येथास्थित जाला पाहिजे ही सेवकाची सर्व चिंता स्वामीखेरीज कोण जाणणार ? मी खावंद

चाकरीस जीवे प्राणे हाजर आहे. माझे सर्व प्रकारे अभिमान स्वामीस आहेत. माझेविसी निशा असो. सर्वा जागा लक्ष स्वामीच्या पायाकडे राहून चितानरूप बंदोबस्त होईल. लाहोर प्रांती सरदाराच्या फौजा प्रो पाठऊन बंगालियासी सिध आसो. रा जनकोजीबावाचा हेत आपला खाशाचा बंगालियाचा आहे. परंतु पातशाही वजीर त्यास समागमे जाणार नाहीत. संवशयात पडतील याजकरिता पातशाहा आम्ही लाहोर प्रांती जावयासी सिध आसो. परंतु बंगालियाचे काम कासी प्रयागचे काम विना पातशाहा वजीर आम्ही तिवेच निराले गेलियावाचोन स्वामीच्या मनोदयानरूप होत नाही. कासीत व प्रयागात सरदार राहिले तरी कामास न ये व पातशाहाखेरीज बंगालियाचे जाजती येवज येणे नाही याजकरि (ता) खोलून सारे जनकोजीबावास लिहिणार धणी समर्थ आहे. तहप्रा अंतर न करावे हे लिहिले पाहिजे. श्रीमंत रा नानासाहेब आम्हावरी क्रोधे आहेत. स्वामीनी शांत करून शेवकास आज्ञा करणे ते करावी. आज्ञेखेरीज मी काही * * * * * सर्व चिरंजीवास आज्ञा करतील त्याप्र * * * * हे विज्ञा * * *.

¶*Antaji Manakeshwar to Raghunathrao : communicates the intentions of the Emperor and advises on the plan of campaign.*

---

*No. 144*] [*15-9-1757*

**श्रीवरद**

**श्रीमंत राजश्री दादा**
**साहेब स्वामीचे सेवेसी**

विनती सेवक रेणको आनाजी सां नमस्कार विज्ञापना. येथील क्षेम प्रताप साहेबाचा ता छ ३० जिल्हेज मु॥ नजीक ज्वालापूर येथास्थित असे. यानतर साहेबाचे प्रतापे रोहिला फौज गंगा उतरोन पलीकडे गेला, येथील जमीदार राव इमामुदीन रोहिल्यासमागमे होता तो त्याजबराबर पलीकडे गेला. त्यास दिलासा बहुत सांगून पाठविला. परतु तो आला नाही. त्याचा भोगीया राव जामदार त्यास दिलासा कौल पाठऊन आनविला. येऊन भेटला. त्याचे प्रगणियाची हकीकत मनास आनिली. यादी आलाहि (दा) दिलीहून पाठविली आहे. त्याजवरून विदित होईल. ज्वालापूर परगणा साल गुदस्ता कुल बाब कुल कानू आकार

३९००० ज्वालापूर प्रगणा सिवाये जकात

२०००० दून प्रात श्रीनगरवाल्याचा तेथील तपे च्यार नजीबखान रोहिल्याने जबरदस्तीने घेऊन ज्वालापुराखाले घातले

६००० सहजपूर गढी

५००० सवडी

८००० बसतपूर

१००० मालकोट

२००००

सिवाये जकात

५५०००

सदरहू पचावन हजार रुा आहेत. च्यान्ही तपे दून प्रातचे विसा हजाराचे यांतच रोहिल्याची फौज पडली होती. फौज पलीकडे गेल्यावर या च्यान्ही तप्यात आपली ठाणी बसविली. यापलीकडे दून दुसरी. श्रीनगरवाल्याची तपे तीन तेथे आम्ही जबरदस्तीने ठाणी नवी बसविली. तेथील आकार तेथल्या लोकाची जबानी

१५००० सतोरे

१५००० कलोखर

१५००० कल्यानपूर

४५०००

सदरहू तिन्ही तप्यात ठाणी नवी बसविली. त्याजवरून श्रीनगरच्या राज्याने वकील आम्हापासी पाठविला की, हे तिन्ही तपे सोडून द्या तुम्हास काही नजर देतो. ते आम्ही कबूल न केले. तिन्ही तपे पचेतालीस हजार रुा ज्वालापुरात आधिक येतील. साहेबाची चाकरी केली. त्याउपर श्रीनगरवाल्याने वकील साहारंगपुरास रा जनार्दन राम याजपासी पाठऊन, त्यास काही नजर कबूल करून, त्याचे राऊत दोनसें, कारकून येक, कलाखर प्रगणियाचे ठाणे सहसपूर त्या गावास घेऊन आले. त्या कारकुनाने आम्हास पत्र लिहिले; ते बजिनस साहेबापासी पाठविले आहे. त्याचे चितात नवे तीन तपे आम्ही घेतले, ते सोडवावे. पहिलेपासून च्यार तपे ज्वालापुराखाले च्यार वरसे आहेत; तेहि सोडवावे; यैसा बखेडा आरंभिला आहे. या प्रकारची त्याची रीत. रोहिला फौजेसुधा दुनेमधे होता. त्याजभोवते आम्ही श्रम करून मेहनत केली. फौज

लुटून घ्यावयाचा प्रसग. ते समई जनार्दनपंतास उदंडदा लिहून पाठविले. साहेबी त्यास आज्ञापत्रे पाठविली. परंतु आले नाहीत. आता रोहिला पलीकडे गेला. आमची मानसे पनास साठ कामास आली. घोडी वीस पंचवीस मेली. साहेबाचे प्रतापे रोहिल्यास काढून टाणी आम्ही बसविली. तेथे बखेडा करावयास फौज पाठविली. आपणहि मागून येणार. जबरदस्तीने आम्हापासून सातहि तपे सोडऊन देणार. यैसे वर्तमान त्याचे. येविसी साहेबी कृपावंत होऊन रा। जनार्दनपंतास येक ताकीदपत्र पाठवावे. की, दुन प्रांत श्रीनगरवाल्याचा. सातहि तपे यांजकडे आम्ही दिल्हे आहेत. हे तेथे अमल करतील, तुम्ही तेथे बखेडा न करणे. कारकून राऊत पाठविले ते बोलाऊन घेणे. यैसे पत्र त्यास पाठवावे. येक पत्र राजा श्रीनगर प्रतीतशाह त्यास लिहून पाठवावे की, दुन प्रात सात तपे यांस दिल्हे आहेत. तेथे हे अमल करतील. यैसे पत्र राज्या व येक सनंद सातहि तप्यास लिहून पाठवावी की, यासी रुजू होऊन रुा भरने. याप्रा॥ पत्रे साहेबी पाठविली पाहिजेत. म्हणजे पहिला आकार ज्वालापूर व च्याऱ्ही तपे दुनचे मिळोन पंचावन हजार रुा आहेत. हे तिन्ही तपे नवे पचेताळीस हजार येकून लाख रुा वसूल होऊन साहेबास प्रविष्ट करीन. हारद्वारात ज्वालापुरांत आपले ठाणे आहे. पलीकडे गंगा उतरोन चांडा प्रगणा तोहि श्रीनगरवाल्याचा ज्वालापुराखाले नजीबखानाने घातला होता. तेथे येथील जमीदार राव इमादुदीन रोहिले पाच सातसे घेऊन राहिला आहे. नावा त्याच्या हाती आहेत. से दोनसे मानूस रोहिले नावेत बसोन आलीकडे हरिद्वारापासी येतात. हरिद्वारात आपले ठाणे. त्यांसी यांसी जुंझ होते. या प्रकारचा बखेडा येथे आहे. यामुळे येथील जमीदार राव जामदार म्हणतो की, तुम्ही कूच करून जाल तर, येखादे दिवसी पलीकडून रोहिले आलीकडे उतरोन येतील. याचे दहशतीने आम्हास येथे राहवत नाहीं. निदान तुम्ही कूच करून जाता तर, दोनसे राऊत, पांचसे प्यादे ठेऊन जा. तेव्हा बंदोबस्त राहील. येविसी साहेबाची आज्ञा लिहून पाठवावी. त्याप्रा॥ येथील बंदोबस्ती करून मी कूच करून साहारंगपुरास जाईन. तेथून येमुना उतरोन पलीकडे सरहिंद मुलकात जाऊन, साहेबाचे प्रतापे अमल बसवीन. साहारंगपुरापासी उतरोन जावयास पलीकडे सरहिंद प्रांतचा प्रगणा बुढिया तेथे जावे लागते. तो प्रगणा मजला साहेबी सनद करून दिल्ही आहे. जनार्दनपंत म्हणतात, बुढिया प्रगणियाची पहिले सनद आम्हास दिल्ही आहे, तो प्रगणा तुम्हास देत नाही. येविसीहि त्यास आज्ञापत्र द्यावे की, यांस पलीकडे उतरोन जावयास तो प्रगणा याचा यास देणे. यैसे पत्र त्यास दिल्हे

पाहिजे. सरहिंद प्रांतची जमीदार वगैरे लोकाची पत्रे आली आहेत कीं, तुम्ही येऊन पोहचने. त्यास कृपावंत होऊन थोडीबहुत फौज पाठवावी. पलीकडे जाईन. बहुत काय लिहू? कृपा केली पाहिजे. हे विज्ञप्ती.

*¶Renako Anaji informs the Peshwa that the Rohila force has evacuated the Doon Division in favour of the Marathas. He further says the Raja of Shrinagar is reported to have offered Janardan Ram a large sum as the price of his assistance to get back his territory. The Peshwa is requested to restrain Janardan Ram.*

---

*No. 145*] [*12-9-1758?*

पौ छ ८ मोहरम

## श्रीपांडुरंग

### पुरवणी श्रीमंत राजश्री नानासाहेब स्वामी माहाराजाचे शेवेसी

विज्ञापना. श्रीमंत राजश्री दादासाहेब याणी आज्ञापत्रे पाठविली कीं हुजुर येणे, त्यावरून प्रस्थाने बाहेर निघालो होतो इतकियांत संस्थान सेवढे येथील राजा मृत्यु पावला. मग श्रीमंत राजश्री दादासाहेबांकडे जावयाचे राहिले. मग फौज सुधा सेवढ्याच्या मुलकांत आलो. त्याचे वकील आले आहेत. गुदस्तांची बाकी नारो शंकर सुधा आहे व नवा राज्यटिका याची नजर यैसी आहे. ठहरल्याउपर सेवेसी मागाहून लेहून पाठवितों. श्रीमंत राजश्री दादासाहेबांकडे जावें तर तूर्त बाकीचा कझ्या व नजराणा च्यार महिने राहतो. दिवसगत लागते. सबब राहिलो. राजे प्रीतिसिंग सेवढेकर व राव रामचंद्र याणे राज्य दिल्हे, तेव्हां राजे प्रीतसिंग याचे लिहिले घेतले कीं आमचा वौंष आहे तोपावेतों सेवढ्याचें राज्य आमचें. वौंष बुडाला तर राज्य तुमचे. याप्रमाणे राजे प्रीतिसिंग याणी राव रामचंद्र दतियेकर यांस लेहून दिल्हे. याजकारितां आतां सेवढ्याचा राजा मृत्य पावला. त्याचा वौंष नाहीं यामुळे राव इंद्रजित[१] म्हणतात कीं राज्य सेंवढ्याचे आमचे आहे. आम्हास देणे. नजराणा राज्याचा देवू. परंतु सेवढ्याचा किला मातबर आहे. दतियाचा किला व सेंवढ्याचा किला तों मातबरच आहे. यैसे दोन किले दतियावाल्याचे हातास गेल्यावर धामधूम व फिसाद होईल, बळकट होतील, यैसें समजोन राजे प्रीतिसिंग याचा भाऊ करणजू याचे पुत्र चौघे आहेत, व नारायेणजू[२] हाली राजा मेला याचा मानलेला भाऊ आहे, येसे दोघेजण आहेत.

---

१. दतियाचा राजा. २. प्रीतिसिंगाचा वडील मुलगा.

यातून राज्यटिका ठहरला नाहीं; परंतु ठहरेल तो मागाहून लेहून पाठवितों. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*The question of the succession of the Sevadha state is discussed and communicated to the Peshwa.*

---

*No. 146]* *[10-10-1758*

**श्री**

**श्रीमंत राजश्री भाऊ स्वामीचे सेवेसी**

विनंती सेवक विठल सिवदेव साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील वर्तमान ताा छ ७ सफर मुाा लाहोर यथास्तित असों. यानंतर देवजी घोरपडे व सुलतानजी नलवडे व राणोजी नलवडे व सुलतानजी रोकडे राजश्री अंताजी माणकेस्वर याज-समागमे होते. त्याजकडील पत्रें स्वामीस पूर्वी आलीं होतीं कीं ब्यान्ही आसाम्या जुंझी पडल्या हे वर्तमान सर्वांस कलले व त्याचे घरीही वर्तमान गेले आहे. आजी छ मारचे मुकामी पत्रें राा अंताजीपंताच्या लस्करांतून, राा सटवोजी जाधव अम्हापासी आहेत त्यास आली कीं आवघे सुखरूप आहेत. तीं पत्रे स्वामीचे सेवेसी पाठविली आहेत ती पाहावी आणि स्वामीनी तीं पत्रें व आपले अभयपत्र त्याच्या मुलामाणसास लेहून पाठवावे म्हणजे वर्तमान कलोन माणसेमुले आनंद पावेत ते करावें. नाहक चौघाचे वरी श्रमी होत असतील. याजकरिता सेवेसी विनंती लिहिली आसे. पत्र पावतांच वर्तमान लेहून पाठवावे. सदरहू पत्रे कागलास रवाना करावी. सेवेसी श्रुत होये हे विज्ञाप्ति.

¶*Vithal Sivdeo requests the Bhao to write letters to the relatives of Deoji Ghorpade, the Nalvade brothers and Sultanji Rokade that they are hale and hearty and not dead as was reported.*

---

*No. 147]* *[22-10-1757 ?*

**श्रीशंकर**

**पुरुषोत्तम महादेव व रामराव (?)**

तुम्हीं पत्र पाठविलें तें पावलें. कितेक प्रकारें मजकूर लिहिले ते सर्व कलले. अहमदखान बंगस यांचे येकनिष्टेचा प्रकार लिहिला त्यास जे घराण-दार असतात त्यांची दुरंदेशीसी तरा निरालीच असते. आजपर्यंत त्यानीं दुरदेसीनेच वर्तन आले. याकरितां त्यांचा इतबार धरून येथून ममतेचे व कृपे-

चेच भाव वजिरासीं बोलण्यांत आले. हफिजाविसी वजिरानी फारसी खातरजमा पुरऊन मजकूर केला होता. त्याजवरून कितेक प्रकारें रयांतीचे[1] मजकूर त्याचेविसींहि बोलण्यांत आले होते. कारण कीं फौजसुधां येऊन भेटावें आणि मनसब्यास सामिल व्हावें व कांहीं नजरदाखल खर्चास तूर्त पाठवावें ह्याच गोष्टी ठराऊन ठीक करतों ऐसें वजिरांचे जाबसालांत होतें म्हणून तुम्हांस बाा दिल्हें. त्यास नजरेचे ऐवजाविसी अनमान करितात. वरकड गोष्टी गोडनरम प्रकारें बोलतात. त्यास ज्या गोष्टी वजीर बोलून गेले होते त्या त्यांचे कार्याच्या सरकार तर्फेच्या रया (तीच्या) होत्या. असो. नेक समजोन करणे तसें करतील. तुम्ही येव्हांच हफिजासी साफ तोडून बोलावे कशास? छावणी तर जालीच आहे. पुढें बाजतबरसात समजोन करणें तसें केलें जाईल. फौज सुधां पठाण व रोहिले हंगामी भेटीस येऊन सामील जाल्यास रयातहि होणे तसी होईल. तुम्ही आहा तसेच तेथें राहणें. आज्ञा येईल त्याप्रमाणें वर्तणूक करणें.

छ ८ * सफर पत्रें पाठविली

¶*Purshottam Mahadeo and Ramrao are requested to persuade Hafiz, the Rohilla Chief, to send in his forces as previously promised.*

---

*No. 148]* *[5-12-1757*

**श्री**

**श्रीमंत राजश्री नाना**
**स्वामीचे सेवेसी,**

विनंती सेवक बापूजी बलाल साष्टांग नमस्कार विनंती. येथील वर्तमान तागायत छ २२ रबिलावल मुकाम नजीक दिली सा कोस अंतरवेदींत येथास्थित असें विशेष. स्वामीकडील पत्रें आलीं तीं पावलीं. श्रीमंत राजश्री विस्वासराव राजश्री बाबूराव बावा व दतबा औरंगाबादेकडे आले आहेत म्हणून लिहिलें तें कललें. इकडील वर्तमान तरी पातशाही मुलूक जप्त केला होता त्यास दिलीची मामलेत जाली. यैन खंडणी समाईक साडेबारा लाख रुपये सखारामपंताबाा लाख रुपये व दोन तोफा आणीत होते त्याचे दीढ लक्ष येकून पंधरा लक्ष खंडणी

---

१ कृपा. *(९) खोडून केल्यासारखे दिसतात.

मुलूक सोडिला. पांच हजार फौज दिलीस रहावी असा करार जाला.
ाप्रमाणें खंडणी जाली. वसूल फौज राहील ते करील. नजीबखान
ढून दिल्हा. त्याणें ठाणी अंतरवेदींतील उठविलीं. यास्तव राजश्री
। व विठलपंत, पायेगुडे व वजीर जनार्दन राम यैसे त्याजवर जाणार.
गडमुक्तेश्वराकडे जाणार आहेत याप्रमाणें मनसबा आहे. जाटाकडील
पहिल्याप्रमाणें तिसाला तिसा लक्षाची जाली. फौजेस पोटास तों नाहीं.
आबादीचा विचार कलतच आहे. विदित जालें पाहिजे. पुढील साला-
देलीचे साडेबारा लाख सखाराम पंताचे पनास हजार या प्रमाणे दरसाल
ुढें तेरा असा करार ठरला. पांच हजार फौज दिलीस ठेवावी हाहि करार
वा आहे. कललें पाहिजे. पातशाहास फार बरें वाटत नाहीं. सेवेसीं
। हे विज्ञापना.

*ouji Balal's letter to the Peshwa communicating news from Delhi. bute from Delhi is fixed at 15 lacs. Najibkhan has been completely from Delhi affairs and is consequently creating mischief in the*

---

9] [1757?

## श्रीशंकर

ंती उपर. चिठी पाठविली ते पावली. वर्तमान कलले. या ग्रहस्ताचा
( सुस्त व लटका व वोढा आणखीकडे याकरतां आम्हीं पहिलेच दिवसीं
त आणून सत्वरच कार्यभाग उरकावयाची बुनियाद[1] घातली होती. मग
सी पडली. काये चिंता आहे? खावंद प्राक्तनवान. बापू! तुम्ही यषस्वी,
आखंड म्हणता कीं नानासाहेबाचे प्राक्तनाचा गूण यैसा आहे की मुश्कील
ापल्या आपण आसान[2] होऊन थोडक्यात प्रयत्नात सत्वर होऊन येते व
हेबाचे प्राक्तनाचा गूण यैसा आहे जे प्रथमता आसान काम आसेल तें
सें दिसून आयासें विलंबे होते यैसे तुम्हीच बोलता तेच निदर्शनासहि येते.
की त्वरा व बेदिमाग्खी काशास पो? काल जुमा होता व मिर्जा मनूचा दिवस
वी[3] होता म्हणून वजीर दरबारास गेला नाहीं. जाबसाल न जाला.
ा नेम केला आहे. रा॰ अंताजीपंत आम्ही आज धरणे देऊन बसून त्याजला

---

१ पाया. २ असान = सुलभ. ३ प्रार्थना.

पातशाहापांसी नेतों व जो जाबसाल ठेरतो तो येऊन सांगतो. निश्चित नाहीं. कामहि मातबर आपणहि मातबर. मातबरीप्रमाणेच मातबरीने काम घ्यावें. त्वरा न करावी. आपण दीर्घदर्शी व सूज्ञ आहेत. विशेष लिहावेसे नाही हे विनंती.

¶*Letter addressed to Sakharam Bapu condemning the dilatoriness of Raghunathrao.*

---

*No. 150*] [*End of 1757*

श्री

शेवेसी विज्ञापना. स्वामीचे आज्ञेप्रमाणे कूच करून सालेमारबागाअलीकडे येऊन मुकाम केला. त्यास एक दोन बातन्या आल्या. चाळीस कोसपावेतो कोण्ही आले नाहीं. परस्परें वर्तमान सेवेसी आले आसल. यैसियास आम्ही पुढें सरहंदपावेतो जावे की मुकाम करोन राहावें? इकडेहि मोगलपुरियाचे वगैरे कार्य जरूर कर्तव्य आहे. तर जे आपण+ आज्ञा कर्तव्य ते करावी. सडे आलो आहो, सरहंदपावेतो जाऊं. येथें राहून मोगलपुरियाचे काम करावयाची आज्ञा आली तर येथें राहून हे कार्य करूं. बुनगे तेथे राहिले आहे; त्याजला इकडे पाठवायासी आज्ञा करावी. निश्चय जो करणे तो करोन जलद पत्र सादर करावें. तदनुसार वर्तनूक करूं. शेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*This incomplete letter refers to the Punjab campaign probably of Raghunathrao.*

---

*No. 151*] [*1757 end ?*

श्री

साहेबाचे शेवेसी मानाजी पायगुडे साष्टांग दंडवत विज्ञापना. काल तिसरे प्रहरीं लाहुराकडील फौजेचे बातमीस स्वार पाठविले होते ते वीस कोस नजीक सोनपतचे सरदेपावेतो जाऊन बातमी मनास आणितां पलीकडे वीस कोसपर्यंत कोठें फौजेचे बातमीचा ठिकाण नाहीं यैसें ठीक लाऊन आज तिसरे प्रहरी स्वार आले. आनखीही वरचेवर बातमीपुरता शोध करून शेवेसी लेहून पाठऊं. हे विज्ञापना.

¶*Manaji Paygude with the advance-guard sending news about the movements of enemy's forces.*

---

\+ येथून अर्धे पान फाटलें.

No. 152] [1757

श्री

विनंती उपरी. बारगीर काल येथून गेले तो वरचेवर आवाई जाली. आम्ही धांवलो. तुम्हीहि रागे भरला, तेव्हां तुमच्या गोटांत लपाले. अंधार पडल्यावर निघाले ते तों पुढें दो ती कोसावर राऊत पुढें ठेविले. देसास कागद पाठवितों. रााा अंताजीपंताकडे सांडणीस्वार गेला, यैसी त्यास पुरती बातमी कळली कीं तिकडे जावयाचा निभाव होत नाहीं. तेव्हां फजीत पावतो यैसे जाणून, रा गंगाधरपंत तात्याकडे रात्री गेले, कीं आम्हांस भेटवा; त्यावरून त्यांची चिठी आली. त्यावरून आतांच बावाजी पोवार समजावयास पाठविला; परंतु रा अंताजीपंतास तुम्ही रागे भरून लिहिले आहे त्याची वाट काय? पोवाराकडील तिघे, आमचा एक होता, निश्चयेपूर्वक परवांच गेले. परंतु कालच्या पत्रावरून ते तुम्हावर आम्हावर श्रमी होतील, त्याचा विचार पडला आहे. याचे निवारण काय करणे ते आपण तेच करावे. बहुत काय लिहिणे हे विनंती. विठल आपदेव याजबाा फौज जाती, त्यास दोन रोजमरे पाहिजेत; त्याचा ऐवज आद-मासे पाच हजार देवावे. आमचे यैवजी वजा घ्यावे. परंतु कूच जाले आहे ते तो आज फुटतात. त्यास तळावर यैवज असला तर देवावा, नाहीं तर मजलीस त्याचे स्वार घेऊं, तेही आम्हापासून कोसीदुकोसी राहतील. हे विनंती.

¶*Vithal Shivdeo's handwriting. Antaji Manakeshvar seems to be referred to. (The paper belongs to a northern campaign.)*

---

No. 153] [1757 ?

श्री

शेवेसी नारो महादेव साां नमस्कार विनंती. येथील क्षेम ताा छ ८ रबिलावलपावेतो मुकाम पूठ श्रीभागीरथीघाट येथे सुखरूप असे विशेष. आपण सरकारचे पत्र राजश्री गोपाळपंत नानास पाठविलें कीं श्रीगंगेस पूल बांधा-वयाचा आहे याकरितां राजश्री बाळाजी खंडेराव पाठविले आहेत हे सामान पुलाचें जें मागतील तें त्यांस देणे. त्याजवरून माारनिल्हेनी सामान सुतळी गोणपाट मुजीचे रसमुज(?) लोखंड कोळसे सण बेगारी लोहार सुतार छकडे टोकरी व नावा देऊन मजला घाटावर रवाना केले. मागाहून आणखी सामान येत आहे. मी छ ६ रबिलावली घाटास दाखल जालों; आणि राजश्री बाळाजी खंडेराव याची भेट घेतली. सामानाविषई त्यानी पुसिलें. त्यास सांगितले कीं आम्हाबराबर आले तें तयार आहे. मागाहून आणखी येत आहे. दुसरे जें लागेल ते

आणऊं. मग त्यानीं सांगितले कीं होळकराचा पूल तो तयार जाहला. आम्ही लष्करांत लिहिले आहे. तेथून उत्तर आलियावर काय तें सांगो. याप्रकारचें वर्तमान आहे. मजला स्वामीनी राजश्री गोपाळपंत नानाचे तैनातीस दिले, ते तैनातीस आहे. अद्यापि कांही कामकाज नाहीं. मजला तो आश्रय एक आपला आहे. कामकाज सांगणारे आपण समर्थ असत. कोणाची इच्छा करावी? कृपाळू जे दिवशी आपण होतील ते दिवशीं उर्जित करितील हा तो भरंवसा आपलाच पूर्ण आहे. वरीहून पत्र आलें कीं चिरंजिवाचें लग्न योजिले आहे, तर खर्चाची बेगमी करावी. त्यास मी कोठून करावी? सर्व बेगमी करणार आपण समर्थ आहेत. रोजमरा बाकी एक राहिला आहे. त्याची परवानगी नालबंदीची परवानगी कांही खर्चबाबेची परवानगी जालियाने हे श्रेय आपणासच आहे. ब्राम्हणाचे लग्न होईल. बहुत मी काय लिहावे? शेवेसी श्रुत होय. बहुत काय लिहिणे हे विनंती.

¶*Naro Mahadeo as directed by the Peshwa supplies material to Balaji Khanderao for the construction of a bridge over the Ganges.*

---

*No. 154*] [*1757*

श्री

विनंती उपरी. श्रीमंताची बिनी आली. आमचे डावे हाते गुमटाकडे डेरे होणार. स्वामी मागे आहे. राजश्री नारो शंकर व समशेर बाहादर शहराचें आंगे, कदांचित रवेवर धावतील याजकरिता चौकीस ठेविले आहेत. तेहि येतील. आपणास कलावे म्हणून लिहिले असे. श्रीमंत जवल अर्ध कोसावर आल्यास विना भेटी राहिल्यास उतम दिसणार नाही. आमचा तुमचा करार की विना नागरमलास भेटल्यासिवाये न भेटावे. हे तो जवल नेहटले आहे. त्याचा विचार काये तो करार करून पाठविला पाहिजे. बहुत काये लिहिणे हे विनंती.

¶*This refers to some campaign in Rajputana in which Raghunathrao seems to have taken part. The writer is Vithal Shivdeo.*

---

*No. 155*] [*8-1-1758?*

श्री

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री सखारामपंत बापू
स्वामीचे सेवेसी

पो गोविंद बलाल सा। नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल ता। मार्गसीर वद्य १४ मु।। नजीक कुवरमोठ? जाणून स्वकीय कुशललेखन करीत आसिले

पाहिजे विशेश. इकडील वर्तमान साद्यंत श्रीमंत राजश्री दादा स्वामीचे पत्री लिहिले त्याजवरून अवगत होईल. रा गंगाधर बाजीराव याचे पथक आणविले. त्यास तूर्त काम सोईस लागत चालिले. दोन महिनेयाचे काम फौजेचे आहे दोन महिने दोनी पथके ठेवणे. दोन महिनेयानंतर येक पतक ठेवणे. येक स्वामीनी घेऊन जावे. पुढे बदलेयास फौज छावणीस येईल तेव्हां ही जाईल. हजार विनंतीची विनंती हे आहे. दोन महिने फौज राहो देणे. दोन महिनियात हे कामे करून बंदोबस्त करितो. विनंती श्रीमंत रा दादा स्वामीस करून दोन महिने दोनी पथके राहो देणे म्हणजे आम्ही चाकरी केली न केली सर्व ध्यानास येईल. परस्परे कोणी सांगेल ते खरे. वरकड वरचेवर वर्तमान लिहीत जाऊन. येथे जिवासी गाठ आहे. नित्य जुजासी गाठ. येथे कजिया आणि खावंदाची मरजी राखली पाहिजे. त्यास दोन महिने दोनी पथके राहिली पाहिजे. फौज गेलियास फजिती आहे. अंतरवेदीत दुसरी फौज नाही जे येऊन मदत करील. आमचे आम्ही संभालावे. वरकड वरचेवर वर्तमान लिहीत जाऊन. पूर्वी मुजरद जोडी पाठविली आहे त्याजबराबर साद्यंत लिहिले आहे. त्याचे उतर पाठवीजे. बहुत काय लिहिणे कृपा लोभ असो दीजे हे विनंती. रामाजी सखाजी पिरोजाबादेस होते. त्याजला उठऊन ठाणे जाटास द्यावयाची आज्ञा जाली. त्याजवर रामाजी सखाजी याजला सांगोन त्याजला उठऊन देऊन जाटाचे ठाणे बसऊन दिल्हे हे विनंती.

¶*Govind Ballal describes to Sakharam Bapu the precarious situation in the north and requests him that the two squadrons of Gangadhar Bajirao should be allowed to remain for two months at least so that he may be able to restore order in the province.*

---

*No. 156*] [*21-3-1758*

श्री

सेवेसी राजाराम गोविंद विज्ञाप्ति यैसीजे. इकडील वर्तमान विस्तारे विनंतीपत्रें पूर्वी सो पाठविली होती, त्याजवरून वृत्त श्रुत जालें असेल. हली वर्तमान तरी हाफिजाकडील फौज मुलामोहसन नामे छ ११ रजबी घेऊन फरुकाबादेजवळ आला. आतां येथून अहमदखानाचीहि फौज दो चो दिवसांत एकत्र होऊन स्वामीचे सेवेशी रवाना होतील. नवाब वजिरांनीं पत्रे सेवेशी पाठविली आहेत. अत:पर दिरंग लाविणार नाहीतसे दिसते. वजीरहि स्वामीचे सेवेशी येऊ म्हणतात. त्याही स्वामीचे सेवेशी विनंती लिहावयासी सांगितले कीं स्वामीचे अभयपत्र जहागीर द्यावयाचे बिलाशर्त आले म्हणजे आपली फौज घेऊन, सो येऊन

हजर होईन. याचीहि फौज घेऊन येईन; परंतु याजकरितां आमचे चालवावे हे शर्त नसावी. यांत माझी आबरू नाहीं. तरी आबरू रक्षून कृपा करणार स्वामी समर्थ आहेत ऐसे म्हणतात. येविसीचा विस्तार पूर्वी सो॥ विनंती लिहिली आहे. जैशी आज्ञा येईल तैसी यासी सांगू. सेवेशी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*Rajaram Govind informs Raghunathrao that the Nawab Vazir ? is seeking terms on the condition that his jagir is made over to him.*

---

*No. 157*] [*27-4-1758*

**श्री**

सेवेसी राजाराम गोविंद विज्ञाप्ति असीजें. इकडील वर्तमान पूर्वी सेवेसी विनंतीपत्रें पाठविलीं आहेत त्यांजवरून वृत्त श्रुत जालें असेल. हालीं वर्तमान छ १८ शाबानीं नवाब * व अहमदखानाकडील खलीलखान व इस्लामखान बक्षी वगैरे याजसमागमीचे जमातदार व हाफिजाकडील मुल्ला मोहसन व याचे जमातदार ऐसें कूच करून फरुकाबादेहून दाहा कोंस छबारामहूस आले आहेत. करारात्रमोजीब फौजा अद्यापि कांहीं आल्या नाहींत. इटावियास आल्यानंतरी फौजा जमा होतील, म्हणोन म्हणता (त) व काही हालींहि दररोज जमा होतात आहेत. झांडून इटावियास गेलियावरी जमा होतील. इटावियापाशीं येमुना उतरलियावरी मी येकला मात्र वजिरापाशीं निरोप मागून पुढें येक दोन दिवस सेवेसी येऊन पोंहचेन. सेवेसी श्रुत होय हें विज्ञापना.

¶*Rajaram Govind writes probably to Raghoba that the Rohilla force that was to assemble to help the Marathas has not yet been mobilised.*

---

*No. 158*] [*29-4-1758*

**श्री**

**श्रीमंत राजश्री दादासाहेब स्वामीचे सेवेसी**

विनंती सेवक पुरुषोत्तम माहादेव कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञाप्ति. येथील कुशल तागाईत छ २७ माहे शाबान मुकाम इटावा श्रीयेमुना उत्तरतीर स्वामीचें कृपावलोकनें करून येथास्थित असो विशेष. इकडील वर्तमान पूर्वी विनंतीपत्रें सेवेसी पाठविलीं त्यांजवरून वृत्त श्रुत जालें असेल. हल्लीचें वर्तमान छ २६ मिनहूस स्वामीचें आज्ञापत्र सादर जालें. त्यांत आज्ञा कीं नव दाहा महिने जाहाले, अद्यापि फौजा न आल्या. आतां आली तरी कामाची काय? तुम्ही व वजीर येमुना दक्षणतीरास उतरून आला असिला तर जलद मजल दरमजल येणें. उत्तरतीरीं असला तर वजिराहींही न यावें. तुम्ही व राजाराम गोविंद

यांहीं वजिराचा निरोप मागून हजूर येणें म्हणोन आज्ञा; त्यास सरकारचें पत्र वजिरास दिल्हें आणि निरोप मागितला. त्याजवरी वजिरांनीं पत्र वाचून कष्टी जाहाले आणि म्हणाले कीं आज आठ नव महिने मेहनत केली ते व्यर्थ जातें, असें कितीक प्रकारें भाषण जालें. सारांश उदईक कूच करून वजीर मजल दरमजल स्वामीकडे येतात. आम्ही त्यांस निरोप मागितला. त्यांणीं निरोप न दिल्हा. आपण सडा होऊन बाहिरबुणगाह व कबिले वगैरे आटोला[1] मागें ठेऊन जरिदो[2] स्वामीपाशीं येऊन पोहचतों, यास्तव आम्हास निरोप न दिल्हा. उदईक ते व आम्ही येमुना उतरून बराबरच सेवेसी येतों. वजिरांनीं विसा लाखांची टीप लिहून पाठविली आहे, ती सेवेसी पाठविली आहे. येमुना उतरलियावरी अहमदखानाची व हाफिजाची फौज आम्हाबराबर कितीक येते (तें) सेवेसी लिहून पाठऊं. येमुना उतरेल तेव्हां आम्हास भरवसा येईल. जर कदाचित उदईक येमुना न उतरले तरी आम्ही वजिराचा निरोप घेऊन हजूर सत्वरच येतों. श्रुत होये. कृपा केली पाहिजे हे विज्ञप्ति.

¶*Purushottam Mahadeo ordered to repair to his province immediately reports he is being delayed by the Vazir. " The Vazir ", he says " thinks that the sudden departure of Raghunathrao will set at naught the good work of the last ten months."*

---

*No. 159]* *[17-5-1758*

छ २० रमजान

श्री

श्रीमंत राजश्री दादासाहेब
स्वामीचे सेवेसी

सेवक आज्ञाधारीक राघो नीलकंठ सा। नमस्कार विज्ञापणा येसी जे. पूर्वी दोन तीन विज्ञापणा पाठविली आहे. ते प्रविष्ट होऊन सकलार्थ सेवेसी विदित जाहाले असेल. विशेष. विनंती येसीजे. बंगालाचे रुपये अकरा लाख दरबारखर्चीसहित चुकले. त्याची निसा सध्या नख्त होता दिसत नाही. दोन लाख नख्त, बाकीची किस्तबंदी[3], याप्रमाने निसा जाली. शाहाजाद्या याची जागीर वगैरे काम करून देऊन, अलिवारदाखान याचे हवेलीत दाखल करून दिले. साहारंगपूर वगैरे तालुका नजिबखानाखडील, येथील फौजदारी राजश्री विठल सिवदेव याचे वडील

---

१ आटाला = सामानसुमान, खटले. २ जरिदा = सडा. ३ हमेबंदीनें देण्याची फेड.

पुत्राचे नात्री जाली. याणी व वजिरानी मिळून खान मजकुरावर जाऊन, त्यासी तालुकातून काढून, तेथे अमल करावा; यैसे करार जाला. परंतु वजीर खासा जातां दिसत नाही. तोपखाना व फौज आपली समागमे करून देईन यैसे दिसत आहे. राजश्री मुधोजी भोसले देसास जानार; राहात नाही. याजबरोबर अनीकहि लोक दिाा विठलपंताकडील देसी जानार. राा अंताजीपंतासी व यासी श्नेह वैसाख सुध १० बुधवारी जाला. वरकड वर्तमान राजश्री कृष्णराऊ बलाल सेवेसी विनती लिहीत आहेत, त्यावरून विदित होत असेल, आण होईल. बहुत काय लिहिणे. हे विज्ञापणा.

¶*Ragho Nilkanth supplies to Raghunathrao news about the part-payment of the revenue due from Bengal, and the grant of the Foujdari of Saharanpur—Najib's province—to Vithal Shivdeo's son.*

---

*No. 160*] [*3-6-1758*

**श्री**

**श्रीमंत राजश्री दादासाहेब स्वामीचें शेवेसी**

विनंती सेवक आंताजी माणकेस्वर कृतानेक सांं नमस्कार विज्ञापना. सेवकाचे वर्तमान ताा वैशाख वद्य १३ शनवार मुाा सोनपथ सुखी असो. स्वामीची आज्ञापत्रे वरचेवरी आली कीं हुजूर भेटीस येणे. त्या (जवरून) गुरुवारी दिलीहून निघालो आजी सोनपथास पावलो. पुढे दरकूच सेवेसी येतो. पर्जन्य मार्गी अतिशये लागला आहे. परंतु तेसेच येत आहो. वजीर फारच यावयाचा अतिशये करीत होता. परंतु स्वामीची आज्ञा नवती याजकरिता तूर्त राहाविला आहे. सुरजमल पलवलेआलीकडे आहेत. विठलपंत रेवाडीवरी आहेत. शाहाजादा विठलपंतापासी आहेत. नागरमल दलेलसिंग याचे विठलराऊ सुरजमलाचे येकचित आहे. नागरमलाचे चितात निश्चये विठलपंतास सुरजमलास अतिशये करून शाहाजादा सुरजमलाकडे देऊन आपण मधेस्तीसी म्हणून जाऊन तिकडेच राहून बखेडा वाढवावा येसे आहे. होता होईल ते खरे. सेवेसी श्रृत होये हे विज्ञापना.

¶*Antaji Manakeshvar to Raghunathrao giving details of the plans and movements of the Jats and other Sardars.*

---

*No. 161*] [*25-6-1758*

**श्रीगजानन**

**राा व्यकटराऊ व राा यादोराऊ हरि स्वामी गो**

विनंती उपरी. संभुव्याचे मुकामीहून पूर्वी पत्र पाा होते. राा कृष्णाजीपंताचे लिावरून तैसेच जावजी कदमाची रवानगी केली. त्या तो प्रकार तैसाच

होता. त्यावरून दीड प्रहर रात्रपर्यंत चतुर्थीचा गुंता उरकून कूच केले. तो रातोरात दीड प्रहर दिवसात खजुरीपा पावले. दोन कोस हेलपटा पडला. येथे आलों तो श्रीमंताचा मुकाम जाला होता. आम्ही तैसेच चढेस्वारी खेचे सुमारे चालली. दोन तीन कोस पुढे जाऊन उभे राहिलो तोंच बो उभयेता भटजी आले. त्याच्या भेटी जाल्या. त्यापूर्वी रा॥ कृष्णाजी गोपाल भेटले. त्यानी सांगितले की तुंम्ही सत्वर यावे म्हणोन दपाटा (?) लिहिला व थोडेसे श्रीमंत रागेहि भरले म्हणौन लिहिले, यैसे बोलले तों स्वारी खासा येऊन पोहचली. तोवर बसलो होतो घोडेखाली उतरोन उभयेता भटजीसह तो स्वारी आली. श्रीमंती पालखी उतरोन भेटले. पंधरा विसास भेटले. नजर पाच मोहरा केल्या. वंदन करावे लागले. मर्जीसाठी येणेप्रा॥ जाल्यावर फारच समाधान पावले. पालखीत बसून चालले. आंम्ही पालखी धरून च्यार पावले चालताच हात धरून घोड्यावर बसणे, यैसे बरोबर (न) चालणे यैसे बोलले. तो स्वारी पुढे गेली. पाठीमागून रा॥ चिंतो आनंत व चिंतो विठल व आबाजी माहादेव व हरिपंत यैसे रावर्त (?) चवघेजण मुतसदी भेटल. त्यानी सांगितले कीं श्रीमंत बरोबरच चालणे. इतक्यांत रा॥ त्र्यंबकराऊ मामाची व महिपतराऊ पानसे बक्षी व फडणीस चिटणीस भेटले. घोड्यावर बसून धावत श्रीमंताची पालखी आटोपली. श्रीमंती पुसले कीं तुम्ही यावयासी विलंब काय कारणास्तव केला? उतर केले की खासा स्वारी सिपरी कोलारसचे सुमारे नरवराकडून ग्वालेरीस चालली. सबब झासीहून चवदा कोस मजल करून स्वामीकडे येत होतो. मग आपली स्वारी आहारचे मार्गे आली. यास्तव आठरा कोसाचा कूच करून येऊन स्वामीचे पाय पाहिले. त्यावरून बहुत खूश जाले. रियासी आलो. सरकारच्या दरबार जाला. सव्य हस्ताकडे जागा बसावयासी आम्हास दिली. डावीकडे त्र्यंबकराऊ मामास बसविले. देशाचे व सरदाराचे वृत पुसले. तेणेप्रा॥ सागावयाची रीतीने सागितले. समर्पक उतरे जाली. पदोपदी समाधान पावले. वस्त्रे पुढे ठेविली. वंदन जाले. फारच खूश जाले. लिहिता विस्तार आहे. डेरे राहुट्या बरोबर आहेत किंवा नाहीत पुसले. सागितले. चुकासुक पडली. साहेबाचा आजचा मुकाम झासीचा यैकिला होता, सबब बुनगे परभारे वाटे लाविले. सडेच आभुक्त आहो. त्यावरून उतर कले की फारच हेलपाटा पडला. मग सरकारची राहुट्याचा * * वगैरे सरंजाम देविला. जवल उतरणे यैसे बोलले. तुम्ही नारोपंतास लिहून पो॥ की खासा स्वारी झासीस आली हे लिहीणे. त्याणी सत्वर आम्हाकडे यावे. आमचे लक्ष राखावे.

जलद लिहिणे. •ते राहिले तर सडे राहून तीनसे राउतानसी फौज दरोबस्त आम्हाकडे पाा. उतर केले की आज्ञेप्रो लिहितो; आणि बोलले की निरतर वर्तमान लिहीत जावे, यैसे लिा. उतम म्हटले. राा आनंदराऊ मोरश्वर पाछे-परकर भेटीस न आले म्हणौन रागे भरले की त्याचे पारपत्य करीत होतो परंतु तुम्हाकडे पाहून तसेच राहिलो. त्यास तुंम्हीच रागे भरोन फजीत करणे. उतर केले की दूर करितो. त्या उप्रांत बालले की गरिबास दूर न करणे; परतु तुम्हीच तोडावर देणे. माझी जागा आसून भेटीस न आला हे कोण शाहाणपण? त्याचा आन्याये जाला, क्षमा करावी यैसे बोललो. उतर केले की तुम्हाकरिता क्षमा केली. झासीचे वृत पुसले. उतर केले कीं नवी वस्ती थोडी थोडी होत आहे. स्वामी प्रतापे सर्व उतम होईल. विडवर फार या प्रांते आहे. हे सर्व सुचविले. श्वान करावे यैसे उतर केले. मग निराल्या राहुट्या दिल्ह्या. तेथे येऊन राहिलो. हिसेबाचा कारभारी यानी उहू केला. उतर केले मग विनंती करू. कृष्णाजी गोपाल केवळ लबाड आहे. सागता विस्तार आहे. उगेच हाताखाली घेतला आहे. तुम्हास सविस्तर कलावे म्हणौन लिा आसे. घरांत वाचून दाखवणे. तुम्ही उभयेता व जावजी कदम सरनोबत यासी वाचून दाखवणे. उद्या फार करून येथे मुकाम सोमवाराकरिता होणार. छ १८ सवाल रविवार मुाा खजुरा हे विनंती. पूर्वी लिाप्रो साहित्य करणे. शाकभाजी पानेपत्रावली खडीसाखर पाा. श्री लक्ष्मीस व बाइकास खाली उतरोन देवणे. जावजीबावास सविस्तर सांगितले आहे. * * * * बायेकास यादोपताचे घरी ठेवणे.

¶*Raghoba returning home.*

---

*No. 162*] [*24-7-1758*

**श्री**

**श्रीमंत राजश्री भाऊसाहेब स्वामीचे सेवेसी**

विनंती सेवक त्रिंबकराव सिवदेव कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती विज्ञापना. तागायेत छ १८ माहे जिल्काद जाणून स्वामीचे कृपेकरून सेवकाचें वर्तमान येथास्थित असे विशष. श्रीमंत राजश्री दादा स्वामीनी देशास जावे म्हणोन आज्ञा केली. त्यावरून राजश्री गोविंद बलाल याजपासून निरोप घेऊन जेष्ठ वद्य प्रतिपदेस निघोन मालवे प्रांती प्रगणे आगरास आशाढ सुध त्रयोदसीस आलो. येथील बंदोबस्त पंधरा दिवसामध्यें करून कूच करून स्वामीदर्शणास येतो. राजश्री समशेरबाहादर याणी हिंदुपताची मामलत चुकऊन खिचीवाडे या प्रांतास

आले. रा गोविंदपंत व राजश्री माहादाजी गोविंद उभयता श्रीमंत राजश्री दादा स्वामीकडे जाणार होते. श्रीमंत राजश्री दादा स्वामी लाहूर प्रांतीचा बंदोबस्त करून अबदालीचा पराभव करून माघारे जयनगर प्रांतास आले. रा जनकोजी सिंदे उमेदसिंग शाहापुरवाला उदेपूरच्या राज्याचा पटाईत रजपूत त्याचे स्थलास लागले आहेत. त्यास शाहापुरावरून मार्गी येता उमेदसिंगाची मामलत चुकऊन राजश्री जनकोजी सिंदे यासी मारवाड प्रातास रवाना करून मजल दरमजल देशास श्रावण अखेरपरयेत येतील. वरकड वृत सेवेसी आलियावर निवेदन करू. मजला स्वामीच्या चरणाखेरीज दुसरा आर्थ नाही. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*Trimbak Sivdeo, returning South, writes to the Bhausaheb of Raghoba's victory over the Abdali and the conquest of the Punjab.*

---

*No. 163*] [*5-9-1758*

पौ छ ४ सफर उर्फ

आश्विन सन तिसा

**श्रीकृष्णोजयेति**

**श्रीमंत माहाराज धर्मधुरंधर अधिकप्रताप माहाराज पंडितप्रधान बालाजीराव स्वामी गोसावी याचे सेवेसी**

स्नेहांकित राजा केशवराव कृतानेक नमस्कार विनंती उपरी. येथील क्षेम ता छ १ मोहरम भाद्रपद शुध ३ मुकाम झासी जाणून स्वकुशल लेखनाआज्ञा केली पाहिजे विशेष. कृपा करून पत्रोत्तर पाठविलें, ते पाऊन परम संतोष पावलो. आम्ही दिल्ली आबदाली तेथें आला त्या दिवसापासून आपले धर्म-संरक्षणार्थ सोडली. सर्व घरें वस्तभाव टाकून कुटुंब पुत्रपौत्र दोन्ही अग्निहोत्रे पित्रापुत्राची घेऊन माहाराजाचे छायेखाले माहाराजाचा झासी किलियाजवल येऊन शहरांत राहिलो. राजश्री नारो शंकर असतांच त्याही आणिले व जागा घर माहाराजाची आज्ञा त्यांस पावली. त्या साहित्याने सुखरूप स्नान संध्या करून या प्रांतीची तीर्थे केली. तो सर्व माहाराजाकरितां आम्हास प्राप्त जाला. आतां माहाराजावाचून आश्रये नाहीं. आज्ञा निरोपिली कीं लाहान थोर वर्तमान सदैव लिहीत जाणे. त्यास आज्ञेप्रमाणें पूर्वी लिहिले. सांप्रतीहि लिहिले असे. सारांश माहाराजास ईश्वरे संपूर्ण समुद्रवलयांकित पृथिवीचे राज्य जालें, असा प्रताप ब्राम्हणांत तो कोणाचा यैकिला नाही. दिलीचे पातशाह वजीर व पातशाहजादे दुर्भाग्येकरून परस्पर घरफुटीमुले हलके जाले. सदैव कोणाचा

काल येकरूप असतो ? आता ईश्वर माहाराजाचे हातें संपूर्ण विश्वास अन देणार. पूर्वील मुलकाखेरीज लाहोरचा सुधा अटकपावेतो दा करोडाचा मुलक या साली माहाराजाचा जाला. आतां पश्चमेस मुलतान काबल व पूर्वेस बंगाला व आयोध्या प्रयाग राहिली. त्यांत कितेक मुलक माहाराजाखालीच आहे. कुरुक्षेत्र व प्रयाग व वाराणसी व गया येथे येवनाचे नाव काशास ? माहाराजासारिखा गोब्राम्हण-प्रतिपालक असता हा मनोरथ संपूर्ण विश्वाचा जाला पाहिजे. एका वरसाचे काम असे. सरदार तो या साली दक्षणे महर्गमुले न जाता छावणीस राहिले. त्यास आज्ञा जाली म्हणजे पारपत्य जाल्यांतच आहे. आम्ही आपले स्वास्थ्या-विषई लिहावे तरी माहाराजाचे पदरचे आहोत. आम्हास काये चिंता ? वये आमचे सेवटास तीर्थवासायोग्य जाले ते करितों. पुत्रपौत्राचा निर्वाह माहाराज विश्वकुटुंबी आहेत तो करितील. आम्हास चिंता नाही. कृपा वर्धमान केली पाहिजे हे विनंती.

¶*Raja Keshavrao to the Peshwa informing him that he has repaired to Jhansi owing to the fresh inroads of the Abdali in the North, especially in Delhi. The Imperial power at Delhi, he says, has been considerably impaired owing to domestic troubles. He further compliments the Peshwa for the valour he displayed in conquering the northern territory up to Attock.*

---

*No. 164*] [*27-9-1758?*

छ २२ सफर

**श्री**

सेवेसी विज्ञापना. राजश्री बापूजी महादेव व याचे बंधू व त्रिंबक मल्हार मारनिलेकडील ऐसे कैद केले आहेत. हती घोडे उंटे सर्व वस्तभाव त्याची जप्त केली आहे. त्यास मर्जीप्रो रुपया कबूल केला तरी याचा फैसला करितो. न करी तरी हुजूर वडिलाकडे पाठऊन देतो. रवाना छ २३ मोहरम. बहुत काय लिहिणे हे विनंती.+

¶*The Peshwa is informed by Raghunathrao (?) of the arrest of Bapuji Mahadeo Hingne and his brother and Trimbak Malhar until they agree to make the payment.*

---

+ पत्र रघुनाथरावाचें नानासाहेबास असावें. (पहा खं. ६ ले. ३८३, ३३४ व ४७१.)

२ रावल सन तिसा

# श्रीकृष्णोजयेति.

श्रीमंत माहाराज राजमान्य राजश्री
रघुनाथराव दादा स्वामीचे सेवेसी

ांकित राजा केशवराव कृतानेक नमस्कार विनंती उपरी. येथील क्षेम ताा तफर मुकाम झासी जाणून स्वकुशल लेखनाज्ञा केली पाहिजे विशेष. ा करून स्वामीनें आमचे पत्राचे उतर लेहोन पाठविले. त्यांत आज्ञा ारी तुम्हास पुढे झासीत राहाणे आसेल तरी सुखरूप राहाणे. व जरी जायाचे आसेल तरी तेथे जाणे. पूर्ववत तुम्हापासून पातशाह व वजीर ील. जरी म्हणाल तरी सर्वास तुम्हाविषई पत्रें साहित्याची पाठऊ." माहाराजाही जे कृपेकरून लिहिले ते प्रमाण. आम्हास पातशाह वजीर बोलाविताती व लिहिताती. कोण्ही वर्जीत नाहीत. आगर तेथून ून निघालो नाही. आपला स्वधर्म मुख्य जाणून, आबदाली दिलीस तेव्हा नीट पातशाहापासून निरोप घेतला कीं, "तुम्ही आबदालीसी युध तरी, आम्ही तुम्हाबाा मरायास सिध्र आहों ; जरी तुम्ही हात जोडून ो, आम्ही दोनी दिवस येथून जातों की तो दुष्ट, आमचा धर्म न राहे ; ?" असे म्हटले. त्याही आम्हास म्हटले की, "भांडायास आम्हास शक्ति ुम्ही दोनी दिवस कोठे जाणे. स्वस्थ होईल मग येणे." यावरी आम्ही न आज्ञा घेऊन, निघोन मथुरेस आलो. तो मागाहून अबदाली येऊन, अवस्था केली ; दोनी दिवस आगोधर आम्ही सकुटुंब निघोन नीट धे शमशेर बाहादूर व राजश्री नारो शंकरास भेटोन, याचे विचारें हाराजाचा तालुका धर्मराज्य जाणून तेथेंच स्थिती करून आग्निहोत्रें ापुत्राची चालताती व येथें राहनेहि रिकामे नाही. पातशाह वजीर पत्रे लिहितो व त्याची उतरे सदैव येताती व ते वारंवारा बोलाविताती. ् स्थिती नीट नाही. आम्ही जाऊन काये करावे ? येक माहाराजाच रुन झांसीस आहोत. येथे आल्यास, येथून माघस्नानास प्रयागास ालो. दुसरेदा वैशाखस्नान श्रीप्रयागी करून आलो. हे पुण्य आश्रये करून आम्हास प्रात जाले. जरी माहाराज दिली प्रांती ो माहाराजाजवल येतो. दिलीची व वजीर पातशाह वगैरेची रीती माहाराजास विदित आहे. पूर्वील अवरंगजेबापासून आम्ही पाहात

आलों ते नाही. याजकरिता माहाराजाचे धर्मराज्यांत राहून, स्नानसंध्या करून कालक्षेप उतम करीत आहो. पुढे माहाराज या प्रांतास येतील व आज्ञा करतील म्हणजे माहाराजाचे दर्शन घेऊ. माहाराजास आमचा निर्वाह करणें आशक्य नाही. ब्राम्हणानेकरून निर्वाह होत आसता, येवनान्न कशास अंगिकार करावा? काकमांसं[1] शुनैर्मुक्तं स्वल्पंतादपि दुर्लभं आसे येवन राज्याचे आसे. लक्षावधि आम्हासारिखे महाराचाचे संगृही असतां, आम्हास उणें नाही. आम्हीहि माहाराजाचे त्रिपुरुषांपासून स्नेही आश्रित आहोत. नवे नाहीत. विशेष काये लिहावे? हे विनती.

*¶Raja Keshavrao, Peshwa's agent at Delhi, intimates to him that it was not on account of any differences with the Emperor or his Vazir that he left Delhi and went to Jhansi. "Both he and the Emperor are", he says, "in cordial correspondence since then. He left Delhi because he could not tolerate the interference of the Abdali with his religion whom he was prepared to face provided the Emperor showed enough strength and firmness."*

---

*No. 166]* *[16-12-1758*

पौ छ १७ रजब सन तिसा

## श्रीशंकर

### श्रीमंत राजश्री रावजी
### स्वामीचे शेवेसी

पोष्य सदासिव बलाल कृतानेक सां नमस्कार विनंती. ताा मार्गेस्वर वद्य २ मंदवार मोा सिरसा येथे आसो विशेष. स्वामीनी पत्रे पाठविली पावली. कल्याण-सिंग यास स्वामीचे पत्र होते ते भल्या माणसाबाा मौजे आमखेडा येथे पाठविले. त्यास गडीत भल्या माणसास न घेतले. पत्र मात्र घेऊन गेला. चोपदार आणि प्रात:कालापासोन दरवाजे याजवल भला माणूस बसला, तो आस्तमानपर्यंत बसला तेव्हां उतर दिले ते बजिनस पाठविलें आहे. गोंद लाविली होती त्यास आंतील मार कलावयाकरिता आंम्ही लाखोटा पोडून पाहिला. गव्हार माजला आहे! बरे, आंम्हास पत्र लिा आसो. स्वामी खावंद साहेबसुभा आहेत. स्वामीचे पत्री सोखी जबरदस्ती लिहिली आहे. जर आपणात खावंदगिरीचे तेज आसेल तरी गव्हारांचे पारपत्य आति सत्वर करावे. जर स्वामीची फौज व राजश्री भाऊ येतील तरी आमेखेडियांत कल्याणसिंगास जिवत धरून, स्वामीपासी आणून

---

१ हा श्लोकार्ध बालबोधींत आहे.

हजीर करूं तरीच तोंड दाखऊ. नाही तर तोंड दाखवणार नाही. तीर्थयात्रेस याच मार्गे जाऊ. हे स्वाम न करीत तरी, स्वामीचे तेज नाही. पत्र पाहिल्यावर आंगाची आग्न जाली, ते ईस्वर जाणे ? पंचम ब्राह्मण तेथे गेला आहे. त्यास समीप येऊ न द्यावा. काढून द्यावा. आणि पत्र पावेल ते क्षणी राजश्री भाऊची बिदा करावी. राजश्री गंगाधरपंती उमेद महता याकडे दोन वेल पाा जे, त्या गावासी खरखस्ता न करणे. परंतु न आइकिले. राजश्री गंगाधरपतास आम्ही लिा. त्याणी दोनसे प्यादे आंम्हापासी पाा. आम्ही शभर माणूस जमा केले. तेव्हां त्याचे न चालिले. येरवी गावावर चालोन येणार होता. आम्हांस काढून देणार होता. राजश्री गंगाधरपंताची काडीमात्र कानगी नाही. स्वामीचे पत्र त्यास पाा नाही. श्रमी होतील यास्तव गांव पेसर्जी जालिले यामुले सिरसा व गिदोसा उजाड जाले. गोरगरीब रयेत पलाली. आमचे काम बंद जाले. खबर घेणे आसेल तर, सत्वर घ्यावी. नाही तरी आज्ञा जैसी कर्णे आसेल तैसी करावी. गव्हाराचा गर्व परिहार कराल, तरीच स्वामीचे तेज आहे. सेवेसी श्रृत होये. हे विज्ञापना. राजश्री आपा स्वामी यासी साा नमस्कार. श्रीमंताचे पत्रावरून सर्व विदित होईल. नक्ष रक्षावा. हे विज्ञापना.

¶*Sadasiv Balal reports to his master the disorders raging in Bundelkhand. "Only a strong man of the Bhau's calibre can cope with this situation", he remarks.*

---

*No. 167]* *[28-12-1758*

छ १ जावल सन तिसा

**श्रीमोरया**

**श्रीमंत राजश्री दादासाहेब स्वामीचे सेवेसी**

विनंती सेवक गंगाधर येशवंत कृतानेक सां नमस्कार विज्ञापना. येथील कुशल ताा मार्गसीर्ष वद्य १३ मुाा काा चांदवड स्वामीच्या कृपावलोकनेकरून येथास्तित आसे विशेष. पत्र पाा तें पाऊन हर्श जाहला. राजश्री सुभेदार याचे शरीरी वेथा अतिशये जाहली. सांप्रत्य ईस्वरइछेने व स्वामीचे कृपेने आरोग्यता आहे. राजश्री जनकोजी सिंदे व राजश्री दताजी पाा तिकडे गेलेत. सुबेदार सेंदवियास आले. मांडव्यापासून सेंदवियापरियेंत भिलाचा दंगा बहुत. याच्या बदोबस्ताकरिता तेथे राहिलेत. सरहंदेस पत्रे रवाना करावी म्हणून आज्ञा. त्यासीं आम्ही इकडे आलो. पत्रा(ची) रवानगी केली. भेटी होऊन पाये द्रिष्टीस (पड)तील तो सुदिन आसे. शेवेसी श्रृत होये हे विज्ञति.

¶*Gangadhar Yeshwant reports the illness of Malharrao Holkar to Raghunathrao.*

No. 168] [10-2-1759 ?

श्री.

चिरंजीव राजश्री भाऊ यांसी बालाजी बाजीराव प्रधान आसीर्वाद उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहीत जाणे विशेष. छ ९ जमादिलाखरची पत्रे पाठविली ती छ १० मिनहूस पावली.

माहादाजी गोविंद याचे पत्र आले. आगरियाचे किल्याचे राजकारण आहे. तीन लाख रुा द्यावे लागतात व किलेदारास दाहावीस हजाराची जागीर द्यावी लागेल. न घेतल्यास जाट घेईल म्हणून लिहिले ते कलले. ऐसियास ते स्थल घेतल्यास जाटासी अति विरोध पडला व वजीरहि पातशाही स्थल गेले म्हणजे वाईट मानील. तथापि अपूर्व स्थल आहे ते घ्यावे. त्यास हिंदुस्तानास फौजा दसरियानंतर निघतील दबाव पडत जाईल त्या दिवसात घ्यावे. कोणी वेढा घालू सकणार नाही. कुमक होईल हा उतम पक्ष. दसरियापावेतो राजकारण राखून त्या दिवसात करावे. जर राजकारण तुटत असेल अथवा दुसरियाचे हाती स्थान जात असेल तर येव्हाच करावे. परंतु दतबास आगोधर इतला देऊन करावे. येथूनहि त्यास पत्र पाठवावे.

गोविंद बलाल याची पत्रे आली त्याचेहि उतर गेले पाहिजे म्हणून

जगतराज मृत्य पावले. राज्यावर वडील लेकाची स्थापना करावी. त्यास जगतराज असतां धाकटे लेकास आधिकारिले केले आहे. त्यास हें राजकारण समसेरबाहदर यांसहि ठावके आहे. हाली गोविंद बलाल याणी लिहिले आहे वडील लेकाची स्थापना केल्यास पंधरा (ल)क्ष रुा नजर घ्यावी. येविसी काये आज्ञा म्हणून विस्तारे लिहिले ते कलले. त्यास गोविंद बलाल ते काम मन घालून करणार नाहीत व तूर्त ते अंतरवेदीत आहे. कागदीपत्री रुा येत नाही. तूर्त काही लिहू नये. पुढे समसेरबहादर अथवा विठलपंतास रवाना करावे. यानी जाऊन करावे तूर्त होणार नाही.

लिहिले ते कळले. ऐसियास ती पत्रे येथे आली नाहीत. तेथूनच उतरे द्यावी.

छ ११ जमादिलाखर हे आसीर्वाद.

*¶Peshwa's letter to the Bhausaheb containing instructions regarding the occupation of the fort of Agra and the succession after the demise of Jagatraj Bundele,*

---

*No. 169]* *[21-3-1759*

पौा १८ स * * सितैन

**श्री**

शेवेसी विज्ञप्ति ऐसीजे. दिनचर्येचें वर्तमान छ २१ रोज बुधवार माहे रजब आखर रोज. दोन घटका दिवस बाकी राहातां स्वार जाले. स्वारी पालखीची. बसालतजंगाचे डेऱ्यास गेले. त्याणी येक मोहर पांच रुपये नजर केले. घटकाभर तेथें बसून संध्याकाळीं आपल्या डेऱ्यास आले. हुकूम कूच. वकील रामनारायेण याची दिलीहून अर्जी आली ते गुजरानली. वजिराचा व सिंद्याचा बिघाड जाला होता तो सल्लक जाला. जनकोजी सिंदे व दत्ताजी सिंदे दिली-पलिकडे साठ कोस कर्नालेस गेले. इरादा लाहोरास जावयाचा आहे. शहाजादा प्रयागास गेला. सुजायतदौला मनसुर आलीखानाचा लेक त्यास भेटला. पांच लक्ष रुपये दाहा हाती व दाहा घोडे नजर केले. प्रयागच्या किल्याची सनद करविली. जगतशेट बंगल्यांत त्याचा भाचा हुकूमचंद शहाजाद्यापासी आला. बंगाल्यास शहाजाद्यास घेऊन जाणार. त्याचा खर्च कबूल केला म्हणून आर्ज जाली.

छ २२ रोज गुरुवार दोन घटिका दिवस आल्यावर स्वार जाले. स्वारी पाल-खीची. मजलीस मुतवजे[१] जाले. मुसाफत तीन कोस सतर जरीब मुकाम मौजे जाखपली परगणे जलपली सरकार खमम प्रहर दिवसा डेरेदाखल जाले. झुलपि-कारजंगानी आपलें कुटुंब कोंडपलीस होतें तें खममचे किल्यास पाठऊन आपण व अपाराव जमीदार येलुराकडे गेले म्हणून अर्ज आली. आखर रोज तीन घटिका

---

१ मुतवजे=गमन करते.

2368

दिवस राहातां खिलवतेंत आले. बसालतजंग व गुलाम नक्षबदखां व राये रायां व बिरजनाथ बारयाब जाले. जाबसाल करून येक घटिका दिवस राहातां बरखास्त. हुकूम कूच.

छ २३ रोज शुक्रवार घटका दिवस आल्यावर स्वार जाले. स्वारी पालखीची. मजलीस मुतवजे जाले. वाटेने येतां स्वारी हतीची मुसाफत साडेच्यार कोस जरिदी मुकाम मौजे बहिरामपाला परगणें नालकुडपली येक प्रहर दोन घटका दिवसा डेरे दाखल जाले. अखर रोज पांच घटिका दिवस राहातां स्वार जाले. स्वारी पालखीची. शाहा गुजराथी फकीर याच्याथें गेले घटका येक तेथें बसले. भाजी व भा(अपूर्ण)

¶*News from the court of Hyderabad is reported. There is a reference to Sindia's differences with the Vazir and their subsequent reconciliation.*

---

*No. 170]* *[22-3-1757*

पो छ १८ रमजान

श्री

तीर्थरूप राजश्री नाना वडिलांचे सेवेसी

आपत्ये सगुणेने नमस्कार विनंती. येथील कुशल ताा चैत्र सुध त्रितीया मंदवार मुक्काम झोंसी नजीक प्रयाग गंगापार सुखरूप पावलों विशेष. कुराजाहानाबाद येथील मुकामीहून पत्र लिहिलें त्याजवरून श्रवन जालेंच आसेल. उपरांत तेथून कूच करून फाल्गुन वद्य चतुर्दसीस प्रयागास आलों. दखणीराऊ दिवाण नवाब महमदकुलीखान यांकडील प्रयागापासून पांचा कोसावरी अलमचंदावरी येऊन भेटला. वेणीसंगमी त्रिरात्री राहून तीर्थविध उरकिला. उपरांत कालीं चैत्र सुध द्वितीयेस पार उतरोन येथें मुक्काम केला. उदईक कूच करून पुढें श्रीस जात असों. नवाब सुजातदौला यांजकडील नारायेणराव पंचवीस स्वारानसी जांगिराबादेचे मुकामीं येऊन भेटला. नवाब सुजातदौला यांचा व बलवंतसिंगराजे यांचा बिघाड जाला होता, यामुळें नवाबानें बलवंतसिंगावरी मोहीम केली. बलवंतसिंग पार उतरोन पलोन गेला, त्याजवरी याणी पूल बांधोन पार गेले. लतीबपुरचा किला नवाबाने घेतला. जबरदस्ती पोहचलियावरी बलवंतसिंगानें सल्लख केला. पंचवीस लाख रुपये देऊं केले. कार्य जालियावरी नवाबाने बलवंतसिंगाची ठाणी माघारीं दिल्हीं. नवाब अयोध्येस गेले. नवाब महमदकुलीखान प्रयागाचा सुभा आजी येऊन दाखल जाला. राजश्री गोविंद बलाल व रा गोपालराव गणेश यांचा आंतरवेदीतील माहालांविशीं पेशजीपासून

कजिया लागला आहे. रा हरि विठल मधें पडोन निमेनिम माहाल वाटून घ्यावे म्हणून करार केला. त्यापैकीं कांहीं माहाल तेव्हांच गोविंदपंताकडे दिल्हे. बाकीं च्यार पांच माहाल द्यावयाचे राहिले ते आजी उद्या देतो, असेंच करितां आठा-दिवसी देत नाहीं म्हणून सांगितले. उभयेतानी समजलियाची पत्रें वडिलांस लिहिली होती. त्याचें प्रत्योत्तर आले कीं निमेनिम समजला, उतम केलें; निमेनिम आमल करून येकमते राहाणे म्हणून. ते पत्र गोविंदपंती दाखविलें. त्याजवरी हरि विठल व हे उभयेता ब्रम्हवर्ताचे मुकामी येकत्र करून वर्तमान मनास आणिले. कोण्हे गोष्टीचा तह न बने. हरि विठल कालपीस गेले. उभयेता जागिरांबादपावेतों समागमें आले. तेथें गोपालराव यांसी सांगितले कीं तीर्थरूपांच्या पत्राप्रमाणें आमल गोविंदपंताचे स्वाधीन करणें. त्याणी उत्तर दिल्हे कीं बाहालीची सनद आलियाखेरीज आमल देत नाहीं. त्याजवरी गोविंदपंतास सांगितले कीं दुसरी सनद आणवून आमल करणें. त्याणी उत्तर दिल्हें कीं याच पत्रावरून आमल घेऊ. सेवटीं उभयतांचे रहश्य न जाले. त्यांचा मुकाम जागिराबादेवरी आहे. आम्हीं पुढे आलों. वडिलांस कलावे, म्हणून लिहिले असे. बहुत काय लिहिणे हे विनंती.

*¶Sagunabai communicates to Nana news from the North—her reception by Shuja's officer, Shuja's expedition against Balwantsing and the bickerings between Govindpant Bundele and Gopalrao Barve. This Sagunabai is the widow of Janardanpant, the Peshwa's brother, and appears to have stayed on in the North for a couple of years.*

---

*No. 171]* *[15-4-1759*

छ ९ सवाल तिसा

श्री

श्रीमंत राजश्री रावसाहेब स्वामीचे सेवेसी

विनंती सेवक जनकोजी सिंदे कृतानेक दडवत विज्ञापना. सेवकाचे वर्तमान तागाईत छ १७ साबान मोकाम सतलुज नदी स्वामीचे कृपेकरून येथास्थित असे विशष. आज्ञापत्रे छ २९ रबिलाखरचीं पाठविली ती छ १९ जमादिलाखर पावली. तेथे आज्ञा कितेक मनसब्याचा आर्थ व बंदोबस्ताविसी वगैरे वर्तमान तपसीलवार आज्ञापिलें, ते कललें. ऐसियास आज्ञेप्रमाणे सर्वही बंदोबस्त उतम प्रकारे होऊन येईल. वरकड अर्थ अलाहिदा पुरवणीपत्री सेवेसी विनंती लिहिली असें त्यावरून विदित होईल. सेवेसी श्रुत होये हे विज्ञाति.

*¶Jankoji Sindia from his camp on the bank of the Satlaj assures Raosaheb that the task assigned to him will be executed faithfully.*

No. 172] [7-5-1759
[27-5-1760

श्री

सो विज्ञापना विज्ञाप्ति ऐसीजे. उदेपूरचा पैका राणाजी देत नाहीं एताद्विषी सरकारची पत्रे द्यावयाची आज्ञा केली पाहिजे.

२ राणाजीस पत्र कीं तुम्हाकडे पव्याबाा चौसाला रुपये व मबलग येणे व जनकोजी सिंदे याच्या विद्यमानें ऐवज ठरला तो पत्र दर्शनीं रोजीन्यासुद्धा[१] ऐवज राजश्री गोविंद कृष्ण याचे पदरी घालणे. फिरोन बोभाट आलिया फौज पाठवून रुजू घेतला जाईल. मुरवत राहणार नाहीं. म्हणून पत्रे

१ राणाजीस पत्र

१ जसवंतराव प्रधान यास पत्र

---

२

१ राजश्री मल्हारजी होळकर यास पत्र कीं राणाजीस शह पोहचाऊन पव्याबद्दल वगैरे रुजुवाती चौसाला झाडबाकी राजश्री गोविंद कृष्ण याजकडे ऐवज देवणे म्हणून पत्र.

१ गोविंद कृष्ण याच्या नांवें पत्र कीं राणाजीकडील पव्याबद्दल वगैरे रुपये येणे ते बेमुरवत होऊन ज्या रीतीनें निघतील त्या रीतीनें सरकारचा पैसा रोजीन्यासुद्धा घेणे. येतद्विषी राजश्री मल्हारजी होळकर यास पत्र दिल्हे असे. कलेल तैसा निकाल करून झाडबाकी करून घेणे म्हणून पत्र

---

४

चार पत्रे द्यावी. देणें.

छ ११ सवाल जेष्ठ सितैन

¶*The letter contains drafts of four despatches to be sent to the Rana of Udaipur, Malharrao, Jasvantrao, the minister of the Rana, and Govind Krishna regarding the payment of the money due from the Rana who refused the payment.*

---

१ दैनिक खर्च.

No. 173] [28-9-1759

श्री

दत्ताजी सिंदे यांस पत्र द्यावें कीं राजश्री गोपाळराव गणेश यांणीं शाहाजाद्याचें राजकारणाचा प्रसंग लिहिला त्यास शाहाजाद्या चांगला माणूस आहे. तुम्हास उपयोगीं पडल्यास शाहाजाद्याचें राजकारण राखून ठेवावें. पाहून थोडें बहुत खर्चासही गोपाळराव यांचें मार्फतीनें द्यावें लागेल. येणेंप्रमाणें लिहून श्रीमंतांस दाखवावें. येणेप्रमाणें आज्ञा जाहाली.

छ ६ सफर सूरसन सितैन अश्विन.

*¶Dattaji Sindia is advised to open negotiations with Shahzada as he may prove a useful instrument.*

---

No. 174] [10-11-1759

श्री

शेवेसीं नारायेणदास विज्ञापना ऐसीजे. आपले वडील बंधु गोवर्धनदास श्रीनाथजी द्वारावरून माहायात्रेस जाणार. ऐसियास कृपाळू होऊन मार्गी कोणे-विशाई उपसर्ग न लागे येविशाई सरकारचे कमाविशदारास व मोंगलास साहित्यपत्र

१ बलवंतसिंग कासीचा राजा
१ प्रयागचा सुभा
फारसी १ सुंदरशा गयाचा राजा
फारसी १ राम नारायेण पटणवाला
फारसी १ मनसुर आलीखानाचा नायक अयोध्येस आहे त्यास
१ शाहदाढा येथील कमाविसदारास पत्र कीं तुम्हीं खरगोन नर्मदेपावेतों स्वार प्यादे देऊन पोंहचावणें म्हणोन नारो बलाल
१ कृष्णराव रामचंद्र कमाविसदार सरकार बिज्यागड व
१ इंदुरच्या कमाविसदारास जिवाजी शिंदे कृष्णाजी पवार
२ शाहज्यापूर व सारंगपूर येथील कमाविसदारास
१ उजेन येथील कमाविसदारास पत्र कीं सिरोजपावेतों बदरका देऊन पावतें करणें म्हणून. पुढें श्री नाथजीस जातील, स्वार वगैरे देऊन पावते करणें म्हणोन.

१ गोविंद बलाल यास

१ माहादाजी गोविंद झासीकर

१ गोविंदपंत वैद्य रुजू गणेश संभाजी

१ गोपालराव गणेश बर्वे कुराजैनाबाद

३ अमानसिंग वगैरे बुंधले

१ मशारनिले हिंदुपत ३

१ जगत राज * ३ पाहडसिंग

१ सभासिंग २

—

३

१ बगेल्यास

१ अंतरवेदींत रूपराव खेचर जमीदार

१ प्रतापगडच्या राजास

१ वकिलास पत्र जे प्रयागचे सुभा यास सांगून मशारनिलेचे सर्व प्रकार साहित्य करणें म्हणोन प्रयोगचे वकिलासी येक पत्र * * यादवराव याचा * *

१ उदेपूरचे राणाजीस पत्र कीं मशारनिले तेथ व नाथाजी-द्वारावरीच सा महिनें राहतील तरी हरयेक गोष्टीचा परामृश करणें. आपले पदरचे आहेत सर्व प्रकार मशार-निलेचा साहित्य होय तो अर्थ करणें. परंतु येतात तेव्हां बदरका देऊन उजण बुरानपूर पावत करणे. जे काय गोष्टी सांगतील ते मान्य करून कार्या करून दिल्हें पाहिजे.

१ उदेपूर येथील वकिलास गोविंद कृष्ण पत्र कीं मशारनिले तेथें येत आहेत तर मार्ग कठीन. ऐसियासी तुम्ही राणाजीस सांगून स्वार वगैरे पुढें पाठऊन मशारनिलेस घेऊन जाणें. तेथून श्री नाथजीद्वारास जातील तरी बदरका देऊन पावता करणें. तेथें कांही दिवस राहातील. सर्व प्रकार गौर करणें. तेथून परतून येतां वेळे बदरका देऊन उजेण बुरानपूर पावत करणें

२ याखेरीज बुदिका वावदे पालपूर व नवलाई वगैरे राजास
पत्र द्यावें दस्तक राहा(दा)रीचे
१ वासुदेव संभाजी कमाविसदार देपाळपूर
त्रिंबक राजदेव काादार नवलाई.

---

२९

येकून येकुणतीस पत्रें द्यावयाची आज्ञा करावी. सदरहूप्रमाणें पत्र देणें म्हणोन. येणेप्रमाणें साहित्यपत्रें व येक पत्र सेट गोवर्धनदाससेट यास कीं साहित्यपत्रें पाठविलीं ते पावतील सुखरूप यात्रेस जाणें ऐसें देणें. छ १९ रबिलावल सुर सितैन कार्तिक.

लिहिणे.

¶*The paper gives the names of the Peshwa's officers in the North. Letters have been issued guaranteeing a safe passage to one Gowardhan Das going on pilgrimage.*

---

*No. 175*] [*15-11-1759*

पा छ २४ रबिलोवल
कार्तिक सितैन

**श्रीवेणीमाधव**

**श्रीमंत माहाराज राजेश्री**
**पंतप्रधान स्वामीचे सेवेसी**

विनंती आज्ञाधारक त्रिंबकराव कृतानेक नमस्कार विज्ञापना. सेवकाचें वर्तमान तागायत छ २४ मोहरमपर्यंत माहाराजाचे कृपेकरून मुकाम श्री प्रयाग येथास्थित आसे विशेष. माहाराजाचें कृपापत्र पाऊन चित्तास परम धैर्य व आनंद प्राप्त जाला. सेवकाचेविषई आज्ञा जाली कीं श्रीमंत राजश्री दादासाहेब त्या प्रांतीं येतील. त्यांस तुम्ही सर्व आर्थ विदित करणें. तुम्हांपासून सेवा घेऊन ऊर्जित करतील. त्यास माहाराज कृपावंत जालिया माझें ऊर्जित हो यांत कोण संदेह आहे ? मुख्य माहाराजांची कृपा पाहिजे. मी सेवक पदरचा श्रीवेणिमाधवाचे चरणाजवळ माहाराजाचे सुभचिंतनी तत्पर व सेवेंत सादर आहे. रात्रदिवस श्रीवेणीमाधवास हेंच मागतों कीं माहाराजाच्या आयुष्याची व प्रतापाची व येशाची वृधी होये व त्रिस्थलींत सरकारचा आमल होये. मनोरथाचा दाता श्रीवेणिमाधव आहे. सर्वहि घडोन येईल. सांप्रत्य या स्थलीं बकाउलाखान

सुजाउदौलाच्या तर्फेनें सुबा व गुलाम हुसेनखान चेला किलेदार आहे. मीर बहरी किलेदाराकडे आहे. यात्रकरांस पहिलेसारखा उपसर्ग नाहीं. माफिक मामूल महसूल घेतो. व सरकारची लिहिली पुसली ज्याजपासीं आसली त्यास मुजाहिम[१] होत नाहीं. सेवक यात्रकरांचे कार्याविषई तिलतुल्य आंतराये करीत नाही. मिरजा कोचक पहिला सुबा लखनौत सुजाउदौलाच्या कैदेत आहे. बंगाल्यातहि परस्परे विरुध आहे. या प्रांती फौजा आलिया बंगाल्यापावेतो मुलूक हस्तगत होणे काही कठीन नाही. व सेवकाच्या चाकरीचा मुजरा त्यासमई दिसोन येईल. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*One Trimbakrao from Prayag writes to the Peshwa that good treatment is being meted out to pilgrims by the new Suba.*

---

*No. 176]* *[24-11-1759*

पो छ ७ माहे जमादिलावल सन तिसा

## श्रीकृष्णोजयति

**श्रीमंत माहाराज राजश्री पंडितप्रधान माहाराजाचे सेवेसी**

पो राजा केशवराऊ सा नमस्कार विनंती उपरी. येथील क्षेम ता छ ३ राखर मोकाम झासी जाणून स्वकुशल लेखनाज्ञा केली पाहिजे विशेष. गाडदी चांडाल याही मोठा दगा केला होता. परंतु माहाराजाचे मोठे सुकृत कीं श्रीमंत भाऊसाहेबाचे कुशल जालें. आम्ही शुभचिंतकाही कुशल वर्तमान कललियावरी ईश्वराधना केली. माहाराजाचा धर्म आड आला व अबदाली दुष्ट चांडाल येंदा मागती आपले देशातून लाहोरपावेतो आला. त्यामुले दिली आगरे तो गडबडले. दिलीचे लोक वजीर आदिकरून कबिले सर्वांही जाटाचे मुलकांत पाठऊन सडे जाले. तो आलीकडे आला तरी दिली सोडतील व राजश्री दताजी व जनकोजी सिंदे याही नजीबखान वगैरे रोहिले यास जेर केले आहे परंतु पर्जन्यकाला व जागा कुबल[२] याजकरिता नजीबखान दगा करून वाचला. या दुष्टानेच मथुरेत कतल केला होता. आताहि अबदालीस पैका पाठऊन यानेच बोलाविले व तो आला म्हणूनच रोहिले तंग[३] धरून बसले. परंतु माहाराजाचा प्रताप येसा आहे की सरदार त्यासगट उतम प्रकारे पारपत्य करून सर्वास नेस्तनाबूद करितील.

---

१ त्रास देणें. २ कठीण. ३ नेट.

माहाराजास सर्वांकरून वर्तमान पावतच आहे तथापि आम्हीही वरचावरी विनंती केलीच पाहिजे, म्हणून करितो. माहाराजाचे छायेखाले माहाराजाचे आश्रये करून आहोत. शुभचिंतन करून आहोत. विदित असावे हे विनंती.[१]

*¶Raja Keshav Rao congratulates the Peshwa on the escape of his cousin from the murderous assault of Mu farkhan. He further informs the Peshwa of the descent of the Abdali into India at the invitation of Najibkhan.*

---

*No. 177]* *[3-1-1760*

छ १७ जाखर माव

सितैन मंगलवार

## श्रीमोरया

शेवेसी विदनापना. इकडील वृत सर्वदा पत्री लिहिले आहे. पूर्वी लाकोंडस रांगड्याची फौज च्यार हजार व पायेदल जमा होऊन त्यांस मारून लुटून पस्त केले. जोतसिंग नाथावत व राजावत व सेकावत चव्हाण वगैर कळवे वीस सरदार मारले गेले, त्या दिवसापासोन रांगडा कोण्ही जमाव करून बाहेर निघेनासे जाले. जागाजागा थांगा धरोन राहिले. पूर्वी राजश्री जनकोजी सिंदे याजकडील पत्रे आली होती त्यावरून तोफखाना आम्ही मावारा लाऊन सडे होऊन दरमजल त्या प्रांतास जात होतो. तेणेकडोन रांगडे बहुतच वारो[२] प्याले. आम्ही व पुढील फौजा जे दिवसी येकत्र जालो तेच दिवसी राजश्री जनकोजी सिंदे याजकडोन पत्रे आली. त्यांत गिलज्याकडील बहुतसी गर्मीचा मजकूर नवता आणि इकडील रांगडियानी जमाव करून वलगना आरंभिली. याचे पारिपत्य करून खारिस्त[३] केला पाहिजे म्हणून बलवाडा जागा भारी कुरुपाची होती तेथे जरबा देऊन ठाणे बसवावे म्हणजे इकडील थोडा बहुत बंदोबस्त * * सिंद्याकडे बातमीची पत्रे पाठविली त्याचीही उतरे आलियावर जो मनसबा कर्तव्य तो करावा येसे जाणून बलवाडियासीं मोरचे लावले. थोरल्या तोफा रामपुरियासीं माघाऱ्या पाठविल्या होत्या त्या आणविल्या. मोरचे व तोफखानियाचा मार देऊन गाव बहुत जेर केला. विक्रमाजित व राजावत व सेकावत व सुलतानवत वगैरे होते ते बहुत बजिद होऊन कौलास आले. त्यांस जीवदान देऊन ठाणियांत आपले लोक बसविले. येणेकरून तमाम जाग्यास द(ह)शती भारी पडोन रुजू जाले. मामलतीचा प्रकार आपल्या आपण बोलू लागले.

---

१. पत्राचे खालीं तीनचार ओळी औपचारिक मजकूर लेखकाचा मुलगा राव बद्रिनाथराव यानें लिहिला आहे. २ गर्वभरित झाले ? ३ बाहेर घालविणें, हद्दपार करणें.

उन्हेर इसरदेवाल्यानी आमचा हाडोतीचा मुलूक बळाविला आहे तो सोडोन घ्यावा. त्याच्या वतनाची मात्र खेडी त्यांजकडे ठेऊन वरकडाची मामलत करावी. झिलांवेकराकडील देखील अनुसंधान आले. आठ पंधरा दिवसात येथील निर्गम करून घ्यावा. पुढील विचार पाहून मनसबा करावा तो अकस्मात राजश्री जनकोजी सिंदे याची पत्रे आली की अबदालीची फौज वीस पंचवीस हंजार ज्याहनखान व अबदुल संमदखान वगैरे सरदार शतद्री नदी उतरोन अलीकडे आहि * * करिता आम्ही नजीबखानाचा शह (टाकून) यापासी येमुना उतरोन आलो तर * * कामे टाकून इकडे सत्वर यावे म्हणून लिहिले. त्यावरून आम्ही उचित मनसबा जाणून तोफखाना मावा(रा) लाविला. इकडील कामे मागे पुढे करावयासी येतील. मागे दुसाला नुकसानी जाली पुढेहि येक साल होई ते पुरवली व स्वामींचीही आज्ञा की तिकडील इकडील विचार पाहून मनसबा कर्तव्य तो करावा म्हणून. त्यास छ १३ जमादिलावली कूच केले. अथःपर या प्रांती कोठे येक क्षण न गुंततां मोठाल्या मजली करून गिलज्याचे पारपत्यासी जात आसों. होईल वर्तमान तें शेवेसीं वरचेवर विनंतीपत्रें लिहिली जातील. तिकडील वृत सर्वदा लेखन करावयांसी आज्ञा करावी. शेवेसी श्रृत होये हे विज्ञापना.

¶*Malharrao pleads his activities in Rajputana as an excuse for his delay in going to Sindia's succour who is hard pressed by the Abdali and the Rohillas.*

---

*No. 178*] [*4-1-1760*

छ १७ जाखर सितैन

## श्रीमोरया

शेवेसी विज्ञापना. आज छ १४ जमादिलावली दिलीकडोन बातमीची पत्रे आली कीं राजश्री दताजी सिंदे कुंजपुऱ्याहून सडे होऊन पुढे गिलज्याचे तोंडावर गेले. राजश्री जनकोजी सिंदे व राजश्री गोविंदपंत व वजीर नवाब गाजुदीखान मावे बुणगियांत राहिले होते. राजश्री दताजी सिंदे यांची व गिलज्याची फौजसी गाठ पडली. प्रहर सा घटकापरियेंत परस्परे युध्यप्रसंग जाले. उपरांतिक उभयेताही आपलाले ठिकाणी कायेम राहून मुकाम केले तों तेच दिवसी रात्री गिलज्या ज्याहनखान व अबदुल समदखान फौजेसहित दऊढियापासी येमुनेचा घाट उतरोन अंतरवेदीत गेला. पुढे नजीबखान रोहिला व ते येकत्र होणार आहेत. त्याजमावे राजश्री दताजी सिंदेहि येमुना उतरोन अंतरवेदीत जाणार. शेवेसी श्रृत होये हे विज्ञापना.

¶*An action near Kunjpura between Dattaji Sindia and the Abdali is reported.*

No. 179] [10-1-1760

पौ छ २८ जामादिलाखर
माव मास सुा सितैन मया
व अलफ

श्री

श्रीमंत माहाराज राजश्री नाना स्वामी
गोसावी यास

आश्रित कृष्णंभट पाटणकर अनेक आसीर्वाद उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लेखन करावयासी आज्ञा केली पाहिजे विशेष. पौष वद्य अस्टमी-पर्यंत श्रीकृष्णातीरी श्रीमद्भिस्टचिंतनपूर्वक स्नानसंध्या करून सुखरूप असो. यानंतर आपल्या शरीरी सावकाश नाहीं हें वर्तमान यैकोन चितास स्वस्थता नाहीं. तथापि आपण व दोन ब्राम्हण श्रीकृष्णातीरी स्वमतिने यथाशत्तया ईश्वरआराधनास आरंभ केला आहे. श्रीकृपेने सत्वरच आरोग्य होईल. चिंता न करावी. संक्रमणसंबंधी शर्करायुक्त तील पाठविले आहेत. स्वीकारून सदैव सर्वप्रकारें सांभाल करणार आपण समर्थ आहेत. सूज्ञतमेष्वलमतिलेखनेनेत्याशी:सहस्त्रमजस्त्रं.

¶*Krishnabhat makes inquiries about the Peshwa's health.*

---

No. 180] [12-1-1760

छ ३ जमादिलाखर
भोमवार

श्री

स्वामीचे शेवेसी विनंती सेवेक रावजी माहादेव साष्टांग नमस्कार. विज्ञापना. येथील कुशल तागाईत पौश्य वद्य दशमीपर्यंत येथास्थित असे. यानंतर राजश्री सुभेदाराकडील पत्रे वद्य पंचमीस बाविसा दिवसाची आली. सांप्रत बलवा-डियास मोर्चे लाविले आहेत तेही फते जाले असल किंवा होईल. लाहोराकडे जात होते, परंतु सिंद्याचे कूच अद्यापि जाले नाही आणि बुंदी पाटण पर्यंत मुल्क उज्याड होईल. माधोसिंगही राहिली ठाणी घेईल. मुलकाचाही बंदोबस्त जाला नाही याजकरितां तूर्त ठाणेमजकुरास मोर्चे लाविले आहेत. सिंद्याचा व रोहिल्याचा (मुका)बला पठाणावर जाणार म्हणून उ * (व) र्तमान आहे. वरकड वर्तमान मागून जे येईल ते सेवेसी निवेदन करीन. वरकड वर्तमान

राजश्री बापूजीपंत दिा फडणीस हे विनंती करतील. आज्ञा करणार स्वामी समर्थ आहेत. तूर्त बरवाडियास मोर्चे लाविले तेव्हा गुतले. ते आलियावर काये विचार होऊन वर्तमान येईल ते सेवेसी लिहून पाठवीन हे विज्ञाप्ति.

¶*News letter from Raoji Mahadev, describing the movements of Holkar.*

---

*No. 181*] *[24-1-1760*

छ १० रजब सितैन फाल्गुन

**श्रीमोरया**

**श्रीमंत राजेश्री पंतप्रधान स्वामीचे शेवेसी**

विनंती शेवक गंगाधर येशवंत व आनंदराव राम कृतानेक सां नमस्कार विज्ञापना. येथील क्षेम छ ९ जाखर मुकाम नजीक कोटपुतली स्वामीच्या कृपावलोकनेकरून येथास्थित आसें विशेष. इकडील पूर्वी येक दोन वेला लिहिले आहे. जैपूर प्रांतीहून गिलज्यांचे पारपत्यास्तव दिलीकडे आलो. त्यास आम्ही आल्यापूर्वीच राजश्री जनकोजी सिंदे याचे व गिलज्याचे जुंज होऊन दतबा निधन पावले. राजश्री जनकोबा बाबा या मावारे आले त्याची आमची मुकाममजकुरी गाठ पडली. पाटलाचे वर्तमान येकून खेद विशेष जाला. ईश्वरे आनुचित केले. होणारास उपाये नाहीं. पुढे गिलज्यांचें पारपत्य जलद जालें पाहिजे. याजमुलें मनुष्ये बुनगे सर्व मावारे लाऊन सडे जालो. गिलजे रोहिले जमाव भारी जाला आहे आणि हावभरी जाले आहेत. त्याजला तजविजीने तंबी करून दहशत बसविली पाहिजे. छ मजकुरी कूच करोन पुढे जात आसो. स्वामीच्या पुण्यप्रतापेंकरून अमित्राचे पारपत्य होऊन येईल. शेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*An important letter from Gangadhar Yeshwant, Holkar's Diwan, giving the news of the defeat of Sindia's army by the Abdali and the death of Dattaji.*

---

*No. 182*] *[End of January 1760*

छ २७ जमादिलाखर
सितैन माघ

**श्री**

**श्रीमंत राजश्री भाऊसाहेब स्वामीचे सेवेसी**

विनती सेवक जनकोजी सिंदे कृतानेक सां विज्ञापना. येथील सेवकाचे वर्तमान तां छ जावलपर्यंत येथास्थित असे विशेष. स्वामीचें आज्ञापत्र छ २४

राखर पाठविले ते छ १८ माहे मजकुरी पावले. पत्रीं कितेक वर्तमान लिहिले त्यावरून सर्व कळू आले. तदनंतर सेवकाचे वर्तमान तरी छं २० रोजी दिलीचे मुकामी गिलज्याची गाठ पडली. पारचे रोहिले व नजीबखांन फौजेसुधा त्यास सामील जाले. त्यांचे आमचे जूज जाले. ते समई तीर्थस्वरूप राजश्री काकाबाबास गोल्या लागोन लढाईतच राहिले. ईस्वरे अनुचित गोस्ट केली. बरे. त्याची सता प्रमाण. उपरांत आम्हांसहि गोली उजव्या हाताच्या दंडास लागली आहे. थोडकीच असे. तदनंतर बुनगियांत येऊन सर्वास संभाळून कोटपुतलीचे मुकामी आलो, तो राजश्री मल्हारजी बावा होलकर फौजेसुधा येऊन भेटले. तदोतर बुनगे ठेऊन सडे उभयेताहि होऊन गेलो. हे पत्र स्वामीस पावताच फौजेची तयारी करूंन याप्रो सत्वरीच पाठवावी. सेवेसी श्रुत होये हे विज्ञाप्ति.

¶*Jankoji Sindia to Sadashivrao Bhao writing about an encounter between Ahmadshah and Dattaji Sindia and the death of the latter. The writer also received a bullet on his right shoulder. The battle took place on 10th January 1760 at Delhi.*

---

*No. 183]* *[3-2-1760*

छ १९ जमादिलाखर

सितैन माघ

**श्री**

विनंती सेवक रावजी माहादेव कृतानेक विज्ञापना. राजश्री सुभेदाराकडून पत्रे आली ती सेवेसी पाठविली आहेत. ध्यानास आणून पत्राच्या उत्तराची आज्ञा करून उतरे सत्वर येतील म्हणजे कासीद ताबडतोब * * * आबदालीची फौज सर (हिंद) आलीकडे येऊन सिंदियासी त्यास युध जाले. कायेम उभयेता राहिले. गिलजे यमुना उतरोन आंतरवेदीत गेले. नजीबखान व गिलजे येकत्र जाले. सिंदियाची पत्रे राजश्री सुबेदारास आली. यानी बावडी[1]यासी मोर्चे लाविले होते. तो घेऊन दरकूच दिलीच्या सुमारे सिंदियाकडे गेले. उभयेता येकत्र होऊन रोहिलियात भेद करून फोडावे, सुज्यातदौलास वजिरी देऊ करावी येसे करून हताखाले घेऊन गिलज्याचे पारपत्ये करावे येसे आप * * मानस दिसते. स्वामीनी * आगोधर येणेप्रमाणे आज्ञा केली आहे. प्रस्तुत

---

* 10-1-1760

१ बलवाडा.

आज्ञा पत्री करणार स्वामी समर्थ आहेत. राजश्री जनकोजी सिंदे व दताजी सिंदे यासी पत्र द्यावे की येकचिते चालून गिलज्यास तंबी करावे. वरकड धोंडाजी नाईक विनंती करतील हे विज्ञापना.

¶*Raoji Mahadeo reports to the Peshwa that there was a clash between the armies of Sindia and the Abdali after which the latter's army crossed the Jumna into the Doab. He further writes that Najib has entered into an alliance with the Abdali.*

---

*No. 184*] [*3-2-1760*

छ १९ जाखर
सितैन माघ

**श्रीमोरया**

सेवेसी विज्ञापना. कर्जपटीचा मजकूर कार्तिकचा वायेदाविसी स्वामी आज्ञा समक्ष केली. येथे आलिया कोणे गोष्टीने युक्तीस न पडे. खर्च बहुत. आये थोडा. लोकास रोजमरा पाहिजेत, पागाचा खर्च केलाच पाहिजे, खेरीज नित्य खर्च स्वामीसी बोलल्याप्रो काही तजवीज करणें जरूर. मग निकाल काढू(न) कलेल त्या रीतीने राजश्री वेकाजी हरीची रवानगी केली. मारनिले सविस्तरें विनंती करतील. आजपावेतो येका पैस्यास * * * नाही नित्य लोकाचे * * * ले दुसरे काही सुचत नाही. तूर्त (हा) मनसबा थोर आला. त्यास आत:पर तिकडे जाऊन स्वामीच्या प्रतापे कार्यसिध्धी करितों. वायेदा तो सनिध आला. तोपावेतो दिवस जाण्यायेण्याचे गलबलीत जातील. आमचा येत्न चालल्यास स्वामीकार्यासी सेवकलोकापासोन आंतर होणार नाही. राजश्री सुबेदाराचेहि मनोगत सर्व प्रकारें साहेबाचे चरणापासी. दुसरा आर्थ जाणत नाहीत. येदा खर्चामुळे डोहात आहेत. पार करणार स्वामी समर्थ आहेत. श्रुत होये हे विज्ञापाना.

¶*The writer Gangadhar Yeshvant Chandrachud narrates to the Peshwa his monetary difficulties, but assures him that in spite of them, his new venture will have the full support of his master.*

No. 185] [8-2-1760

छ २० रजब सितैन

श्री

श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामीचे सेवेसी

आज्ञाधारक गणेश संभाजी सा। नमस्कार विज्ञापना. ता। माघ वद्य ७ पावेतो मुकाम काल्पी येथे स्वामीचे कृपाअवलोकनेकरून सेवकाचे वर्तमान येथास्थित आसे. विज्ञापना येसीजे. उजनीच्या मुकामीहून विनंतीपत्र पाठविले तेथे फौजविसी आर्थ लिहिला होता. त्यास फौज तो आली नाहीं. सेवक दरमजल सिरोंजेस आलो तो अबदाली रेटून दिल्लींत दाखल जाला. सिंदे त्याच्या मोहऱ्यावर होते. फौज छावणीची सडी होती. मागती रोहिल्यासी तीनच्यार मास लडाई होतच होती. त्यावर आकस्मांत तोही आला. त्याजवर हे लढाईस गेले. बुनगे पहिलेंच मागे ठेविले होते. सडे बुनगे पाठीवर होते. फौजसुधा युधास गेले. यमुनातीरी वढे होते. जंगल मोठे. रावतास राऊत दिसेना येसा बोरु व झाडी, खारजमीन पाणी येसा जागा होता. दताजी सिंदे येकांगवीर[१] जाऊन लागलेच आराबियावर[२] पडले. चांगले च्यार घटका युध जाले. त्याचे चांगले चांगले माणस पडले. परतु ईश्वरास करणे तदनसार दतबास गोळी लागोन ठार जाले. मग इकडील फौजेने सहजच चल खोदला. तो जनकोजी सिंदे सावरोन त्यासन्मुख जाले. याणी च्यार घटिका जूज केले. यांच्या दंडावर गोळी लागली. तेणेकरून हे माघारे फिरले. मग ते मागे लागले. नुकसान फारच जाले. रा। मल्हारराव करवलीकर जाटाची फौज व माधोसिंगासी सलूकसा करून त्यांची काही फौज घेऊन आले होते. तेथे जनकोजीबावा चालीस कोस गेले. त्यास सामील जालियावर ते व हे, बुनगे ग्वालेरीस रा। गोविंद बलाल याजसमागमे देऊन, आपण दिलीस गेले. त्यास काल वर्तमान आले कीं आ(ब)दाली व रोहिले सारी फौज बाहेर निघोन येक लडाई बहुतच झाली. दोन्हीकडील माणसे फार जायां झालीं. सेवटी आ(ब)दालीने सिकस्त खादली मग लाहोरच्या वाटेने चालिला. हे मागें तो पुढें, याप्रो। जात आहे. याप्रकारचें वर्तमान. त्या समयात दरकूच मी चालिलो. ढाकोणीस आलो. तेथे राजश्री समशेर बाहादर बावाची फौजपैकी पाचेकसें राऊत.

(पुढील बंद गहाळ.)

¶*This first sheet of Ganesh Sambhaji's letter to the Peshwa gives details of Dattaji and Jankoji Sindia's encounters with the Abdali.*

---

१ धाडसी वीर. २ तोफखाना.

No. 186] [1-3-1760

पौ छ १३ साबान
सन सितैन

श्रीकृष्णोजयेति

श्रीमंत महाराज राजश्री पंडित प्रधान बाळाजीराव नाना
स्वामीचे सेवेसी

पो राजा केशवराव सां नमस्कार विनंती उपरी. येथील क्षेम ता छ १२ रजब मोकाम झासी जाणून स्वकुशल लेखनआज्ञा केली पाहिजे विशेष. राजश्री मल्हारराऊ होलकर सुबेदार व जनकोजी सिंदे व नारो शंकर नारनोल प्रांती म्हणजे दिलीहून पनासा कोसावरी जैपूरचे रोखे तेथून जैपूर तीस ४० कोस तेथे आहेत व आबदाली व नजीबखान व दुंदेखान देखील कुल रोहिले त्याजबा भारी फौजेने आलवर प्रांती आहे व तोपखाना व सामान भारी त्याजबा आहे. व सरदाराची फौज सडी कुल बुनगा पूर्वीच उजैनीकडे वाटे लाऊन आबदालीचे मुकाबिलियावरी राहोन कहीकबाड व रसद जाऊन देत नाही. याजमुळे त्याचे लस्करात अन माहाग फार. रुपयास तेल दीडसेर मिळत नाहीं. दुसरे अबदालीचे लोक जेथें जाताती ते मारुन लुटोन कतल करिताती व बंद करिताती. याजकरितां कोण्ही त्याचा इतबार करीत नाहीं. कौल त्याचा नीट नाहीं. याजकरितां कोण्ही त्यास रुजू होत नाही. व त्याचे वकील जैपुरास राजा माधवसिंगापासी व सुरजमल जाटापासी येऊन पैगाम केला आहे की तुम्ही पैका पाठवा व भेटीस रफीक व्हा. आम्ही तुम्ही मिलोन मऱ्हाटे सरदारास हिंदुस्तानातून दक्षणेस पा(ठ)ऊ तुम्हासहि त्याचा उपसर्ग होत आहे. असा पैगाम आहेत. या जाबसालात नजीबखान रोहिला आहे ज्याने अबदालीस बोलाऊन येथवरी काम केले आहे. परंतु सुरजमल जाट जाब देतो की मी रयेत आहें. तुम्ही दिलींत नीट पातशाहीवरी कायेम व्हा व मऱ्हाटे सरदाराचे पारपत्य करा. त्याची मामलतीप्रमाणें मी तुम्हास पैका देईन, तोवरी माझ्याने काही होत नाही. याजप्रमाणें मावोसिंगहि म्हणतो व सलूक तिकडील तोडीत नाही. अबदाली व सरदाराचा निवाडा जालियावरी जिकडे बल पाहातील तिकडे होतील. सारांश गोष्टी इतकी आहे. अबदालीनें जो पातशाहाजादा पटणियाकडे जाऊन तख्तावरी बसविला आहे त्यास आपणाजवळ बोलाविले आहे की तुजला दिलींत पातशाहा करितो व सुजाउदौलास अयोध्येहून त्याजबा बोलाविले आहे की तुजला त्याचे

वजीर करितो. व पैकियाचाहि पैगाम केला आहे. पाहावे; जरी ते येतील तेव्हा त्या सर्वास हाताखाले घालोन मग काये करील याचा विश्वास नाही. पैका तो सर्वापासोन घेईल व हे सर्वास कळले आहे. कोण्ही त्याजपासी येत (अपूर्ण).

¶*News letter from Delhi: the Peshwa's agent Keshaorao writes to him an account of the encounters of the Abdali and the Holkar and Jankoji Sindia.*

---

*No. 187*] [*10-3-1760*

छ १४ सन सीतैन

श्रीकृष्णोजयेति

श्रीमंत माहाराज राजश्री पंडित प्रधान बाळाजीराव नानासाहेबाचे सेवेसी पो राजा केशवराव सांा नमस्कार विनंती उपरी. येथील क्षेम ताा छ २१ माहे रजब मुकाम झासी जाणून स्वकुशललेखनाज्ञा केली पाहिजे विशेष. पूर्वी कितेक पत्रे सेवेसी हिंदुस्तानाचे व आबदाली व रोहिलें व राजा माधवसिंग व जाट वगैरेचे वर्तमानाची व सरदार याचे वर्तमान सविस्तर लिहिलें ते पत्रे जरी सेवेसी पावली असतील तरी सार्थक आहे. परंतु या दिवसांत आबदालीची डुंडीमुले[1] जागा जागा मार्गात गवाराही धूम केली. कासिदास धरोन मारिताती. व वाट चालत नाही. आमचे कासदही कितेक लुटले मारले गेले. पत्रें गेली. याजकरितां कुल पत्रे पावली नसतीलसे वाटते. प्रस्तुतचे वर्तमान तरी राजश्री मल्हारराऊ होलकर सुबेदार व जनकोजी सिंदे हे जमाव करुन मेवात प्रांत दिलीहून ५० कोसावरी होते. त्याहून पंधरा वीस कोस जाटाचे किले व मुलुक व जैपुर तीस कोस येकीकडे राहिले. परंतु याही फौज सडी समागमे ठेऊन बाहीरबुनगा अगधी कबिलियासगट माळवियासी वाटे लाऊन आबदालीचे तोंडावरी होती. आबदाली मगरुर. त्याहीवरी नजीबखान रोहिला आणिक कुल रोहिले त्याजबाा असतां आबदालीची फौज भारीच जाली. त्याने नीट पैगाम राजे माधवसिंग व जाट व कुल राजे व शुजायेदौलास माणसे लिहिली पाठविली की भेटीस या अगर फौज व पैका द्या. त्यास इकडील सरदाराचे भये, तिकडे त्याचेही भये. त्यास सलूक ठेऊन वरच्यावरी जाबसाल राखत आहेत हे देखोन राजश्री मल्हारराऊ पोख्ती तजवीज्य केली की, आबदालीसी जूज करायाचा काबू[2] नाही, याचा मुलक जाऊन मारावा. मग सहजच इकडोन हे फिरतील. राजे रजपुताचा जमाव ईतफाक[3] होणार नाही. मग अबदाली व रोहिला आपले मुलक राखायास

---

१ दंगा. २ ताकद. ३ एक विचार.

2384

येईल तरी आम्ही दुसरेकडे निघोन जाऊ. याचा हात आपणावरी पडो न देऊ. हे करोन नीट त्याचे तोंडावरोन निघोन दिलीकडे येऊन येमुना तरोन सिकंदराबाद अंतरवेदांत येमुनापार दिलीहून २० कोस नजीबखानाचा तालुका तेथे ठाणे नजीबखानाचे मारून लुटून पुढे गंगेअलीकडील त्याचा मुलक मारिताती. व आम्हास राऊ मजकुराहीं लिहिलें आहे की रोहिलियाचा मुलक गंगेआलीकडील व गंगेपलीकडील फकराबाद कुल रोहिलियाचा मुलुक मारितो. तो सहज तिकडोन इकडे येईल तरी आम्ही दुसरेकडे निघोन. याप्रकारें त्यास खराब करीत आहो. तुम्ही खातरजमेनें झांसीतच असणे. व तिकडील मोकासदारांची खातरजमा करणें की आपले जागा कायेम आहेत. त्यावरून आम्ही झांसी व काल्पी येथे मोकासदारास लिहोन पाठविलें की, आबदालीकडील कोण्ही इकडे येत नाही. तुम्ही खातरजमा असो दीजे. त्यावरोन झांसीचे लोक साहुकार आपलाले कबिले घेऊन दतिया वोंडछा व बुधेलखंडात जात होते ते राहिले व मोकासदारास (अपूर्ण)

¶*Raja Keshav Rao reports to the Peshwa developments in the North. On his arrival in India, Ahmedshah Abdali effected a union with the Rohilla forces and has invited other potentates—the Jats, the Rajputs under Madhosing, and Shuja—to fight under his flag against the Marathas. The Rajputs though afraid to open hostilities with the Marathas could not ignore the powerful Abdali and opened negotiations with him. Malhar Rao and Jankoji, to prevent the consummation of their alliance, invaded Rohilla territory.*

---

*No. 188]* *[14-3-1760*

छ १४ साबान
सन सितैन

**श्रीकृष्णो जयति**

**श्रीमंत माहाराज राजश्री प्रधान पंडित बालाजी
राऊजी स्वामीचे सेवेसी**

पो राजा केशवराव सां नमस्कार विनंती उपरी. येथील क्षेम ता छ २९ रजब मुकाम झासी जाणून स्वकुशल लेखनआज्ञा केली पाहिजे विशेष. पूर्वी दोन च्यार पत्रे वरचेवरी वर्तमानाची पाठविली आहेत त्यावरोन आबदाली व सरदार राजश्री मल्हारराऊ व राजश्री जनकोजी वगैरेचे वर्तमान विदित जालेच असेल. सांप्रत मल्हाराऊ वगैरे सिकदराबाद नजीबखानाचा तालुका अंतरवेदीतील मारोन, मागून

(अ)बदाली आला; मग तेथून चालोन मथुरेपासी यमुना उतरोन भरतपुरास सुरजमल (ज)ाटाचे तालुकियास आले. मागे सिकंदराबादेजवळ गंगाधरपंत ताल्या फौजेनिसी (हो)ते. यांची व अबदालीचे फौजेची झटपट जाली. गंगाधरपंतहि निघोन जाटाचे (म)ुलकांत आले. सारांश अबदाली व रोहिले सर्व सामील जाले. फौज भारी, (स)ामान तोपखानियाचा फार, याजकरितां जूज करणें इकडोन बनत नाही. हात (त्य)ाचा पडो न देता कावादावा करितातो व दक्षणेकडील कुमकेचा मार्ग पाहातातो. कोण्ही आलियावरी सर्व मिलोन जे पारपत्य करयाचे ते करितील. नजीबखान रोहिला व आणिक सर्व जमाव रोहिलियाचा मुराबाद बरेली प्रांतींचा सर्व येक होऊन अबदालीस शामील जाले आहेत. मागून आणिक अबदालीची फौज काबलेकरोन येते म्हणोन वार्ता आहे. खरे लटके आलियावरी कलेल. माहाराजें या शत्रूचे पारपत्य करावें, उपेक्षा न करावी. धण्यातून कोण्ही येणार त्याजबा फिरंगी तोपखाना सामान दिधला पाहिजे. या शत्रूची उपेक्षा न करावी. जाट व माधवसिंग व शुजाउदौला सर्व यास भितातो. दताजी सिंदे याची तो अवस्था जाली. याजकरिता गरूर अबदालीस व रोहिलियास फार जाला आहे. दुसरे आपली फौजहि तधीपासोन त्याचे तोंडास नीट शोभत नाही. येक मल्हारराऊ युक्तीने त्याजला लागून खराब करावे म्हणोन उपाये करितातो परंतु अबदाली व रोहिले वरकड मोगलासारिखे नव्हेत, कजाक आहेत. धावायास व व झुजायास बलकट आहेत. दिलीतील पातशाहाची ते गती जाली. मोगलाई बुडालीसी जाली. येक पातशाहजादा मात्र पटाणियांत आहे. तख्त करोन बसला परंतु दिलीस येऊन पातशाही करी असे सामर्थ्य नाही. अबदाली जरी त्यास आणून बसवील तरी न कले. परंतु काये गरज? (ज)री पातशाही हातास आली तरी आपणच कां करीना? रोहिले म्हणतातो की मोगलाची पातशाही दिलीतील गेली. पठाणीची कदीम पातशाही जाली व यास मोठा द्वेष माहाराष्ट्राचा आहे व भयेहि हेच मानितातो. दक्षणेत माहाराजाचा जये मोगलावरी जाला हेहि यास कलले. याजकरिता दक्षणपावेतोहि हांव याची आहे. जोवरी सरदार हिंदुस्तानांत माहाराजाचे आहेत तोवरी दक्षणेस हे येणार नाहीत. यांचा टिकाव न होये तेव्हा हे दक्षणेपावेतों येतील. सर्वाप्रकारें माहाराजाही कुमक लौकरी करावी. नाही तरी अंतरवेदीतील व बुंदेलखंडातून अमल साचा उठेल. आतांपासून सर्व लोक गडबडले आहे व लाहोर दिलीचा तों अमल अगदी उठला. करोडो रुपयाचा मुलक त्याचे हाती लागला तेव्हा त्याचे बल आणिकच होत जाले. जाले वृतांत सर्व विनंती करावी म्हणून लिहितो. क्षमा करावी.

2386

येथार्थ न लिहावे तरी आम्हास योग्य नाही. माहाराजाचे आश्रयांत आहों. शुभचिंतन करावे हा धर्म आहे हे विनंती.

¶*An important letter from Raja Keshav Rao to the Peshwa giving a vivid picture of the terror and awe the Abdali inspired in the hearts of all. "Malhar Rao's efforts to defeat him with his usual guerilla tactics have proved useless as the Abdali is a master of his craft. Only a well trained army equipped with powerful artillery can hope to succeed against this enemy".*

---

*No. 189*] [*12-6-1760*

पौ छ ६ जिल्काद नकल

**श्रीमोरया**

**राजश्री गोपाळराव गणेश गोसांवी यासी**

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नेाा मलारजी होळकर व जनकोजी सिंदें दंडवत विनंती उपरी. रुपराय खिचराच्या पारपत्याखेरीज माहाल सुरलीत होऊन आमल चालणार नाही म्हणोन लिहिले. त्यास राजश्री गणेश संभाजीस पत्र लिहिले आहे. त्याजला बोलाऊन कार्यासिधि करून अमल सुरलीत करणे. जर त्याचे येणे न होये तर तुम्ही स्वार प्यादे नवी सिबंदी ठेऊन जमाव पुरकस करून श्रमसाहास करून खिचराचे पारपत्य करणे बंदोबस्त करणे. खर्चवेच लागेल तो माहालचा माहाली वसूल करून उगवणे. हिसेबी मजुरा पडतील. सुाा इहिदे सितैन मया व अलफ छ २७ सवाल. बहुत काये लिहिणे हे विनंती.

¶*Gopalrao Ganesh Barve is authorised to enlist new men to put down the rising of Rupraya Khichar in case Ganesh Sambhaji fails to send him help.*

---

*No. 190*] [पौ *31-8-1760*?

छ १९ मोहरम

**श्री**

**पुरवणी श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामींचे सेवेसी**

विनंती सेवेसी. पूर्वी सुरजमल जाट यांची भेट ते समई जाहाली. त्याणी सर्वप्रकारें शफतप्रमाण स्वामीसी रिफाकत करावयाविसी केली. स्वामीही त्यास आपले म्हणून त्याजपासून कार्य घ्यावे हे वर्तमान लिहिलेच आहे. येशियास

---

१ स्नेह.

त्याजला येक पत्र समाधानाचे बदनसिंग व सुरजमल यांस पाठवावे कीं तुमची फलाणियाची भेट होऊन बोलीचाली प्रमाण जाले त्याप्रा त्याच्या लिहिल्यावरून कलो आले. येशियास तुम्ही सर्वप्रकारें आमचे आहा. बाबूराऊ बोलिले आहेत त्याप्रा अमलात येईल, संदेह नाही. समाधान असो देणें. आम्ही मालवियांत येतो तुम्ही फौजबंदी तयार असो देणे याप्रमाणें पत्रे अगत्य पाठविली पाहिजेत. मुख्य खुलासा जाटांचा, आपल्या मुलकास उपद्रव न व्हावा, खंडणी नजर न मागावी. आमचे मुलकात गडकोट आहेत, बुनगे जतन करून चाकरीस दाहा-हजारानसीं हरोलीस जेथे पुढे करून घेतील तेथें हाजीर आहो. सर्वप्रकारें कृपा करावी. याविरहित दुसरा मुदा नाही. आम्ही येविशी स्वामीच्या तर्फेने त्यांची तसली[१] केली आहे. सेवेसी विदित असावे, विदित होये हे विनंती.

¶*The paper refers to the conditions on which Surajmal Jat is prepared to take up arms to fight under the Maratha flag, i.e. (i) his state will not be molested, (ii) no tribute is to be levied from him.*

---

*No. 191*] [*14-9-1760*

**श्री**

**राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री नारोपंत नाना
स्वामीचे शेवेसी**

पो कृष्णाजी अनंत सा नमस्कार विनती उपरी. येथील कुशल ता भाद्रपद शुध पंचमी मुकाम दिली जाणून स्वकीय लेखन करीत असिले पाहिजे विशेष. बहुत दिवस जाहाले. आपणाकडून पत्र येऊन वर्तमान कलत नवते. त्यास हाली पत्र आले. त्यावरून बहुत संतोष जाहाला. ऐसेच निरंतर पत्र पाठऊन आपणाकडील साकल्य वर्तमान लिहून आनंदवीत असावे. यानंतर इकडील वर्तमान तरी श्रीमंत दरमजलीने देशीहून चमल नदीवरी आले. तेथे उभयेता सरदाराच्या भेटी जाल्या. तेथून दरकूच मथुरेस आले. तेथून राजश्री बलवंतराव याजबरोबर दाहा हजार फौज देऊन पुढे दिलीस रवाना केले. येथे येताच किलेदार, पातशाई किल्यात, अबदालीकडील किलेदार होता. त्याणे गोली वाजविली. त्यावरी पातशाही किल्यास मोर्चे लाविले. मागाहून खासा स्वारी आलियास दोनतीन रोज किला झुजला. उपरांत किलेदार सलुखाने बाहेर निघाला. पातशाई किल्यांत सरकारी ठाणे बसले. अबदालीची फौज

---

१ खात्री.

खासा व नजीबखान सुज्यातदौलेसुधा पनास हजार येमुनेपलीकडे परतीरी पटपट गंजावरी उतरले आहेत. आपली फौज आलीकडे उभयेता सरदारसुधा आलीकडे आहे. प्रस्तुत पलीकडे उतरोन जावे तरी येमुनेस पाणी फार याकरितां उतार होये तोपर्यंत अवकाश आहे. मार्ग जालियानंतर पलीकडे उतरतील. प्रस्तुत सुज्यातदौलेयाच्या मारफातीने सलुखाचा प्रकार होत आहे. परंतु सलुखाने प्रांत[1] लागतो असा प्रकार दिसोन येत नाही. येक जूज जालियावरी काये होणे ते होईल. वरकड आम्ही सरकारसेवा करून सुखरूप आहो. धन्याचीही कृपाच आहे. आपण वडील सर्व प्रकारे आमचा सांभाल करीत असावे. उपरोधिक ल्याहावेसे नाही. बहुत काये लिहिणे? कृपा लोभ असो दीजे हे विनंती.

¶*Krishnaji Anant reports to Naropant Nana the capture of Delhi by Sadashiv Rao. Peace negotiations carried on through the mediation of Shuja-ud-daula are not likely to succeed as both the combatants are determined to fight to a finish. The Jumna is in flood which has prevented the armies from coming to grips.*

---

*No. 192]* *[20-10-1760*

**श्री**

**तीर्थस्वरूप राजश्री नाना वडिलांचे सेवेसी**

आपत्ये बालकृष्णाने चरनावरी मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विनंती. येथील क्षेम ताा छ १० रबिलोवलपावेतो मुाा कुंजपुरा वर्तमान येथास्थित आसे. विशेष. वडिलाकडील बहुत दिवस आसीरवादपत्र पाठऊन सेवकाचा साभाल करीत असिले पाहिजे. वडिली आसीरवादपत्र पाठविले ते पावोन परमसमाधान जाहालें. यैसेच निरंतर पत्र पाठऊन संतोषवीत आसिले पाहिजे. हिकडील वर्तमान तरी आबदल समदखान व कुतुबशाहा यैसे दोघेजन मारिले. झुज जाहाले. आपलेहि लोक जखमी पाचसातसे जाहाले आहेत. कुजपुरा लुटून फस्त केला. पैकाही सापडला आहे. पुढी गिलज्याचेहि पारपत्य करावयासी उमेदवार जाहाले आहेत. तोहि लुटून घेतलि. काही चिंता नाही. श्रीमंताचे पुन्य समर्थ आहे. समंधखानाचीहि फौज दाहा हजारपावेतो होती परंतु येकदाच हला केला. त्याची फऊज दाहा हजार कापून कादिली. घोडेही च्यार पाच हजार आली. निदान प्रमाणें वर्तमान जाहाले आहे. पैका कोणाकडील वसूल

---

१ निकाल,

जाहाला नाही याउपरी लोकास पैका देतीलसे दिसते. देतील तेव्हा आमच्या हातास येई. आपणास कलावे म्हणऊन लिहिले आहे. माहादाजी बारवकर यास देवआज्ञा जाहाली. आपणास कलावे म्हणू लिहिले आहे हे विज्ञापना.

सेवेसी गंगाधर बाबाजी जोशाचे कृतानेक सां नमस्कार विज्ञापना. आपण कृपा करून स्मरण करून पत्र पा। ते पावले. नित्य नित्य हमेशा पत्रे शेवेसी लिहित असतो. पावत नाही त्यास अन्याय काये? वरचेवर साभाल करावया आपण वडीलच आहेत. आश्रा दुसरा कोणाचा? असो. वरकड वर्तमान राजश्री बालकृष्णपंती लि। आहे. कलेल. कुंजपुऱ्यास समनखान वगैरे मारले. द्रव्यहि दाहापावेतो सापडले. मोजदाद चारपावेतो जाली. हे विज्ञापना.

¶*The action at Kunjpura and its favourable effect on the temper of the Maratha army is reported by Balkrishna.*

---

*No. 193*] [*20-10-1760*

**श्री**

**तीर्थस्वरूप राजश्री नाना व तथा राजश्री आणा**
**वडिलांचे सेवेसी**

आपले बाळकृष्णाने च्यरनावरी मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार. विनंती. येथील क्षेम ता। छ १० रबिलोवलपावेतो मु। कुंजपुरा वर्तमान येथास्थित आसे विशेष. वाडिलाकडून बहुत दिवस आसीर्वादपत्र येऊन वर्तमान कलत नवते. त्यास हाली छ १९ मोहरमचे पत्र पाठविले ते पावोन परम समाधान जाहाले. येसेच निरंतर आसीर्वादपत्र पाठऊन सेवकाचा सांभाल करीत आसिले पाहिजे. हिकडील वर्तमान तरी लोकाकडील येवज आद्यप येक पैसा वसूल जाहाला नाही. फोजेस रोजमुरा तीन महिने मिलत नाही याप्रमाणे लोकांची हलाकी. याप्रमाणे हलाकी जाहाली आहे. येथे कुंजपुरेयावर आज चार रोज आलो. त्यापासून दाणा लुटीचा मिलो लागला. त्याउपरी समंधखान येथे दाहा हजार फउजेनिसी होता तो युध्य करून लुटिला. त्याचे सीर कापून भाल्यावर लाऊन लस्करात फिरविले व कुतुबशा त्याचा सरदार होता तोही त्याप्रमाणेच मारिला. त्याची लूट लोकास सापडली व घोडीही दोन चार हजारपावेतो होती तितकीही लोकाणी आणिली. आपल्याकडील लोक जखमी फार जाहाले. परंतु ठार कोणी मातबर जाहला नाही. खंडेराव दरेकर व हैबतराव जाधव भुईजकर या दोघाजनास गोळीची जखम जाली आहे परंतु हलकीच आहे. पेकाही दाहा

पंधरापावेतो सापडला. लोकाणी पाच लक्षेपर्यंत हल्याचे दिवसी लुटिला. आता पेका सापडला आहे. याउपरी लोकास काही दिल्हे तरी आमच्या हातास येईल. माझी खर्चाविसी बहुत हलाकी आहे. दाणा महर्ग बहुत जाहाला. रुपयाचे दीड पायेली दाणा जाला आहे. दोनशे रुपये घो(ड्या)स व मानसास आजपावेतो लागले. गिलज्याची लडाई पुढे होनारच आहे. याप्रमाणे वर्तमान आहे. आपणास कलावे म्हनून लिहिले आहे. घरी कोकणात खर्चाविसी हलाकी जाहाली आसेल ती ईश्वर जाणतच आसेल. हिकडे आलो परंतु येक पेशाची मिलखत दिस(त) नाही. कर्जदार (व्हावे) येसे दिसते. वडिलास कलावे म्हनून लिहिले आहे हे विज्ञापना. राजश्री बालकृष्णपंत दाजीस व केसोपंत दाजीस साष्टांग नमस्कार सांगणे. लोभ करीत जाणे हे विनंती.

वेदमूर्ति राजश्री बापुभटजीस साष्टांग नमस्कार सागणे. राजश्री माहादाजीपंत दाजी जोसी यासी साष्टांग नमस्कार सांगणे. लोभ करीत आसिले पाहिजे.

*¶One Balkrishna allured to the North by the prospect of plunder writes in a gloomy strain as things are going wrong. The letter depicts the desperate straits to which the army was reduced months before the day of the final action. The capture of Kunjpura though bringing in money and grain relieved the situation but slightly.*

---

*No. 194]* *[20-10-1760*

**(श्री)**

**राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री**
**अंतोबा नाईक थथे स्वामीचे सेवेसी**

सेवक विसाजी बलाल पाटणकर कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल ताा आस्विन सुध ऐकादसी मुा कुंजपुरा जाणोन स्वकीये कुशल लिहीत जावे विशेष. आपणाकडील बहुत दिवस पत्र येऊन वर्तमान कलत नव्हते. त्यांस आमच्या जासुदासमागमे पत्रे अधिक मासची पाठविली तीं पावली. लिाा वर्तमान कलले. परम संतोष जाहला. घरचे वर्तमान सविस्तर लिहिले नाही. त्यास श्रावणमासी तीर्थस्वरूप दादा आले असतील, त्यांस सविस्तर वर्तमान पुसोन आपण लेहून पाठवावे. माहागांवी गाय घेऊन दिल्ही म्हणोन लिहिलें, उत्तम केले. जे लागेल ते देत जावे. आबाल कोणे गोष्टींची होऊ न द्यावी. आपण वडील आहेत, काही नुन्यता पडो देणार नाहीं. आम्हाविसी काही चिंता न करावी. हा कालपरियंत सुखरूप आहे. ईश्वर

कृपेंकरून पुढे जेष्ट अखाडमासी घरास येऊ. आमचे घरची माणसें श्रमी बहुत होत असतील. तीन वर्से घरास गेलो नाहीं. परभारेच निघोन दुसाला छावणींस आलो. लग्न जाहल्यावरी घरास जावे हा बेत होता, परंतु ऋणानबंधे जाण न जाहले. जे समयीं त्याचा व आपला ऋणानबंध असेल ते दिवसी भेट होईल. वरकड राजकी वर्तमान तरी, आबदली यमुनेपलकडे आहे. आपल्या फौजा आल्याड आहेत. यमुनेस उतार जाहल्यावरी काय होणे ते होऊन येईल. मुा मजकुरावरीहून कुरुक्षेत्र सोळा कोस आहे. एका दोहो रोजी येथून कूच करून कुरुक्षेत्रास जाऊन. येथे तीर्थविध करून, पुनरपि दिलीस जाणार. येथे आबदाली आहे. परम संकटाचे दिवस आले आहेत. ईश्वर काय करील ते न कले. बरे असो. * * * * असेल तर, माहागावी पाठऊन * * * * * * * पत्र लेहून पाठवावे. बहुत का * * * * * .

¶*One Visaji Balal Patankar writes from Kunjpura to Antoba Naik in the South giving the positions of the two armies. The Maratha army, he says, will march to Kurukshetra (Panipat), there perform religious ceremonies and thence return to Delhi. The Abdali's army is encamped beyond the Jumna.*

---

*No. 195]* *[15-11-1760*

**श्री**

**चिरंजीव राजश्री राघोपंत यासी**

नारो गंगाधर आसीर्वाद उपरी. येथील कुशल ताा छ ६ रबिलाखर मुाा दौंड वर्तमान येथास्थित असे विशेष. माहादजी जासूद याजबरोबर तुम्ही पत्र पाठविले ते पावोन वर्तमान कलो आले. दोला वाणी याजबराबरचा मजकूर लिाा तो सविस्तर कलला. त्यास माहादू व दुसरा जासूद असे दोघेजण त्याजकडे पाठविले आहेत त्याजला घेऊन पुण्यास जा म्हणोन सांगितले आहे. तेथे आल्यावर त्याचा प्रकार जसा करावयाचा तसा करावा अथवा लस्करात आला तर मनात आणीतच आहो. वरकड वर्तमान तर हिंदुस्थानातून कागद आले. समदखान सरहिंदवाला वगैरे दोनच्यार येकून दाहापंधरा हजार फौज-सुधा कुंजपुऱ्यास येऊन जमा जाहले होते. त्याजवर श्रीमंत राजश्री भाऊसाहेब लागले. लडाई जाली. समदखान व आणखी येक दोघे सरदार मारले गेले. दोघेजण धरिले गेले आहेत. कुंजपुऱ्याचे ठाणे फते जाहाले. त्याठिकाणी

2392

काही द्रव्यहि हस्तगत जाले असे वर्तमान आहे. राजश्री नारो शंकर व जयनगरच्या वकीलाची पत्रे आली.

¶*Naro Gangadhar in his letter to his son refers to the Bhausaheb's victory at Kunjpura.*

---

*No. 196*] [*17-11-1760*

श्री

सेवेसी नारो गंगाधर कृतानेक नमस्कार विज्ञापना. ताा कार्तिक सुध नवमीपावेतो स्वामीचे कृपेकडून कुशल असो विशेष. इकडील वृत्त तर आजी दौंडेहून कूच जाले. सिधटेकावर मुकाम होईल. सिधटेकी काही दिवस मुकाम होतील. बहुधा चतुर्थी वद्यपावेतो तेथेच मुकाम राहील. पुढे नगरावर जाणार. मुली पाहावयासी जिकडे तिकडे माणसे पाठविली आहेत. घडोन येईल ते खरे. हिंदुस्थानच वर्तमान तर श्रीमंत राजश्री (अपूर्ण).

¶*An incomplete letter from Naro Gangadhar who is accompanying the Peshwa North. The Peshwa is looking out for a suitable maiden for his marriage.*

---

*No. 197*] [*27-11-1760*

श्रीराम

तीर्थरूप राजश्री नाना स्वामी वडिलांचे
सेवेसी

अपत्यें लक्ष्मणानें व कृष्णाने कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल ताा छ १८ राखर मुाा पानिप(त) वडिलांचे कृपे यथास्थित जाणून स्वकुशललेखन करीत असिले पाहिजे विशेष. वडिली निंबाजी व विठोजी जासुदांसमागमें पत्रें पाठविलीं होतीं ती दिलीआलीकडे जासूद लुटले गेले पत्रें गेलीं. जासूद आलें. कुशलतेचे वर्तमान जबानी जासुदानी सांगितलें. त्या-आलीकडे सरकारच्या कासिदासमागमें वडिलांचे पुण्याचे मुकामचें पत्र आलें ते ह्यांच मुकामी पावले. लिहिले वर्तमान कलले. इकडील वर्तमान तर श्रीमंत दिलीहून उभयता सरदारसुधा निघालें. दिलीस राा नारो शंकर ठेविलें. अली-

गोहराचा लेक वलीहेद[1] केला. आणि दरजमजल कुंजपुऱ्यांस आलें. दुसरे दिवसी प्रात:काली हला केली. तेथे कुतुबशा अबदुल समदखान वगैरे वीस हजार स्वार प्यादा गिलज्यांकडील होता. किंचित् हत्यार धरिलें. उपरांतिक मोडिलें. तमाम लुटलें. सरदार सारे मारले गेले. त्याच हल्याने ठाणे कुंजपुराहि सर जाहाला. आतील नजाबतखान कुटुंबसहवर्तमान धरला गेला. त्याची चीजवस्त काही लुटली गेली. काही हस्तगत जाहाली. काही भूमिगत द्रव्य त्याचें व वरील मिळून साहा साडे साहा लक्ष नक्त दोन लक्षांचा गला हातांस लागला. नज्याबतखान गोली लागली होती मेला. वरकड कैदेत आहेत. तेथून पुढे कुरुक्षेत्रावरून सरहिंदेकडे जाऊन तो प्रांत काबीज करून तिकडील जमीदार सीख जाट सामील करून फौज तवाना[2] करावी. हा मनसबा करून पुढे येक मजल चालिले तों गिलज्यास कुजपुऱ्याचे वर्तमान कळ(ले), तोंच दिलीआलीकडे बागपतच्या घाटांस ते येऊन आलीकडे उतरावयास लागले. काही नावा काही दाडग्या उतारा(ने) तडका[3] उतारावयास लागले. हे वर्तमान येताच श्रीमंत माघारे फिरले. मजल दरमजल मुकाम मजकुरास आलें. तो तेहि सारे उतरून आलीकडे पाच कोस आले. दुसऱ्या तिसऱ्या दिवसीं येथे आलें. त्यांची श्रीमंतांची दोहो कोसांची तफावत आहे. तेहि तोफखाना पसरून उतरलें आहेत. श्रीमंतहि गाव पाठीसी देऊन पुढे तोफखाना देऊन (बसले) लें. नित्य त्यांच्या आमच्या फौजेसी जुजे होतात. आजपावेतो कहीवालियानी व जुजात मिळून हजार बाराशे घोडी तीन च्यारसे उंट व च्यार हती त्यांकडील आली. महिना त्याचे यांचे गाठी पडून जाहालें. छ १३ मिनहूस ते सरदारांकडे उजवी बाजूस चालून आलें. हेहि बाहीर निघालें. जूज मातबर जाहालें. त्यास मोडून गोटांत घातलें. तीन च्यारसें मारलें. पाच सातशे जखमी जाहाले. सेदीडसे घोडें आलें. आपलें तीस चालीस ठार सें दीडसें जखमी याप्रा जाहालें. संध्याकाल जाहाला, नाहीं तर तेच दिवसी पारपत्य उतम होतें. त्याणी गोट सोडून पळ काढिला होता. परंतु संध्याकालामुळें फौजा फिरल्या. परंतु ते म्हणत होते की मराठ्यासी आमची गाठ पडताच पडतील, ते महिना गाठ पडली व जुजेहि जाहाली, परंतु त्याचाच रेच मोडला याप्रा जाहालें. पुढेहि जे होईल तें लिहूं. हिकडील राजेरजवाडे दुलग, दोहीकडे यत नाहीत.

---

१ राज्यवारस; युवराज. २ हुशार, ताजी,
३ लगेच.

2394

आमच्या फौजेस येक मात्र वोड. पैका तूर्त नाही. वरकड उतमच आहे. श्रीमंत भाऊसारिखा अवसानाचा सरदार दुसरा कोणी नसेल. गिलज्याचें पारिपत्य सत्वरीच करितील. आम्ही मंडलीसहवर्तमान कुशल असों. कुंजपुऱ्यापैकीं दोन घोडें आम्हाकडे आलें. चिरंजीव नारायेणराव मंडलीसह सुखी आहेत. राजश्री त्रिंबकपंत नाना कुशल आहेत. पत्रें येतात. घनबादादांची पत्रे येतात. कुशल आहेत. वडिली तिकडील वर्तमान वरचेवर लिहीत जावें. बहुत काय लिहिणे ? कृष्ण जोसी संगमेश्वरकर मोर्च्यांत मुदबखाजवल बसलें होतें. गोला लागून मृत्यु पावलें. मस्तकी लागला. मोठे वाईट जाहालें. मोठा माणूस गेला. कलावें कृपा कीजे हे विज्ञति.

चिरंजीव राजश्री सदोबास आर्सीर्वाद. सर्व वडिलास लिहिल्यावरून कलेल. तिकडील सविस्तर वर्तमान लिहून पाठवणे हे आसीर्वाद.

¶*This is an important letter which summarises the position, plans and moves of both the parties and mentions a very successful engagement having taken place between the two combatants on November 23rd. The Marathas were strong and hearty and felt complete confidence in their General's ability and courage. When Kunjpura was captured the Bhao proceeded one stage towards Sirhind to take into confidence the Sikhs and the Jats and start a combined action against the Afghans. The Bhao retraced his steps suddenly, having received the news of the Abdali having crossed at Bagpat. The paper doubtless makes an important addition to our present knowledge of that decisive event.*

---

*No. 198]* *[1-12-1760*

पैा छ २४ रबिलाखर
मुकाम नागतळे

श्री

**राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री**
**माहादाजीपंत दाजी स्वामीचे सेवेसी**

पोष्य लक्ष्मण नारायण साष्टांग नमस्कार विनंती उपरी येथील कुशल तागाईत छ २२ रबिलाखर मुकाम करमेले सुखरूप असों विशेष. येथें छ २० रबिलाखरीं आलों. आणखी येथें येक दोन मुकाम आहेत, उपरांत कोणीकडे जातील तें पाहावें. दिलीकडील मजकूर तरी कुंजपुऱ्याहून पत्रें अश्विन सुद्ध

त्रयोदशीचीं आलीं. कुंजपुरा छ ७+ रविलोंवलीं घेतला, मोर्चे लाविले होते; दुसरें दिवशीं हल्ला करून घेतला. दाहा हजार फौज त्यांची लुटून पस्त[१] केली. लूट फार जाहाली. आपणांकडील शें दोनशें माणूस सरदारासुद्धां ठार जालें व हजारपावेतों जखमी जालें. मातबर कोणी पडिला नाहीं. दादु माहात आढळाचा मात्र पडला. तीन च्यार लांख रुपये सांपडले, आणखी सांपडतील; खणत्या लाविल्या आहेत. गहूं दाहा हजार खंडी सांपडला. रोजमरा गल्याचा देऊं लागले. समनखान व कुतुबशाहा या दोघांस धरून आणून डोकीं कापून भाल्यास लाऊन फिरविलीं. मोठी फत्ते जाली. काल जयनगराहून वकिलाचीं पत्रें बाविसा रोजाचीं आलीं. त्यांत मजकूर दिलीचे खालीं वीस कोसावर पठाण उतरला, याप्रमाणें वकिली वर्तमान आहे. पुण्याहून राजश्री गणेशपंत पेठ्ये यांणीं पत्रें पाठविलीं तीं आपणांकडे पाठविलीं आहेत, त्यांजवरून सविस्तर कळेल. लोभ कीजें हें विनंती.

¶*Laxman Narayan reports to Mahadaji news received from Delhi. "The Maratha army carried by assault the stronghold of Kunjpura where they secured loot and grain beyond expectation. The Abdali crossed the Jumna 40 miles south of Delhi."*

---

*No. 199*] [*12-3-1761*

पौ छ १० साबान

**श्री**

**तीर्थस्वरूप राजश्री नाना वडिलांचे सेवेसी**

अपत्यें मोरोबाचें सां नमस्कार विनंती. ता छ ४ साबानपावेतों मुा सिरोंज येथे क्षेम असे विशेष. वडिलीं पत्र पाठविलें पावलें. आले न आले त्याचा झा(डा) कळला. त्यास आपल्या लिहिण्यांत औदासीन्य बहुत आढळलें. त्यास वैराग्य प्राप्तच आहे. परंतु विचारें जे वैराग्य तें उचित, यास्तव सांतवन चिताचे ठायी करून, अस्थिकांस व सूज्ञ जनास दर्शनलाभ द्यावा. विशेष काय लिहावे? आपण सर्वजाण आहेत. देशमुखानी पत्र आपल्यास लिहिले आहे त्यावरून कलेल. बहुत काये लिहिणे? लोभ कीजे हे विनंती. वो चिमण जोसी व उपाध्ये यांस सां नमस्कार विशेष. लिहिण्यास जागा आहेसे काय? जाणावे. हे विनंती.

¶*Moroba tries to console the distracted mind of Nana Fadanavis.*

---

+ 17-10-1760. १ उध्वस्त, निःसत्त्व.

No. 200] [26-4-1761

श्री

श्रीमंत राजश्री महिपतरावजी स्वामीचे शेवेसी

सो आपाजी विस्वनाथ व सिवराम भास्कर व रामचेंद्र माहादेव कृतानेक आसीर्वाद विनंती उपरी. येथील कुशल ताा चैत्र वद्य ७ सप्तमी मुाा उजनी येथास्थित जाणौन स्वकीये लेखन करीत आसावे विशेष. ग्वालेरचे मुकामी राजश्री मल्हारजीबावा होलकर वगैरे फौजा तमाम येकत्र जालियावर, श्रीमंत सौभाग्यवती पारवतीबाई यास देशास रवाना केले, ते समई राजश्री दमाजीबावा समसेरबहादर यास बेाा घेऊन आले ते मजल दरमजल सेऊरपरियेंत आले. तो तेथे गुजराथे प्रांतीहून पत्रें आली जे, खंबाइतकर मोगल व भडोचकर व कमालुदीखान बाबी याणी हिंदुस्थानचे वर्तमानावरून बहकोन, तमाम मुलुकांत दंगा करून गावे मारूं लागले व सरकारच्याहि परगण्यात दंगा केला. हे वर्तमान आलियावर, आपण आज्ञा दिल्हीयावर मजल दरमजल येजमानसहवर्तमान गुजराथ प्रांतास गेलों. इकडील बंदोबस्तहि लौकरच धण्याचे पुण्येंकरून होईल. बंदोबस्त जालियावर सत्वरीच येतील. कळावे हे विज्ञापना.

¶*The letter gives the movements of Holkar and Damaji Gaekwar just after the disaster of Panipat. Parvatibai comes back to Maharashtra. The Moghals at Cambay and Broach rose in revolt upon hearing the overthrow of the Marathas.*

---

No. 201] [30-4-1761

पौा छ ४ सवाल वैशाख

श्रीरामोजयति

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
शामजीबावा स्वामी गोसावी यांसी

पोष्य बाबूराव बावाजी साां दंडवत प्रो विनंती उपरी. येथील कुशल ताा छ २४ रमजानपर्यंत यथास्थित जाणून स्वकीये कुशल लेखन केले पाहिजे विशेष. आपणाकडील पत्र येऊन वर्तमान कळो येत नाहीं यास्तव चित सापेक्षित आसे; तरी ऐसे नसावे. निरंतर प्रेशितपत्री कुशलार्थ लेखने सांभाळावें. उतरेकडील वर्तमान इकडे मनस्वी बोलतात यामुळें चितास समाधान नाहीं. श्रीमंताचे कल्याणे सर्वांचे कल्याण. आपली मंडळी समागमें ते सर्वहि अक्षतमरिष्ट देशास यावे हा निजध्यास लागला आहे. वर्तमान तथ्य कळावें, सबब मुदाम मनुष्य पाठविले असे; तरी आपणाकडील व श्रीमंताकडील संतोषवृत्त

लिहिले पाहिजे. प्रस्तुत आपण कोठे आहेत श(रीर प्र)कृत कशी आहे हे सविस्तर लेहून कळवावें. राजश्री नाना व रामराव कोठे आहेत राजश्री तुकोबा कडील आदिकरून वर्तमान * * * बहुत काय लिहिणें? लोभ असावा हे विनंती.

पोष्य पांडुरग दादाजी सां दडवत प्रो विनंती पूर्वममतेस अंतर नसावें. पदरचे आहो हे विनंती.

¶*Baburao Buwaji seeks news from the North.*

---

*No. 202]* *[6-5-1761*

पौा छ १३ जिल्काद जेष्ट इसने

श्री

श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामीचे सेवेसी

विनंती सेवक बापूजी माहादेव व पुरुषोत्तम माहादेव कृतानेक सा नमस्कार विज्ञाप्ति. येथील कुशल ताा छ ३० रमजान मुाा मथुरा स्वामीच्या कृपावलोकनेकरून येथास्थित असे विशेष. स्वामीचे आज्ञापत्र व गाजुदीखां वजीर व ठाकूर सुरजमल जाट यास पत्रे पाठविली ते त्यास देऊन उतर पाठवणे व शाह कैसा आपले वतनास गेला व पातशाह कोण जाला व वजीर कोण कैसा काये मजकूर? जयेनगरीहून व दिलीहून सविस्तर पत्रे आली परंतु काही तुम्हाकडील पत्रे न आली म्हणोन आज्ञा. वजीर जाटाचे पत्राची उतरे घेऊन सेाा प्रविष्ट करू. येथील वर्तमान रजबचे महिनियात पांच पत्रे कासिदाबराबर पाठविली. त्यांतून दोन पत्राचे उतर आले. आणिक कांहीं उतरे आली नाहींत. ते पत्रे सेाा प्रविष्ट जाली न जाली हे न कले. त्या पत्रांत विस्तारे वर्तमान सेाा विनंती लिहिली होती. हाली वर्तमान संकलित लिहिले आहे त्यावरून मनन करावे. पाणिपतावर जुंज जालियावर तीदिवसा शाह दिलींत पोहचला. तीर्थस्वरूप राा बापूजी माहादेव त्याचे येखितयारीत आले व भरथपूर येथून राजे नागरमल व दरेलसिंग दिलीस गेले. या दोवाही नजीबदौलाचे विद्यमाने शाहचे कूच आगरियाकडे मुकरर करविले. शाहचा डेरा आगरियांत राहे आणि नजीबखां पुढे कूच करी यैसे ठराऊन हे दोवे भरथपुरी ठाकूर सुरजमलाजवळ मामलतीसाठी आले. शाह यांचा मार्ग लक्षीत बारापुल्यावर डेरा दिल्हा. ठाकूर सुरजमलापासी आले तेव्हां तीर्थस्वरूप बापूजी माहादेव यानी आवसर पाहून शाहवलीखानाचे मारफातीने कौलवचन शाहचे व शाहवलीखानाचे स्वामीच्या

येकोपियास्तत्र सफाईच्या गोष्टी केल्या आणि आपला जिमा केला की शाहनें खातरजमेने वतनास कूच करावे. आम्ही श्रीमंत स्वामीपासी सल्लक व दोस्ती करून देऊ. जिमा आमचा झाला. तुम्ही येक मातबर आपला मुख्त्यार करून कागदपत्र त्याजपासी देऊन आम्हासमागमें देणे येसी रदबदली केली. यावर शाहवलीखानाने सर्व मानिले. नवाब याकूबआलीखा हिंदुस्थानचे कारभारास वाकीफ आणि रास्तबाज दाना शाहवलीखानाचा चुलत भाऊ यास स्वामीकडे पाठवावयाचे मोकरर केले. मर्जीप्रा हदहद्द[१] सो जाऊन ठैराऊन कलह परस्परे दूर करावावया, व जुंजास आम्ही इछित नव्हतो ये गोष्टीची मोजरत[२]? करावी इतक्या गोष्टी शाहाचे रुबरु करार जाल्या. शाहाने व शाहवलीने इतक्या गोष्टीचा करार देखून खातरजमेने कूच केला. कूच दरकूच जातात. छ २१ रमजानी लाहोरास पोहचला. विजारितीचे खिलत व कलमदान याकूफअलीखानाचे स्वाधीन केले की गाजुदीखानास पोहचाऊन देणे. आणिक सलतनंत[३] शाहआलम आलीगौहर यास व बक्षिगिरा नजीबखानास शाह सांगोन गेला. गुरे ? रमजानचे दिवसी ठाकूर सुरजमल व गाजुदीखां मथुरेस आले. रा गंगाधरपंत यास रा सुभेदारापासून बोलाऊन घेतले व दिलीहून याकूबआलीखां व तीर्थरूपहि आले. खिलेत[४] व कलमदान गाजुदीखानास दिल्हे. खिलेत घेतल्यावर याकूबआली-खानासी पैगाम[५] केला की तुमचे जाणे श्रीमंत स्वामीपासी मसलत[६] नाही. सलॉ[७] व हद मोकरर करणे. सलाह येथेच आहे. त्याने जाब दिल्हा की शाहने आम्हास सांगितले की तुम्ही स्वामीपासी जाऊन माजरत ? करून त्याची मर्जी दरयाफ्त[८] करून येणे. येसा विचार आहे. येथे अद्याप फैसला जाला नाही. पुढे काये होईल ते पाहावे. येथील सरदाराची मर्जी आहे कीं गाजुदीखानास दिलीमध्ये दाखल होऊन आपला बंदोबस्त करून दुसरा पातशाह करावा. आथवा बदस्तुर आलमगिराचे राहे या गो—(अपूर्ण)

¶*An important letter of the Hingne brothers announcing that they opened negotiations with Ahmedshah Abdali who was anxious to end hostilities against the Marathas. He therefore despatched an envoy with Bapuji Mahadeo and began his homeward march.*

---

१ मर्यादा, हद्द. २ खातरजमा ?
३ दौलत, पादशाही. ४ पोषाख.
५ बोलणें. ६ योग्य.
७ तह. ८ समजून घेणें.

श्री

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
आमणाजीपंत स्वामी गोसावी यांसी

पोष्य विसाजी कृष्ण नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीय ाल लिहीत गेलें पाहिजे. विशेष. तुम्हाकडून बहुत दिवस पत्र येऊन वर्तमान ्त नाहीं तरी यैसें न करितां निरंतर पत्र पाठऊन संतोषवीत जावें. या- र राजश्री त्रिंबकराव मामा श्रीयत्रेहून आले. त्यांहीं सांगितलें कीं आर्जीज- ा स्वार प्यादे जमा करितो. जगदेव सरकार तालुक्यास उपद्रव देणार ोन. त्यावरून तिकडील सरकारच्या मामलेदारास व तुम्हालगते संवस्थानिक ची कुमक करीत यैसें आहेत, त्यांस सरकारचीं पत्रें व तुम्हास पत्र ची जासूदजोडी आली होती त्याजबराबर देऊन पाठविलीं आहेत; पावलीं तील. सारांश तुम्ही बहुत सावधपणें राहून ठाण्याठुण्याचा बंदोबस्त स्थित करून खबरदारीनें राहावें. वरचेवरी आपणाकडील वर्तमान लेहून ीत असावें. इकडील वर्तमान तर प्रस्तुत आमचा मुकाम कित्तुर प्रांतीं . येथील गुंता उरकून घेऊन सत्वरींच कृष्णापार होऊन देशीं जातों. ड वर्तमान आधिकोत्तर लिहिजेसें नाहीं, येथास्थित आहे. श्रीमंत राजश्री साहेब आला जाटाच्या मुलकांत आहेत. थोरले श्रीमंत त्या प्रांतें होळकर ज़श्री बापूजी नाईक व गोपाळराव गोविंद वगैरे सरदार च्याळीस पंनास फौजेनशीं ठेऊन खांसा सडे चौपांचा हजारानसीं देशीं आले. टोंक्यास जाहाले. श्रीमंत राजश्री दादासाहेब पुण्यास आहेत, तुम्हास कळावें न लिहिलें असें. श्रीमंत दादासाहेबाजवळ हालीं पंचवीस तीस हजार ाहे, व आम्हीहि इकडून जातों. येकूण आर्जी देशीं च्याळिस पंनास यार आहे व पंनास साठ हजार हिंदुस्थानांत आहे. बाजतबरसात ्यार्थ असेल तो उत्तम प्रकारें करितील. रवाना छ २३ सवाल सन तैन. बहुत कार्य लिहिणें हे विनंती.

*ji Krishna writes news of his own whereabouts and that of the Peshwa eported to have retired upon Tonke leaving behind a strong force opalrao Govind and Holkar. The rumour about the Bhausaheb ached Jat territory seems to have gained currency as it is referred writer.*

No. 204] [2-6-1761

**श्रीशंकर**

यादीपत्रें येणे प्रा त्याहावयाची आज्ञा करावी. सुरू सन इहिदे सीतैन छ २० सवाल.

मातुश्री आईसाहेबास पत्र कीं स्वारीतून आल्यावर साहेबाचे पाय पाहावे हा हेत होता. परंतु दिलीकडील मनसब्याचे अडचणीमुले फौजेची तरतूद करणे. कर्ज फेडावयाचा प्रकार येकीकडे राहून कर्ज घेऊन तरतूद करावी लागते. कितेक अर्ज सांगोन पाठवणे आहेत यास्तव राजश्री सिदभट दीक्षितास पाठवावे व माधवराव विस्वनाथ यासहि पाठवावे. आम्ही विनंतीचे प्रकार बोलल त्याप्रा दीक्षित मागती सत्वरच सेवेसी येऊन विनंती करतील. आम्ही देव धनी येक साहेबास जाणतो. साहेबाखेरीज दुसरा अर्थ जाणत नाही. मनसब्याचे पेंच उलगडल्यावर दर्शन घ्यावे हेच इच्छा सेवकाची आहे. येणेप्रा पत्र.

कितेक मजकूर साहेबाचे सेवेसी अर्ज करावयाचे आहेत तर तुम्ही येणे. माधवराव विस्वनाथ यांसही बलाविले आहे. त्यांसही साहेबाचा निरोप देवऊन उभयता सत्वर समागमेच येणे म्हणून सिदभट दीक्षितास पत्र.

माधवराव विस्वनाथ यांस पत्र कीं साहेबाचे सेवेसी यावे हा हेत होता परंतु गुल्यामुले योग न वडे. त्यास कितेक अर्ज मातुश्रीसाहेबास करावयाचे आहेत यास्तव साहेबास विनंतीपत्र पा आहे व राजश्री सिदभट दीक्षितासही पत्र पा आहे तर तुम्हीही साहेबाचा निरोप घेऊन येणे. लौकरच सांगणे ते सांगोन रवानगी करूं म्हणून माधवराव विस्वनाथ याचे नावे पत्र.

येणेप्रा तीन पत्रें देवावी.

¶*Orders to issue letters to Tarabai and others. The Peshwa, as can be seen from the contents of this, has been completely crushed by the defeat at Panipat.*

---

No. 205] [पाो *19-6-1761*

छ १९ जिलकाद.

**श्रीमोरया**

सो विज्ञापना :—

राजश्री नारो शंकरास आगर त्याजकडील चिमणाजी वामन यासी आपल्याकडे पाठवितो. झासीची माम-

हिदुस्थानचे विपरीत वर्तमान यैकोन निजामआली बसालतजंग अंतस्ते येक जाले. हे श्रीमंत राजश्री दादासाहे-

लत त्यासी कमाविसीने अगर इजा-रियाने मारनिलेस सांगावी. त्याचा त्या मुलकांत दबाव, यास्तव पुढील सालापासून त्यासीच सांगावें. बाबूराव कोनेर यासी हुजूर पाठऊन द्यावे म्हणौन आज्ञा. यैसियासी उतम तेच स्वामी करितील. परंतु अदियापी नारो शकर अथवा चिमणाजी वामण आले नाहीत. प्रस्तुतचा समय, कारकूनच जाऊन आमल करितील असे नाही. यास्तव नारो शंकर यासी ताकीद हुजुरीहून होऊन सत्वर ते प्रांतास जात ते करावे व त्याजसमागमे अणीकहि फौज अदिकआगली रवाना केलिया त्या प्रांतात बदोबस्त होईल. पंत मशारनिले इकडे आलियावर बाबूराव कोनेरहि लौकरच शेवेसी येतील १

बास कलले. यांची त्यांची चितसुध असी दादाची पत्रे आली. त्यावरून तिकडे जाणे जरूर जाले म्हणौन आज्ञा. यैसियासी साहेबाची स्वारी गेली ते फार जलदीने. जाणेच होते तर हालक्या मजली करून जावे. थोडी बहुत फौज ठेवायाची होती म्हणजे दोहींकडीलहि बदोबस्त होता. प्रस्तुत स्वारी देशासी गेली. येणेकरून दक्षणेतहि कोण्ही डोई उचलू पावणार नाहीत. निजामअली बसालतजंग याचा मनसुबा किती? ते परसातील भाजी. सहजात ते कार्य होऊन बदोबस्त होईल.

सरकारच्या फौजा पौकी राजश्री विठलराव सिवदेव राजश्री बहिरो अनंत उभयेता. त्यापैकी बहिरोपत यांच्या लोकाचा ती वर्षांचा गवगवा याजस्तव ते पथकसुधा शेवेसी आलेत. त्याच्या फौजेच मागील निर्गम होऊन पुढे नवी फौज ठेऊन लोक येतसे करावे. ताजी फौज आल्या कामी पडेल. येविसीची आज्ञा करावयासी स्वामी समर्थ आहेत.

शेवेसी शृत होय हे विज्ञापना.

¶*Malharrao Holkar's letter to the Peshwa, asking for Naro Shankar to be at once dispatched to the North.*

---

*No. 206*] [*20-6-1761*

**श्रीराम**

**श्रीमंत राजश्री तात्यासाहेब स्वामी वडिलाचे**

**शेवेसी**

विनंती. सेवक आनंदराऊ माधव मुा बिठूर कृतानेक सिरसाा नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल ताा जेष्ठ वद्ये ३ त्रितीयापावेतो वडिलाचे आसीर्वादे

करून सुखरूप आसो. विसेष. पत्र पा ते प्रविष्ट जाले. वाचून बहुत आनंद जाला, तो श्रीईस्वर जाणे. विसेष. राजा गंगासिंगास खातरजमेचा परवाना पाठविला तो मशारनिलेस पावता केला. चचेडीचा किला मात्र खाली करून दिल्हा. प्रगन्यातील गढिया आद्याप दिल्ह्या नाहीत. सरकारात रूजू आहे. प्रस्तुत देशकालविचार पाहून तालुकदाराच्या हातून मामला करीत आहेत. पुढे जेव्हा जोरतलबी तुमची होईल त्यव्हा सर्व आमल पूर्ववतप्रमाणे होईल. सिवराजपुरची गढी राणी देत नाही. मामला करा म्हणौन सांगतात. परंतु त्याजला काही दबाव पोहचून काही मामला होत नाही. आपल्या तरफेने मामला करावा त्यव्हा जो हात उचलून पैसा देतील तोच वेने लागला. याप्रमाणे मामल्या(चा) विचार आहे. नाही तऱ्ही चचेडी व सिवराजपुर, बिठूर मिलून वीस पंचवीस हजाराचा मामला या सालाचा ठरेल. परंतु आपण या प्रांतास समयानसार आला आहा तर येकदा आपले हातें फौज फाटा देऊन चदेल्याचे येकदा पारपत्य कीजे. पुढे ईस्वरे इच्छा आहे तर उतम होईल. सांप्रत तर सर्वांसी सलूख ठेऊन जो ज्या रीतीने समजतो त्याच रीतीने त्याजला हस्तगत करून पुढील तरदूत उतम रीतीने होऊन येईल. वरकड सर्व वर्तमान रो सदाशिव कृष्ण व सरकारी फडनीस माहाली आहेत त्यांचे लिावरून विदित होईल. राजकी वर्तमान तर शाहजादा पूर्वेकडून येत होता तो कर्मनाशेपावेतो आला. इकडून सुजातदौलाहि श्रीकासीपावेतो गेला होता. दाहापंधरा कोस कासी पुढे राहिली होती. जेव्हा सुजातदौला लखनऊहून स्वार जाला त्यव्हा येका मुकामी पूर्वी प्रयागाचा सुभेदार मिर्जा कोचक होता, त्याजला पूर्वी कैद करून लखनऊस ठेऊन गेला होता. त्याजला जिवे मारिले व त्याचे पुत्रास जिवे मारून पुढे शहजाद्याचे भेटीस गेला. त्यव्हा ज्या मनसुब्यावर शहजादा आला की, मिर्जा कोचकास सोडून काही फौज देऊन दिलीकडे रवाना करावा, त्यासी सुजातदौलाने लागलाच जिवे मारून टाकिला. त्यव्हा सारा मनसबा खुंटला. त्यव्हा मागती शहजादा माघारा पूर्वेस गेला. सुजातदौलाहि छावनीस आपल्या देशास येईल. याप्रमाणे इकडील वर्तमान आहे. श्रीमंत रा भाऊसाहेब बैरागीचे वेश घेऊन श्रीअसुधेस आहेत. येक निंबाजी पोवार नामे आगोधर बिठुरास दाहापंधरा दिवस येऊन राहिला. त्यव्हा वर्तमान त्याने सांगितले की, श्रीमंत रा भाऊसाहेब जिवंत आहेत. बैरागी जाले आहेत मजला आज्ञा प्रगट करावयाची नाही. परंतु जे मी सांगतो हे सत्य आहे. त्यव्हा मागती निंबाजी पोवार बैरागी जाला आहे तो मागती श्रीगंगापार गेला. आसुधेस जातो म्हणौन

श्रीस्वामी बालसरस्वती याजला पुसोन गेला आहे. त्याजबरोबर श्रीमंतांचा पुरोहित माधोराम गंगापुत्र वगैरे क्षेत्राहून च्यारपाच ब्राम्हण बरोबर गेले होते. त्यव्हा श्रीमंतांच्या उपाध्याचा कागद त्याने भावास पाठविला आहे की, श्रीमंत रा॥ भाऊसाहेब आसुधेस बैरागियांचे मेल्यांत आहेत. तर तुम्ही काही खर्चास घेऊन लवकर येणे. त्यव्हा आम्ही गंगापुत्रास दाहावीस रुपये खर्चास देऊन आज रवाना केला आहे. त्याप्रमाणें वर्तमान आले आहे. तर मागाहून आनखी लिहून पाठवितो. विसेष. सेवकाचा कालक्षेपचा मजकूर पूर्वी सेवेसी लिहिला होता. त्यव्हा आभयेपत्र आले की, रा॥ गंगाधर हरि जेव्हा हुजूर भेटीस येतील त्यव्हा तुम्ही येणे; त्याजला रुबरू तुम्हाविशाई सांगू म्हणोन पत्री आज्ञा आली. त्यासी सांप्रत ठाणे मजकुराचा बंदोबस्तामुळे सेवक सेवेसी हाजीर न जाला. रा॥ गंगाधर हरि सेवेसी आहेत तर मजला कृपावंत होऊन जेव्हा आज्ञा करणे ते पत्री सादर करावे. लाहोराचे स्वारीस आपण नेमनूक दोनसे रुपये केली आहे. पुढे जे आज्ञा कराल तेप्रमाणे केले जाईल. तीर्थरूप मातुश्रीसुधा स्वामीचे कुटुंबात आहो. सर्वांचा कालक्षेप चालविने माहाराजास आहे. आम्ही सर्व प्रकारे सेवक पदरीचे आहो. समर्थाचा आश्रय धरला आहे. विसेष काये लि॥ ? कृपा लोभ आसो दीजे, हे विज्ञाप्ति.

¶*This is a news letter from the North giving details of news especially about Shuja-ud-daula, Mirza Kochak. It repeats towards the end the interesting news about the Bhausaheb being alive and living as a recluse at Ayodhya.*

---

*No. 207*] *[11-11-1761*

पौ छ १३ राखर

श्री

श्रियासह चिरंजीव विजईभव राजमान्य राजश्री माधवराव यांप्रती सौभाग्यवती पार्वतीबाई अनेक आसीर्वाद उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहीत असिले पाहिजे विशेष. आपण जानोजी भिताडा याजबरोबर पत्रे पाठविली ती पावोन लेखनार्थ श्रवण जाला. त्यावरून संतोष जाला. ऐसेच निरंतर पत्री संतोषवीत असिले पा. वरकड इकडील सविस्तर वर्तमान विसाजी कृष्ण याचे पत्रावरून विदित होईल. ध्यानात आणून कर्तव्यार्थ करावा. वरकड चिरंजीव लक्ष्मीबाई येथे आम्हाजवल असत. कलले पाहिजे. या प्रांतीचा बदोबस्त केल्यास उतम. बहुत काये लिहिणे ? लोभ कीजे हे आसीर्वाद.

¶*Parvatibai to Madhavrao, acknowledging the receipt of some letters sent with Janoji Bhintada. Laxmibai, the widow of Vishwasrao, is staying with her.*

No. 208] [1761 ?

श्री २

पुरवणी श्रीमंत राजश्री नाना स्वामीचे शेवेसी

सां नमस्कार विज्ञापना. शह चुकला. आगरेयावर फौजा येऊन दबावितें तर आगरें सहजात सुटतें. ढोलपूरचा रस्ता मोकळा होता. चमेलघाट हातीं राहता. कुमेरी दिवे आसपास असल्यास तहरह होता. तूर्त लांबणीवर काम पडले. गोहदकर अमानत राहिला. गालेरच्या आसपास दोन कोशी अमल करितो; असा प्रकार आहे. श्रीमंताचा पुण्यप्रताप थोर आहे. बरेच होईल. चिंता नाही. सर्व वर्तमान स्वामीस वरच्यावरी कळतच आहे. मी विशेष ल्याहावे ऐसे नाहीं. कृपा करून सबनिसीची असामी चिरंजिवाचे नावे करून दिल्ही पाहिजे. वेतन फारसे नाहीं. तीनसे रुपये आहेत. चिरंजीव निळोपंत दरसाल आपल्या दर्शनास येतच आहेत. आपण कृपा करितात. मजला चिरंजिवाची पत्रें येत असतात. आसामीविसी विनंती करितील. चितावर धरून आसामी करार करून दिल्हीं पाहिजे. आसामी स्वामीची. मी पदरचा आहे. शेवसी श्रृत होये हे विज्ञापना.

राजश्री हरिपंत तात्या व राजश्री आपाजीपंत गोधळेकर स्वामीस सां नमस्कार. विनंती लिहिले परिसोन सदैव कृपा करीत जावी हे विनंती.

¶*A report to the Peshwa concerning the tactical situation and military dispositions.*

---

No. 209] [17-9-1763

छ २३ रजब

श्री

श्रीमंत महाराज राजश्री दादासाहेब स्वामीचे सेवेसी

विनंती सेवक माहादजी सिंदे कृतानेक दंडवत विज्ञापना. येथील सेवकाचे वर्तमान तागायेत छ ९ माहे रबिलोवल मुा नाा फागी प्रांत जैपुर स्वामीच्या आसीर्वादें येथास्थित असे. यानंतर मुलराज व नंदराम हे शाहापासून राजश्री पुरषोत्तम माहादेव यांजसमागमे आम्हाजवल आले. सर्वहि समाचार विस्तारयुक्त सांगितला. त्यास आम्हीहि यांचें बहुतसे समाधान करून माहाराजांचे सेवेसी बिदा केले असेत. सायेंत अर्थ विदित करितील त्यावरून श्रृत होईल. कृपा करणार स्वामी समर्थ असेत. +सेवेसी श्रृत होये हे विज्ञापना.

¶*Mahadaji Sindia to Raghunathrao that the envoys from Ahmedshah are being sent to the addressee's presence to negotiate terms of peace.*

---

+ येथून अक्षर खाशाचें.